# कोलाम

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या ग्रंथाच्या प्रकाशनासाठी चौतीसशे रुपये अनुदान देऊन उपकृत केले आहे.

# को ला म

भाऊ मांडवकर




सेवा प्रकाशन, अमरावती



प्रकाशिका
सौ. सिंधू मांडवकर, एम्. ए.
सेवा प्रकाशन
रुक्मिणीनगर-विस्तार
अमरावती ( महाराष्ट्र )

प्रकाशन
स्वातंत्र्यदिन १९७६
किंमत वीस रुपये
मुद्रक
वि. नी. पटवर्धन
साधना प्रेस
४३०-३१ शनिवार, पुणे २

गुरुवर्य
डॉ. वि. भि. कोलते
कुलगुरू
नागपूर विद्यापीठ
यांना
सादर समर्पण

# लेखकाचे निवेदन

यवतमाळ तालुक्यातील कळंब हे माझे गाव! या गावात आणि आसपासच्या डोंगरी भागात कोलाम लोक राहतात. त्यांची भाषा शिकावी व तीवर काही लिहावे म्हणून मी एम्. ए. ला असतांना कोलामी भाषेचे शब्द गोळा करण्यासाठी इ. स. १९५६ साली सुरुवात केली. त्यावेळी रासा (ता. यवतमाळ) येथील एक कोलाम मुलगा (श्री.) विठ्ठल नारायण सकरापुरे ह्याने मला या कामी बरीच मदत केली. या जातीच्या सामाजिक माहितीवर सुरुवातीला माझा भर नव्हता. तरीही नवनवीन माहिती मला त्या मुलाकडून मिळत गेली. इ. स. १९५७ ते १९५९ या काळात महाविद्यालये बदलवीत यवतमाळ, चांदा, अमरावती अशी भ्रमंती होऊन १९५९ मध्ये अमरावतीला स्थिरावलो. कोलामी भाषेचा विचार करीत असतांनाच यवतमाळकडचे कार्यकर्ते श्री. कनीराम बंडूजी तोडसाम हे मला भेटले. त्यांनी कोलामी भाषेबद्दल गोळा केलेली माहिती मला पुरविली.

कोलामी भाषेचे व्याकरण पहिल्यांदा लिहिणारे श्री. सेतुमाधवराव पगडी यांना मी एक पत्र पाठविले आणि त्यांच्याकडून मार्गदर्शनाची अपेक्षा व्यक्त केली. त्यांनी आस्थेने उत्तर लिहिले-" मी लिहिलेले कोलामी व्याकरण आणि प्रोफेसर एम्यानो यांचे कोलामी व्याकरण वाचून काढल्यावर कोलामीवर काय आणि कसे लिहावयाचे, ते ठरविता येईल. मी भाषाशास्त्राचा तज्ञ नाही. यासंबंधी एखाद्या भाषाशास्त्रज्ञाचा सल्ला अधिक उपयुक्त ठरेल. मी १९४५-४८ च्या काळात गोंड, कोलाम इत्यादि जमातींचा स्पेशल अधिकारी होतो. त्यावेळी त्यांच्या भाषांचा अभ्यास करून पुस्तके लिहिली, इतकेच!"

कोलामी भाषेवर कार्य करीत असतांनाच इ. स. १९६० च्या शेवटी पुणे येथील डेक्कन कॉलेजचे ग्रंथपाल श्री. व. भि. बेलसरे यांची भेट झाली. त्यांनी मला या संदर्भात बरीच मदत केली. त्यांच्याशी झालेल्या चर्चेनंतर मी 'कोलाम' आणि 'कोलामी' या दोहोंना धरून ग्रंथ लिहिण्याचा विचार पक्का केला. केवळ भाषेवर संशोधन करण्यापेक्षा या उपेक्षित जातीचा सर्वांगीण अभ्यास करून ती माहिती नव्याने मांडण्याचे

मी ठरविले. या ग्रंथाचे स्वरूप समाजशास्त्रीय, मानववंशशास्त्रीय व भाषाशास्त्रीय होण्यामागे हीच प्रेरणा कारणीभूत ठरली आहे. दरम्यान समाजशास्त्राचे प्राध्यापक डॉ. बुराडकर यांची अमरावतीस भेट झाली. कोलाम जमातीची समग्र माहिती देणारा ग्रंथ लिहिण्याची माझी इच्छा मी त्यांच्याजवळ व्यक्त केली. त्यांना ती कल्पना आवडली. तेव्हापासून मी स्वतंत्र रीतीने माझ्या कामास सुरुवात केली.

माझे काम मी हळूहळू सुरू ठेवले. यवतमाळचे माझे जुने सहकारी प्राध्यापक श्री. कुळकर्णी यांनी जोर दिल्यामुळे मी माझ्या कामाचा वेग वाढवून प्रवासखर्चाच्या दृष्टीने विद्यापीठ अनुदान मंडळाकडे इ. स १९६४ मध्ये मदतीसाठी अर्ज केला. तो अर्ज मंजूर झाला. एकंदर खर्चाच्या मानाने मला मिळालेले पाचशे रुपये फारच कमी असले तरी ती गोष्ट माझ्या उत्साहात भर पाडावयास सहाय्यभूत ठरली. दरम्यान एप्रिल १९६४ मध्ये माझे मित्र (प्रा.) श्रीराम देशमुख यांचे मोझरी-आश्रमातील काही आदिवासी विद्यार्थी घेऊन मी यवतमाळ जिल्ह्याच्या तीन तालुक्यांचा दौरा केला. ह्या दौऱ्यात सोबत असलेल्या गोंड, प्रधान आणि कोलाम या जातींच्या विद्यार्थ्यांची मला थोडीफार मदत झाली. या दौऱ्यात (श्री.) नथू मसराम नावाचा कोलाम विद्यार्थी होता. या विद्यार्थ्याने मला माझ्या या प्रबंधातील कितीतरी माहिती तपशीलवार दिली. मराठी चौथा वर्ग शिकलेला हा विद्यार्थी त्यानंतरच्या माझ्या या संदर्भातील दौऱ्यात एकदोन वेळा सोबत होता. एरवी बाकीचे दौरे मी स्वतंत्रपणे एकट्याने केले. पायी, मोटारीने, सायकलीने, जमेल त्या तऱ्हेने मी फिरलो. यवतमाळ, वर्धा, चांदा, नांदेड व आदिलाबाद या जिल्ह्यांचा दौरा अनेकदा केला. ह्या सर्व विभागांतील कोलाम जमातीविषयी मिळालेल्या माहितीचा उपयोग या प्रबंधात केला आहे. यवतमाळ जिल्ह्यात ही जमात जास्त असल्यामुळे माझा भर या जिल्ह्याच्या माहितीवर अधिक आहे.

या ग्रंथाच्या लेखनकालात मला डॉ. य. खु. देशपांडे यांनी उपयुक्त सूचना केल्या. डेक्कन कॉलेजचे ग्रंथपाल श्री. बेलसरे यांनी मला वेळोवेळी अनेक बाबतीत मदत केली. डॉ. प्र. ल. सासवडकर व सौ. रजनी सासवडकर यांच्याही बाबतीत निराळ्या संदर्भात हेच म्हणावे लागेल. डेक्कन कॉलेजचे डॉ. घाटगे यांच्या मदतीची मला कृतज्ञतापूर्वक आठवण राहील. भाषेच्या दृष्टीने डॉ. एमेन्यू यांचा प्रबंध तर उपयुक्त झालाच; पण याबाबत मला कोलाम लोकांनीच अधिक मदत केली. माझ्यावर

विश्वास टाकून ते मजपाशी थांबू-बोलू शकले, याचा मला आनंद आहे. ग्रंथ पूर्ण झाल्यावर डॉ. एमेन्यूंना ती वार्ता कळविताच कॅलिफोर्नियातून पत्र पाठवून त्यांनी माझे कौतुक केले व असा उपयुक्त ग्रंथ निर्माण झाल्या-बद्दल आनंद व्यक्त केला.

लेखन पूर्ण झाल्यावर या ग्रंथाचे हस्तलिखित महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे पाठविले. सदरहू मंडळाने तज्ञांच्या अभिप्रायानुसार १९६५ मध्ये या ग्रंथाला चौतीसशे रुपयांचे प्रकाशनसाह्य दिले, त्याबद्दल शासनाचा मी ऋणी आहे. १९६६ च्या मार्च महिन्यात मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने गजेंद्रगडकर व्याख्यानमालेत 'कोलाम' या विषयावर माझी तीन व्याख्याने घडवून आणली. त्या निमित्ताने पाचशे रुपये मानधन मला मिळाले. याही रकमेचा उपयोग प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनासाठी झाला. मुंबईची ही व्याख्यानमाला घडवून आणण्यात ग्रंथ-संग्रहालयाचे प्रमुख श्री. वा. वि. भट यांनी जी आपुलकी दाखविली तिचा उल्लेख टाळता येणे शक्य नाही. याच विषयावर पुणे येथील केळकर-मंडळात श्री. शं. ना. बर्वे यांनी चर्चा व भाषणाचा उपयुक्त असा कार्यक्रम आयोजित केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुण्याचे शाहू-मंदिर महाविद्यालय, अमरावतीचे विदर्भ महाविद्यालय व वाशीमचे राजस्थान आर्य महाविद्यालय येथे प्रस्तुत विषयावर व्याख्याने आयोजित करण्याचे सौजन्य त्या त्या प्राचार्यांकडून व संबंधित प्राध्यापकांकडून लाभले !

कोलामांच्या एका सणोत्सवात गोंधळ होऊन सुभानहेटी (ता. केळापूर) येथे झालेल्या गोळीबाराच्या जागी मी व यवतमाळच्या आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळाचे सचिव श्री. क. बं. तोडसाम यांनी मिळून जाऊन वस्तुस्थितिदर्शक लेख लिहिले आणि नागपूरच्या 'तरुण भारता'ने ते दि. १५ व १६ जून १९६४ च्या अंकांत अग्रलेखासह छापले. त्यामुळे कोलाम जमातीची काही माहिती बाहेर आली.

या पुस्तकातील छायाचित्रे डॉ. जाधव व श्री. भाऊ गिरटकर (यवतमाळ) या माझ्या मित्रांनी काढली व त्या छायाचित्रांची सजावट माझे मित्र श्री. सबनीस ( अमरावती ) यांनी केली. अमरावतीचे तरुण चित्रकार श्री. सेवले यांनी मुखपृष्ठ तयार करून दिले. या मित्रांच्या सहकार्याचा उल्लेख आवश्यक आहे. तसेच काही तांत्रिक बाबींत विदर्भ साहित्य संघ, नागपूर महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. मा. गो. देशमुख, पुसदचे प्राचार्य ऊर्ध्वरेषे, प्राचार्य भिसे, श्री. तांदळे गुरुजी, सर्वश्री. म. ओंकार, धलवार, ए. सो. वानखडे, गो. भा. देशपांडे आणि देशमुख ( निर्वाचन कचेरी,

यवतमाळ) यांची मदत झाली. माहितीच्या संकलनाच्या दृष्टीने मला अनेकांचे थोडेफार सहकार्य लाभले. त्यांत सर्वश्री. भगत (देवापूर–आंध्र), इळपाते, टी. के. मसराम, सावळे, नैताम, बा. शा. मराठे, मधुकर युरखे, तुकाराम ढोबरे, निंबर्डे, एस्. एन्. आतराम, गो. का. रामपुरे, जुगलकिशोर तिवारी, रामचंद्र पाटील, ह. ग. काळे, दावलू दाभेकर, भाई संतोषराव मोटके, वि. ग. आरेकर, उमाशंकर गौतम, पी. जे. राऊत, मो. श्रा. देशमुख, गु. धों. उयके, मदनकर, वसंतराव देवतळे, झोटींग, मधुकरराव भोयर, गु. म. दोंदल, चं. तु. राडी इ. नावे येतात.

या ग्रंथात काही जागी विषयांची व माहितीची पुनरावृत्ती झालेली आढळेल. ती सहेतुक असून त्या त्या जागी तो तो मुद्दा विनायास स्पष्ट व्हावा हा उद्देश त्यामागे आहे. याच धोरणाने अनेकदा वऱ्हाडी व ग्रामीण शब्दांचा वापर केला आहे. त्याशिवाय काही बारकावे स्पष्ट होणे अशक्य झाले असते व मूळ भावार्थही व्यक्त झाला नसता. ज्या वातावरणात कोलाम लोक राहतात, ते वातावरण साकार व्हावे या हेतूने मी काही जागी 'त्यांचेपण' कायम ठेवले आहे. शक्य तेथे ग्रामीण शब्दांचे अर्थ-स्पष्टीकरण केले आहे. कोलामांकडून मिळालेल्या माहितीचा आशय बदलू नये म्हणून कित्येक जागी त्यांच्या परिभाषेचा उपयोग केला आहे किंवा त्यांचे कथन मूळ माहितीला ढळ न पोचू देता मांडले आहे. काही जाणत्या कोलामांनी माहिती पुरवितांना मराठीकरण करून ती परिभाषा तयार केली आहे. मिळालेली माहिती तारतम्याने पण हातचे राखून न ठेवता देण्याचा प्रयत्न केलेला आहे. कोलामांच्या जीवनातील माहितीचा अन्य जातींच्या माहितीशी तुलना करण्याचा मोह विस्तारभयास्तव बहुतेक टाळला असून तो संशोधनाचा एक स्वतंत्र विषय होऊ शकतो. कोलाम जातीत काय आहे ते सांगण्यावर माझा कटाक्ष आहे. जे कोलामांत आहे ते इतरांत किती व कसे आहे ते प्रबंधरूपाने नव्याने लिहून काढण्यास वाव आहे.

'साधने'ने उत्कृष्ट मुद्रण दिल्याबद्दल श्री. वि. नी. पटवर्धन व त्यांचे सहकारी यांचे आभार मानणे क्रमप्राप्त आहे. अशा तांत्रिक पुस्तकांची छपाई काहीशी कठीण जाते, हे जाणत्यांना सांगावयास नको! आणि त्यामुळेच अल्पस्वल्प मुद्रणदोष राहून जातात. मग अनिच्छेने शुद्धिपत्र द्यावे लागते. या ग्रंथातील शुद्धिपत्राकडे व किरकोळ मुद्रणदोषांकडे या दृष्टीने सुजाण वाचकांनी बघावे, ही अपेक्षा!

१५ ऑगस्ट १९६६ **भाऊ मांडवकर**

# अनुक्रमणिका

# छायाचित्रे, नकाशे व आकृत्या



卐 卐 卐

१ : :

# कोलामांसंबंधीचे पूर्वलेखन

कोलामांसंबंधी संशोधनपूर्वक लेखन आजवर झालेले नाही. तुरळक माहिती उपलब्ध झाली; पण ती कामचलाऊ स्वरूपाची असल्यामुळे तीत संगती नाही. कोलाम जमातीची थोडी माहिती हिस्लॉप-स्टिफन यांनी प्रथम १८६६ मध्ये दिली.[१] ग्रियर्सन यांनी केलेल्या भाषाविषयक पाहणीतून कोलामी भाषेबद्दलचे आपले मत १९०६ मध्ये नोंदवून ठेवले.[२] ग्रियर्सन यांनी कोलामांच्या सामाजिक संदर्भात माहिती दिलेली नाही. त्यांच्या 'पाहणी'तून फक्त थोडी भाषाविषयक माहिती मिळते. हेग-वुलस्ली यांचेही कार्य भाषेच्या क्षेत्रातीलच आहे. त्यांनी गोंडी-कोलामी भाषेतील समान शब्दावली शोधण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे हे कार्य १८९७ मधील आहे.[३]

जिल्हा-गॅझेटियरांची कल्पना ब्रिटिश राजवटीत निघाली. मध्यप्रांतातील जिल्हा-गॅझेटियरे चालू शतकाच्या आरंभी तयार होऊ लागली. कोलाम जमात

---

१. Hislop, Stephen : Papers Relating to the Aboriginal tribes of the Central Provinces ( 1866 )

२. Grierson : Linguistic Survey of India; Vol. IV ( Calcutta, 1906 ); पृ. ५६१-५६५

३. Haig, Wolseley : " A Comparative Vocabulary of the Gondi and Kolami Languages "- Journal of the Asiatic Society of Bengal ( 1897 ); १.१८५-१९१

त्या वेळच्या मध्यप्रांतात, विषेषतः वऱ्हाडातील काही जिल्ह्यांत असल्यामुळे त्या त्या जिल्ह्याच्या गॅझेटियरकरिता माहिती गोळा करतांना कोलामांचीही माहिती गोळा झाली. वऱ्हाडच्या अमरावती, अकोला, बुलढाणा व यवतमाळ या चार जिल्ह्यांचे त्या वेळचे कमिश्नर कर्नल मॅकेन्झी ह्यांनी या दृष्टीने टिपणे घेतली. यवतमाळ जिल्ह्यातच ही जमात जास्त आहे. वर्धा जिल्ह्यातही काही प्रमाणात आहे. या दोन जिल्ह्यांच्या गॅझेटियरांसाठी कर्नल मॅकेन्झी यांनी ही माहिती गोळा केली होती. वर्धा जिल्ह्याचे गॅझेटियर[१] १९०५ मध्ये व यवतमाळ जिल्ह्याचे गॅझेटियर १९०९ मध्ये प्रसिद्ध झाले.[२]

कोलामांसंबंधीची थोडीशी संकलित माहिती रसेल आणि हिरालाल यांनी आपल्या 'दी ट्राइब्ज अँड कास्ट्स् ऑफ दि सेंट्रल प्रॉव्हिन्सेस् ऑफ इंडिया' या पुस्तकात दिली आहे.[३] ही माहिती लिहितांना कर्नल मॅकेन्झी यांच्या माहितीचा उपयोग तर केलेला आहेच; पण हिस्लॉप यांचीही मते मदतीला घेतली आहेत. शिवाय हिरालाल व रसेल यांनी जमविलेली नवीन माहिती आहे, ते वेगळेच! या दोघांच्याच माहितीचा उपयोग त्यानंतरच्या किरकोळ लिखाणात अधिक करण्यात आलेला आहे. हिरालाल-रसेलच्या माहितीत मोलाची भर घालण्याचा किंवा तीमधील विसंगती काढून टाकण्याचाही प्रयत्न झालेला नाही. 'ज्ञानकोश'कार डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी 'ज्ञानकोशा'त दिलेली माहिती रसेल–हिरालाल यांच्या माहितीच्या आधारे आहे, हे त्या माहितीखाली कंसात या दोघांची नावे 'ज्ञानकोशा'त देण्यात आलेली आहेत, त्यावरून स्पष्टच दिसून येते. उलट, 'ज्ञानकोशा'तील माहितीत रसेल–हिरालाल यांच्या माहितीतील काही भाग गळालेला आहे. कोलामांची ही माहिती मराठीतील पहिली आहे, ही मात्र विशेष बाब म्हटली पाहिजे.[४] डॉ. इरावती कर्वे यांनी 'मराठी लोकांची संस्कृती' या ग्रंथात कोलामांसंबंधी दिलेली बव्हंश माहिती हिरालाल–रसेल यांच्या आधाराने लिहिलेली असून ती फार थोडी आहे. शिवाय त्या माहितीचे काही आधार बरेच जुने आहेत.[५]

इ. स. १९५० मध्ये कोलामी भाषेचे जे व्याकरण श्री. सेतुमाधवराव यांनी लिहिले,[६] त्याच्या प्रस्तावनेत या जमातीविषयी बरीच नवी माहिती दिली आहे.

---

१. Russell, I. C. S.: C. P. District Gazetteers-Wardha District (1905)

२ A. E Nelson, I. C. S. (Editor): Central Provinces District Gazetteers–Yeotmal District (Nagpur, 1909)

३. Russell, Rai Bahadur Hira Lal: The Tribes and Castes of the Central Provinces of India (vol. iii, London, 1916) पृ. ५२०–५२६.

४. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

५. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती (१९५१), पृ. ११०

६. P. Setu Madhao Rao : A Grammar of the Kolami Language (Hyderabad, 1950)

विशेषतः आदिलाबाद जिल्ह्यातील माहिती त्यांनी गोळा केलेली आहे. ती माहिती बरीच अभिनव आहे व या जमातीच्या माहितीत तिच्या निमित्ताने काहीशी भर पडली आहे. १९५०-५१ मध्ये ऑक्स्फर्डचे प्राध्यापक टी. ब्यूरो आणि सुधीभूषण भट्टाचार्य यांनी किनवट-पांढरकवडा भागातील काही कोलामी शब्द जमविले. इ. स. १९५५ मध्ये डॉ. एमेन्यू यांचा कोलामी भाषेवरील प्रबंध प्रकाशित झाला.[१] पण कोलामांच्या लोकसंख्येचे जिल्हावार आकडे वगळल्यास त्यात कोलामांची इतर माहिती नाही. कोलामी भाषेवरील ह्या प्रबंधाची मांडणी मात्र उत्कृष्ट आहे.

कोलामांसंबंधी माहिती देणारा एक लेख यवतमाळ महाविद्यालयाच्या 'गृत्समद' या वार्षिकात एका विद्यार्थ्याने लिहिला.[२] हिरालाल-रसेल यांच्या माहितीपेक्षा या लेखातील माहिती निराळी नाही. थोडी माहिती जास्तीची असली तरी तीत चुकाही आहेत.

दि. १७-९-१९६१ च्या 'गावकरी'त 'कोल्हामांची गावबांधणी' या नावाचा एक लहानसा लेख शांताराम लोणकर यांनी लिहिला.[३] लेख त्रुटित असला तरी तो चुकीचा म्हणता येणार नाही.

मी स्वतः कोलामांवरील चार-दोन लेख प्रकाशित केले. नागपूरच्या 'नवे लेखन'मध्ये १९६० च्या दिवाळीत 'कोलाम' हा लेख मी लिहिला.[४] त्यातील थोडी माहिती आज नव्या माहितीमुळे बदलावी लागली तरी ती बरीचशी बरोबर आहे. तसेच कोलामीत गीते असल्याची माहिती 'नवभारता'च्या ऑक्टोबर ६४ च्या अंकात प्रथमच प्रस्तुत लेखकाने मांडली.[५] कोलामांची वाद्ये, त्यांचे काही सण व देवता, त्यांची न्यायव्यवस्था अशा विषयांवर चार-दोन लेख प्रस्तुत लेखकाने लिहिले.[६]

---

१. M. B. Emeneau : Kolami – A Dravidian Language ( London, 1955 )

२. यवतमाळ महाविद्यालयाचे वार्षिक–'गृत्समद' ( १९५०-५१ ) : लेख–'यवतमाळातील वन्य जमाती— 'कोलाम', ले. वसंत कापसे.

३. शांताराम ब. लोणकर : 'गावकरी' ( नासिक ), लेख— 'कोल्हामांची गावबांधणी,' दि. १७-९-१९६१

४. भाऊ मांडवकर : 'नवे लेखन' ( नागपूर ), दिवाळी १९६०.

५. भाऊ मांडवकर : 'नवभारत' ( वाई ), लेख-'कोलामी भाषेत गाणी नाहीत ?' ऑक्टोबर १९६४

६. भाऊ मांडवकर : 'शिकशक्ती' ( अकोला ) दिवाळी १९६४; 'तरुण भारत' ( नागपूर ) दिवाळी १९६४; 'लोकसत्ता' ( मुंबई ) ७ मार्च १९६५; 'गावकरी' (नासिक) २५ एप्रिल १९६५; 'जळगाव-समाचार' ( जळगाव ) दिवाळी १९६५

वरील माहितीवरून दिसून येईल की, कोलामांच्या भाषेसंबंधी इंग्रजीत दोन पुस्तके प्रसिद्ध झाली असली तरी या समाजाची समाजशास्त्रीय माहिती ग्रंथरूपाने उपलब्ध नाही. जे तुरळक लेख प्रकाशित झाले, त्यांपैकी बहुतेक लेख समाधानकारक नाहीत. शिवाय या जमातीवर मराठीत लेखन प्रायः नाही. या पार्श्वभूमीवर प्रस्तुत मराठी प्रबंधाचे महत्त्व व आवश्यकता पारखता येईल.

# २ : :

## लोकसंख्या

इ. स. १९६१ च्या शिरगणती-अहवालावरून कोलामांची संख्या पुढीलप्रमाणे आढळून येते:-

| | |
|---|---|
| **महाराष्ट्र राज्य** | ४३,७८८ |
| यवतमाळ जिल्हा | ४१,०१३ |
| चांदा जिल्हा | १,५१६ |
| नांदेड जिल्हा | १,२५१ |
| उस्मानाबाद जिल्हा | ८ |
| **आंध्र प्रदेश** | --- |
| आदिलाबाद जिल्हा | --- |

वरील शिरगणतीमध्ये कोलामांच्या संख्येपैकी काहींचा समावेश झालेला नाही. महाराष्ट्र राज्यातील वर्धा जिल्ह्यामधील कोलामांची नोंद झालेली नाही. फार काय, वर्धा जिल्ह्यात एकही आदिवासी १९६१ च्या शिरगणतीमध्ये नोंदविलेला नाही. अमरावती जिल्ह्यात कोलाम अत्यल्प असले तरी त्यांचीही नोंद नाही. ठराविक विभागातील आदिवासी नोंदविण्याच्या १९६१ च्या गणनपद्धतीमुळे असे झाले, हे स्पष्ट आहे. अमरावती जिल्ह्याच्या मेळघाट भागातील आदिवासींची फक्त नोंद झालेली असल्यामुळे चांदूर तालुक्यातील ( जि. अमरावती ) कोलामांची नोंद वरील माहितीत आली नाही. चांदा जिल्ह्याच्या राजुरा तालुक्यातील कोलाम नोंदविले गेले; तर वरोरा भागातील कोलामांची नोंद नाही. यवतमाळ जिल्ह्यातील दारव्हा व पुसद तालुक्यांमधील कोलामांची नोंद वर आलेली नाही, असे दिसते. ठराविक भागातील आदिवासींचीच नोंद आदिवासी म्हणून करण्याच्या धोरणाचा हा परिणाम होय. नाहीतर यवतमाळ जिल्ह्याच्या १९६१ च्या जनगणनेत २ लक्ष १६ हजार ही आदिवासींची संख्या

अपेक्षित असतांना[१] १९६१ च्या जनगणनेत ती फक्त १,५५,६०९ इतकीच दिसते, ती दिसली नसती.

१९५१ मधील शिरगणतीच्या नोंदी १९६१ पेक्षा पूर्णतेला जवळच्या आहेत, म्हणून १९६१ पूर्वीच्या नोंदींची माहिती घेणे इष्ट होईल. १९५१ मधील नोंदी अशा आहेत :-

| | |
|---|---|
| **मध्यप्रांत-वऱ्हाड ( किंवा मध्यप्रदेश )** | **३४,३५२** |
| ( महाराष्ट्रात विदर्भ समाविष्ट झालेला नव्हता. ) | |
| यवतमाळ जिल्हा | **३१,५९८** |
| वर्धा जिल्हा | २,४०४ |
| चांदा जिल्हा | २१८ |
| अमरावती जिल्हा | १३२ |
| **हैद्राबाद-राज्य ( आता आंध्र )** | **८,३२५** |
| आदिलाबाद जिल्हा | ८,३२५ |
| **एकूण** | **४२,६७७** |

१९५१ च्या शिरगणतीतील आकड्यांवरून या जमातीच्या वास्तव्याची कल्पना येण्यास मदत होते.

१८९१ साली मध्यप्रांत-वऱ्हाडात ( अथवा आठ जिल्ह्यांच्या विदर्भात ) १९,३१८ कोलाम होते. १९०१ साली ही संख्या २५,७९९ झाली. त्यांपैकी २३,२९५ कोलाम अमरावती-यवतमाळ या वऱ्हाड-भागात होते. १९११ साली मध्यप्रांत-वऱ्हाडात २४,९७६ कोलाम राहत होते. इ. स. १९२१, १९३१ व १९४१ या वर्षी ही संख्या अनुक्रमे २३७२१, ३१७६३ आणि ३६,५९५ होती. अमरावती-यवतमाळ भागात १९३१ साली २९,५१५ कोलाम राहत होते; तर १९४१ साली ही संख्या ३२,९२९ होती. यवतमाळ, अमरावती, वर्धा व चांदा जिल्ह्यात १९४१ साली राहणाऱ्या कोलामांची संख्या अनुक्रमे ३२७२०, २०९, २६२४ आणि १,०४२ अशी नोंदविली आहे. आदिलाबाद जिल्ह्यात १९४१ साली ७४६ ही कोलामांची संख्या नोंदविली असली तरी या मोजण्यात चूक झालेली होती. ही संख्या चार ते पाच हजार असावी.

## कोलामांचे वास्तव्य

वर दिलेल्या १८९१ ते १९६१ च्या कोलामांच्या आकड्यांवरून स्पष्ट दिसून येईल की, कोलामांची सर्वात अधिक संख्या यवतमाळ जिल्ह्यात आहे. १९४१ मध्ये संपूर्ण मध्य-प्रांत-वऱ्हाडात असलेल्या ३६,५९५ कोलामांतून ३२,७२० कोलाम यवतमाळ जिल्ह्यात होते. १९५१ मध्ये व १९६१ मध्येही ही संख्या सर्वाधिक आहे. यवतमाळ जिल्ह्यास लागून

---

१. आदिवासींचा प्रश्न—विदर्भातील कार्य : प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र सरकार, डिसेंबर १९६०, पृ. ३

असलेले भूप्रदेश म्हणजे उत्तरेस अमरावती जिल्हा ( त्यातील चांदूर तालुका ), पूर्वेस वर्धा जिल्हा, दक्षिणेस व पूर्वेस चांदा जिल्हा, दक्षिणेस आदिलाबाद व नांदेड हे जिल्हे यांतून कोलामांची वस्ती आढळते. १९५१ च्या शिरगणतीच्या वेळी अमरावती जिल्ह्याच्या यवतमाळ जिल्ह्यास लागून असलेल्या भागात कोलाम असल्याचे स्पष्ट दिसते. मात्र ही संख्या अगदीच कमी आहे. फक्त एकदोन गावांमध्ये कोलाम असण्याचा संभव आहे. १९६१ ची नोंद अमरावती जिल्ह्याच्या संदर्भात नाही. नोंद झाली नसेल तर वेगळे; पण कोलाम नसतीलच तर १९५१ ते १९६१ या काळात ते जवळच्या यवतमाळ जिल्ह्यात ( यवतमाळ तालुक्यात ) येऊन वसले असतील, असे म्हणता येईल. उपलब्ध आकडयांवरून अमरावती जिल्ह्यात कोलाम नाहीत, असे म्हणता येऊ शकले तरी, वर्धा जिल्ह्याच्या बाबतीत तसे म्हणता येत नाही. यवतमाळ जिल्ह्यास लागून असलेल्या वर्धा व आर्वी या वर्धा जिल्ह्यातील दोन तालुक्यांच्या पश्चिम भागात कोलाम आहेत. वर्धा जिल्ह्यात १९५१ त २,४०४ व १९४१ त २,६२४ कोलाम होते. यवतमाळ जिल्ह्याच्या पूर्वभागास लागून असलेल्या वरोरा व चांदा या तालुक्यांत ( चांदा जिल्हा ) १९५१ त २१८ व १९४१ त १,०४२ कोलाम होते. नव्या प्रांतरचनेनंतर आदिलाबाद जिल्ह्यातील राजुरा तालुका चांदा जिल्ह्यात आला असल्यामुळे १९६१ ची चांद्यामधील कोलामांची लोकसंख्या १,५१६ झाली. या संख्येत राजुरा तालुक्याचीही संख्या आहे. राजुरा तालुका चांदा व यवतमाळ जिल्ह्याच्या अगदी दक्षिणेस आहे. यवतमाळ जिल्ह्याच्या दक्षिणेस असलेल्या हैद्राबाद राज्यातील आदिलाबाद जिल्ह्यात १९४१ मध्ये फक्त ७४६ एवढीच कोलामांची संख्या नोंदवलेली असली तरी गणकांना कोलामांतील व गोंडांतील फरक न उमगल्यामुळे ही संख्या घटली. ही संख्या ४ ते ५ हजार असावी असा अंदाज आहे. १९५१ मध्ये आदिलाबाद जिल्ह्यातील कोलामांची संख्या ८,३२५ होती. आज आदिलाबादेतील राजुरा तालुका चांदा जिल्ह्यात आलेला असून किनवट तालुका मूळच्या आदिलाबाद जिल्ह्यातून काढून नांदेड जिल्ह्यास जोडलेला आहे. त्यामुळे नांदेड जिल्ह्यात १९६१ मध्ये १,२५१ कोलाम नोंदविले गेले आहेत. हे सारे किनवट तालुक्यातील कोलाम होत, हे स्पष्ट आहे. १९६१ मध्ये उस्मानाबाद जिल्ह्यात फक्त ८ कोलाम नोंदविले आहेत. एखाद्या शेतमालकाने इकडून नेलेले एखादे कुटुंब तिकडे स्थिर झालेले असावे. एरवी उस्मानाबाद जिल्ह्यात कोलाम नाहीत, हे निराळे सांगावयास नकोच !

वरील आकडयांच्या आधारे असे दिसते की, कोलामांची दाट वस्ती यवतमाळ जिल्ह्यातच असून त्यांची वस्ती आजूबाजूला विरळ विरळ होत जाऊन संपली आहे. यवतमाळ जिल्ह्यातील पश्चिम बाजूच्या दारव्हा व पुसद तालुक्यांतूनही ही संख्या अगदीच कमी होत गेली. यवतमाळ जिल्ह्याच्या पूर्वभागाला जवळ पडणाऱ्या भागातच कोलाम आहेत, ही गोष्टही स्पष्ट आहे.

कोलामांच्या वस्तीची स्थूल अशी कल्पना पुढील नकाशांवरून येऊ शकेल :—

# भारत


कोलामांच्या वास्तव्याचा प्रदेश

काश्मीर
पंजाब
उत्तर प्रदेश
राजस्थान
गुजरात
मध्यप्रदेश
बिहार
आसाम
नेफा
पूर्व पाकिस्तान
बंगाल
ओरिसा
महाराष्ट्र
आंध्र
म्हैसूर
मद्रास


मध्यप्रदेश
जळगाव जिल्हा
बुलढाणा जिल्हा
अकोला जिल्हा
अमरावती जिल्हा
नागपूर जिल्हा
भंडारा जिल्हा
वर्धा जिल्हा
यवतमाळ जिल्हा
चांदा जिल्हा
परभणी जिल्हा
नांदेड जिल्हा
आदिलाबाद जिल्हा
उस्मानाबाद जिल्हा
महाराष्ट्र - विदर्भ विभाग
कोलामांच्या वास्तव्याचा प्रदेश
विदर्भ:
१. यवतमाळ जिल्हा
२. वर्धा जिल्हा
३. चांदा जिल्हा
४. अमरावती जिल्हा
शिवाय
१. नांदेड जिल्हा
२ आदिलाबाद जिल्हा
३ उस्मानाबाद जिल्हा

# कोलामांच्या वास्तव्याचा आणखी काही तपशील

## आदिलाबाद जिल्हा

अमरावती व उस्मानाबाद जिल्ह्यांतील कोलाम अगदीच कमी आहेत अथवा ते नसल्यासारखेच आहेत. यवतमाळ जिल्ह्याच्या खालोखाल कोलामांची संख्या आदिलाबाद जिल्ह्यात विखुरलेली आहे. मात्र ही संख्या त्या भागात अगदी विरळ आहे. त्या जिल्ह्याच्या विस्तृत क्षेत्रात ते विखुरले असले तरी तुरळक गावांतून, हे लक्ष्यात घेणे आवश्यक आहे.

आदिलाबाद जिल्ह्याच्या नकाशावरून काही माहिती स्पष्ट होईलः--




आदिलाबाद जिल्ह्यातील आदिवासींसंबंधीची व तदनुषंगिक माहिती यापुढील पानावर दिलेल्या तक्त्यात दिली आहे; ती पाहावी.

## आदिलाबाद जिल्ह्याची माहिती

| तालुका | क्षे. फ. चौ. मै | गावे | लोकसंख्या | घरे | आदिवासी | आदिवासींचे शे. प्रमाण | अंदाजे किती कोलाम कुटुंबे आहेत. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ आदिलाबाद | ५८० | २१० | १,१७,३३० | २३,४१० | १८,४९७ | १५.६ | १२५ |
| २ उतनूर | ७२६ | १६९ | ५५,०९९ | १०,४९० | ३२,९५३ | ५९.८ | ३०० |
| ३ बोथ | ५५४ | १६९ | ६९,८८१ | १२,८३७ | १७,३१९ | २४.७ | १२५ |
| ४ निर्मळ | ५६६ | १०२ | १,३७,३६० | २५,५४२ | ३,९०० | २.८ | कोलाम नाहीत |
| ५ मुधोळ | ४१३ | १५० | १,००,४९७ | १९,१०१ | २५६ | ०.३ | कोलाम नाहीत |
| ६ खानापूर | ३१३ | ७७ | ५५,७१० | ११,७६८ | ४,७३१ | ८.४ | कोलाम नाहीत |
| ७ लक्षेटीपेट | ७३४ | १३१ | १,२३,२९७ | २५,३३७ | ९,३५२ | ७.५ | १०० |
| ८ सिरपूर | ८५६ | २०४ | १,११,५७० | २९,०३३ | २१,५१४ | १७.९ | ५०० |
| ९ आसिफाबाद | ८२४ | २४२ | १,३८,७४८ | २५,४९९ | १६,७१३ | १२.४ | २०० |
| १० चिन्नूर | ६८९ | १७४ | ९५,८०० | १९,३८३ | ६,७३६ | ७.० | १५० |
| | ६,२४५ | १,७१८ | १०,०९,२९२ | २,०२,४३० | १,३१,९७१ | १३.१ | १,५०० |

आदिलाबाद जिल्ह्याच्या आदिलाबाद, बोथ, उतनूर आसिफाबाद, सिरपूर, लक्षेटीपेट व चिन्नूर या सात तालुक्यात कोलाम आहेत. मुधोळ, निर्मळ व खानापूर या तीन तालुक्यांत ते नाहीत. वरील सातही तालुके महाराष्ट्र राज्याला अधिक जवळ आहेत. पैकी लक्षेटीपेट तालुका सोडल्यास सर्वांच्या सरहद्दी महाराष्ट्राला लागून आहेत. त्यातल्या त्यात बोथ व आदिलाबाद हे तालुके किनवट तालुक्यास लागून आहेत आणि आदिलाबादेसह इतर तालुके यवतमाळ व चांदा या जिल्ह्यांना लागून आहेत.

आदिलाबाद जिल्ह्यातील पुढील गावी कोलाम आढळले :—

( १ ) **आदिलाबाद तालुका** — दरमगुड्ड ( २० घरे ), चूचूघाट ( १० घरे ), ओगपूर ( ८ घरे ), गोपालापूर ( १५ घरे ), भरेमूपूर ( ९ घरे ), सगणापूर ( १६ घरे ), मामोडीगुडी ( २५ घरे ), पिपळधरी ( २५ घरे ), पानापाठ ( १६ घरे ), मचापूर ( ६५ घरे ), नेदगाव ( १० घरे )

( २ ) उतनूर तालुका :— इंदरवल्ली, धाबा.
( भीमपूर खोऱ्याचा जंगली भाग अ-संशोधित आहे. )

( ३ ) **बोथ तालुका** :— गिरगाव, नारायणपूर, बांदळी.

( ४ ) **लक्षेटीपेट तालुका** :— इसलापूर.

( ५ ) **सिरपूर तालुका** :— कोरसनी, लोणेवेल्ली, सांडगाव, टुमरीहट्टी, गोंडीबोडा, बाबापूर, कणकी, कवटारा, अंखोरा, गुल्लातळोदी, चिंताल्मानेपल्ली, डुब्बा, बाबासागरर, भरेनपल्ली.

( ६ ) **आसिफाबाद तालुका** :— देवदुर्ग, दंतानपल्ली, झरी, केरीमेरी, लेद्दीगुडा, धानोरा, तिळणी.

( ७ ) **चिन्नूर तालुका** :— गावांची नावे कळू शकली नाहीत.
जिल्ह्यात याशिवाय आणखी काही गावी कोलाम असू शकतील.

## नांदेड जिल्हा

या जिल्ह्यातील किनवट तालुका पूर्वी आदिलाबाद जिल्ह्यात होता. ह्या किनवट तालुक्याच्या जंगली भागात कोलाम आहेत. हा तालुका यवतमाळ जिल्ह्याशी लागून आहे. १९६१ च्या शिरगणतीप्रमाणे या भागातच १,२५१ कोलाम आहेत. किनवट भागातील पुढील गावी कोलाम आढळले:-

माहूर, जावर, भीलगाव, सालंबी, कसारखेड, वाई, मेट आणि मदनापूर.

## चांदा जिल्हा

या जिल्ह्यातील राजुरा तालुका हा मूळचा आदिलाबाद जिल्ह्याचा तालुका होता. या तालुक्यात राजुरा–माणिकगड, मारकालमेट्टा टेकड्या व लेंढीगुडा या गावांत काही कोलाम आढळतात. यवतमाळ जिल्ह्यालगत चांदा तहसिलीचा जो भाग आहे, तेथेही काही कोलाम आहेत. वरोरा तालुक्यात (यवतमाळ जिल्ह्याच्या लगतचा भाग) मांगली व पिजदुरा येथे कोलाम आहेत. १९६१ च्या शिरगणतीप्रमाणे चांदा जिल्ह्यात १,५१६ कोलाम आहेत.

## वर्धा जिल्हा

१९६१ च्या शिरगणतीत या जिल्ह्यामध्ये एकही आदिवासी दिसत नसला तरी कोलामांची वस्ती पुढील गावी आहे. हिंगणघाट तालुक्यात कोलाम आढळत नाहीत.

### वर्धा तालुका

| गाव | अंदाजे कोलामांची घरे | गाव | अंदाजे कोलामांची घरे |
|---|---|---|---|
| (१) इंझाळा | १२ | (१७) हमदापूर | १६ |
| (२) चोंदी | ७ | (१८) हुसनापूर | १० |
| (३) कारेगाव | ३ | (१९) दत्तापूर | २ |
| (४) सालोड फकीर | ६ | (२०) निमगव्हाण | ४ |
| (५) राघाळा | १६ | (२१) नारायणपूर | १५ |
| (६) तळणी | १२ | (२२) सिंदी खुर्द | १० |
| (७) रोहणी | २ | (२३) धामणगाव | १५ |
| (८) कोल्हापूर | ६५ | (२४) वाठोडा | ४ |
| (९) सिरपूर | १ | (२५) वाघदरा | १५ |
| (१०) भिडी | ४० | (२६) बोदड | ३० |
| (११) आकोली | १२ | (२७) लोणसावळी | १२ |
| (१२) लोणी | ३ | (२८) पिंपळगाव | १२ |
| (१३) चिटकी | १५ | (२९) चिचघाट | १० |
| (१४) सेकापूर | ३ | (३०) नागझरी | २ |
| (१५) आपटी | ६ | (३१) मलकापूर | २५ |
| (१६) वाघोली | १० | | |

## आर्वी तालुका

| गाव | अंदाजे कोलामांची घरे | गाव | अंदाजे कोलामांची घरे |
|---|---|---|---|
| (१) सोर्टा | ६ | (११) साल्दरा | ४० |
| (२) हुसेनपूर | १२ | (१२) सावंगी | ३० |
| (३) बोरी | १५ | (१३) धनोडी | १५ |
| (४) रसुलाबाद | ६ | (१४) पारगोठाण | १० |
| (५) पान्चोड | ५० | (१५) चोरांबा | १२ |
| (६) खैरी | १४ | (१६) गौरखेड | ३० |
| (७) मांडवा | ३० | (१७) रोहणा | १२ |
| (८) बोथली | १२ | (१८) विरूळ | ३० |
| (९) भादोड | १६ | (१९) माजरा | २० |
| (१०) काकरदरा | २५ | (२०) आर्वी | १० |
| | | (२१) अल्लीपूर | २ |

वर्धा जिल्ह्यातील कोलामांची १९६१ ची अंदाजे संख्या— ३,०००.
१९५१-२,४०४; १९४१-२,६२४

## यवतमाळ जिल्हा

यवतमाळ जिल्ह्यात कोलाम जास्त असल्यामुळे या जिल्ह्याच्या माहितीवर विशेष भर देणे समर्पक ठरेल. यवतमाळ जिल्ह्यातील यवतमाळ, केळापूर व वणी या तीन तालुक्यांत कोलाम प्रामुख्याने आहेत. त्यामुळे त्यांच्या वस्तीची या तीन तालुक्यांतील गावे तपशीलवार पुढे देत आहे.

### यवतमाळ तालुका

एकूण खेडी ३१५
शहर १
एकंदर गावे ३१६

यवतमाळ तालुक्यातील कोलाम :—
१९५१ — १३,२०३
सर्व लोकसंख्या १९५१-१,७७,४५७
१९६१-२,०७,३६६

### कोलामांची वस्ती असलेली गावे

**यवतमाळ विकासगट**

१ यवतमाळ
२ वाघापूर
३ वडगाव
४ गोधनी इजारा
५ बोधगव्हाण
६ भोसा

| | | |
|---|---|---|
| ७ धानोरा | २७ किन्ही इजारा | ४७ निळोणा |
| ८ पारवा | २८ किटा | ४८ जांब |
| ९ डोरली | २९ तळेगाव | ४९ बरबडा |
| १० मोहा | ३० कारली | ५० चौधरा |
| ११ मेंढला | ३१ मडकोना | ५१ घोडखिंडी |
| १२ बोरगाव | ३२ भारी | ५२ रातचांदणं |
| १३ वाई | ३३ वाकी | ५३ खरद |
| १४ झोला | ३४ धामनी | ५४ म्हसोला |
| १५ टाकळी इजारा | ३५ खानगाव | ५५ अर्जुना |
| १६ सावर | ३६ जामडोह | ५६ मनपूर |
| १७ हातोला | ३७ मुरझडी इजारा | ५७ वेचखेडा |
| १८ पिंपरी | ३८ जोडमोहा | ५८ रुई |
| १९ पांढुर्णा | ३९ खोरद खुर्द | ५९ वेलोरा |
| २० आसोला | ४० शेळी | ६० रुई गोसावी |
| २१ काप्रा-महारथड | ४१ येरद | ६१ घटाणा |
| २२ लोहारा | ४२ शिवनी बुद्रुक | ६२ लोणी |
| २३ भिसनी-मोळोना पोड | ४३ मुरझडी तांभारी | ६३ सायखेडा खुर्द |
| २४ चिचबर्डी | ४४ चापडोह | ६४ बोरी सिंह |
| २५ पिंपरी इजारा | ४५ चिंचघाट | ६५ सालोड |
| २६ भोयर | ४६ सावरगड | |

**कळंब विकासगट** ( ता. यवतमाळ )

| | | |
|---|---|---|
| ६६ कळंब | ७८ सायखेडा ( दुधाना ) | ९० मांजर्डा |
| ६७ रासा | ७९ नांझा | ९१ झुली |
| ६८ दत्तापूर | ८० पोडगव्हाण | ९२ मेटीखेडा |
| ६९ चापर्डा | ८१ खोरद बु. | ९३ पहूर इजारा |
| ७० घोटी | ८२ पिढा | ९४ बेलोरी |
| ७१ वेलोना | ८३ पिंपळखुटी | ९५ किन्हाळा |
| ७२ नरसापूर | ८४ शिवनी खु. | ९६ पालोती |
| ७३ राजूर | ८५ खैरी | ९७ कोलझरी |
| ७४ कान्होली | ८६ पोफळणी | ९८ नकटी पार्डी |
| ७५ खडकी | ८७ शरद | ९९ प्रधानबोरी |
| ७६ सरपधरी | ८८ मोहदरी | १०० आष्टी ( अगासकांड ) |
| ७७ दुग | ८९ वाढोणा खु. | १०१ धनोडी |

| | | |
|---|---|---|
| १०२ निंबगव्हाण | ११२ गांढा | १२२ पिंपळगाव होरे |
| १०३ येळाबारा | ११३ हिरडी | १२३ पार्डी |
| १०४ रोहटेक | ११४ अकोला बाजार | १२४ वडगाव ( पो. स्टे. ) |
| १०५ सायखेडा बु. | ११५ हातगाव | १२५ आकपुरी ( गणेशपूर ) |
| १०६ दहेली | ११६ पिंपरी बुटी | १२६ कारेगाव |
| १०७ सुकळी | ११७ वरझडी | १२७ कोळंबी |
| १०८ वागदा | ११८ येवती | १२८ हिवरी |
| १०९ वटबोरी | ११९ वरूड | १२९ धानोरा |
| ११० रामगाव | १२० खैरगाव | १३० मुरझडी |
| १११ वाकी | १२१ कामठवाडा | १३१ डोंगरखर्डा |

बाभूळगाव विकासगट ( ता. यवतमाळ )

| | | |
|---|---|---|
| १३२ बाभूळगाव | १४४ कोटंबा | १५६ देवगाव |
| १३३ आसेगाव | १४५ नायगाव | १५७ चिमणापूर |
| १३४ गळव्हा | १४६ वीरखेड | १५८ बोरगाव |
| १३५ कोपरा | १४७ मिटनापूर | १५९ चेंडकापूर |
| १३६ गणोरी | १४८ येरंडगाव | १६० यावली |
| १३७ राणीउमरावती | १४९ पिंपरी | १६१ पिंपळगाव |
| १३८ घारफळ | १५० नांदुरा खुर्द | १६२ महंमदपूर |
| १३९ सिंदी | १५१ माहुली | १६३ टाकळगाव |
| १४० सारफळी | १५२ तरोडा | १६४ करळगाव |
| १४१ खर्डा | १५३ पंचगव्हाण | १६५ चोंढी |
| १४२ सरूळ | १५४ कृष्णापूर | [ पृ. ३२ नंतरचा नकाशा पाहा. ] |
| १४३ मादणी | १५५ झपाटखेडा | |

## केळापूर तालुका

एकुण खेडी ३४०
शहरे २
एकंदर गावे ३४२

केळापूर तालुक्यातील कोलामः—
१९५१ — १०,५१६

सर्व लोकसंख्या—
१९५१— १,६६,७२०
१९६१— १,९७,८७०

केळापूर तालुक्यात कोलामांची वस्ती असलेली पुढील गावे आढळली:--

१ कोंगारा
२ साखरा
३ सुसरी
४ कांढी
५ निलजई
६ गोंडवाकडी
७ वेडद
८ वाघोली
९ मारेगाव
१० कारेगाव
११ हिवरी
१२ दर्यापूर
१३ केगाव
१४ खैरगाव बु.
१५ खैरगाव खु.
१६ कोची
१७ दाभा
१८ जीरा
१९ मीरा
२० जोगीनकवडा
२१ चिखलधरा
२२ मोहदरी
२३ कृष्णापूर
२४ गणेशपूर
२५ पिंपळापूर
२६ सखी बु.
२७ घोडदरा
२८ वाढोणा खु.
२९ बहात्तर
३० पेंडरी
३१ आंबेझरी
३२ घुबडी
३३ मंगी डिगडोह
३४ वागदा
३५ करणवाडी
३६ चनाई
३७ सुरदेवी
३८ वांजरी
३९ खैरगाव दे.
४० धारणा
४१ घोन्सी
४२ केळापूर
४३ किन्ही
४४ खैरगाव
४५ करंजी
४६ अर्ली
४७ जगी
४८ बोथ
४९ पहापळ
५० मोहदा
५१ मांगुर्डा (मांगुर्ले)
५२ भाडउमरी
५३ सुन्ना
५४ सायखेड
५५ झुली
५६ शिवणी (प्र.)
५७ वासरी
५८ शिरोली
५९ जुनोनी
६० किन्ही
६१ लिंगी
६२ बोदडी
६३ पंगडी
६४ डोरली
६५ पिंपरीदुर्ग
६६ मांडवा
६७ अंजी
६८ आटमुर्डी
६९ मुलगड
७० लोणी
७१ बंदर
७२ तेजनी
७३ विहीरगाव
७४ वर्ध-सुभानहेटी
७५ सावरखेड
७६ खमकुंड
७७ खैरगावकासार
७८ चोंदी
७९ सराटी
८० पळसकुंड
८१ उमरविहीर
८२ सिंगलडीप
८३ खातारा
८४ अडणी
८५ देवधरी
८६ सोनुर्ली-ज.
८७ जळका
८८ सखी खुर्द
८९ वाठोडा
९० दहेगाव
९१ झाडगाव
९२ किन्ही-जवादे
९३ एकुर्ली
९४ मुंझाळा
९५ कोपामांडवी (कोपबाई)
९६ काटेसरी

| | | |
|---|---|---|
| ९७ बेलुरी | १०० जांब | १०३ खडका |
| ९८ वाई | १०१ टिपेश्वर | १०४ माथनी |
| ९९ ढोकी | १०२ वर्नी | (पृ. ३३ पूर्वीचा नकाशा पाहा) |

या तालुक्यात याशिवाय आणखी काही गावी कोलाम असू शकतील.

## वणी तालुका

एकूण खेडी ३१६
शहर १
एकंदर गावे ३१७

वणी तालुक्यातील कोलाम:–
१९५१–५,५१२
सर्व लोकसंख्या–
१९५१–१,५४,९६९
१९६१–१,७३,६६९

वणी तालुक्यात कोलाम असलेली पुढील गावे आढळली:—

| | | |
|---|---|---|
| १ बोरी बु. | २१ मेंढनी | ४१ पार्डी |
| २ मांगली | २२ रोहपट | ४२ मजरा |
| ३ शिंदी | २३ पेंढरी | ४३ रांजणी |
| ४ महागाव | २४ सगणापूर | ४४ शिबला |
| ५ खेकडवाई | २५ अर्जुनी | ४५ आंबेझरी खु. |
| ६ घोगुल्दरा | २६ बोर्डा | ४६ आंबेझरी बु. |
| ७ शिवनाला | २७ गोधनी | ४७ कुंडी |
| ८ नरसाळा | २८ उमरघाट | ४८ टेंभी |
| ९ बुरांडा-गोंड | २९ साखरा | ४९ मूळगव्हाण |
| १० पांढरकवडा | ३० भालेवाडी | ५० चिखलडोह |
| ११ पिजगाव | ३१ इंझासन | ५१ कारेगाव खु. |
| १२ सालेभट्टी | ३२ कुंभारखन | ५२ निंबादेवी |
| १३ रासा | ३३ वल्हासा | ५३ जुनोनी |
| १४ वीरकुंड | ३४ लेंढोरी | ५४ गवारा |
| १५ दहेगाव | ३५ येसापूर | ५५ पिवरडोल |
| १६ वेगाव | ३६ चिंचघाट | ५६ सुरदापूर |
| १७ खापरी | ३७ जुनोनी | ५७ कमळवेली |
| १८ हटवांजरी | ३८ निमनी | ५८ मुधाटी |
| १९ बुरांडा-खडकी | ३९ झमकोला | ५९ कोडपाखिंडी |
| २० सराटी | ४० सुरला | ६० माथार्जुन |

| | | |
|---|---|---|
| ६१ जळका | ६९ वाढोणा | ७७ मांडवी |
| ६२ पांडविहीर | ७० सुसरी | ७८ पांढरवानी |
| ६३ चिंचोनी-बोटोनी | ७१ बोरगाव | ७९ महादापूर |
| ६४ खैरगाव बु. | ७२ पाचपोहोर | ८० दाभाडी |
| ६५ दुर्गाडा | ७३ आंबेझरी | ८१ अर्दवन |
| ६६ बागदरा | ७४ हिवराबारसा | ८२ शेकापूर |
| ६७ आवळगाव आंबोरा | ७५ कटली बोरगाव | ८३ कुंभा |
| ६८ खंडणी | ७६ रामपूर | |

( वणी ता. चा पृ. ३८ वरील नकाशा पाहा )

या तालुक्यात याशिवाय आणखी काही गावी कोलाम असू शकतील.

## दारव्हा तालुका व पुसद तालुका

१९६१ च्या शिरगणतीच्या माहितीत या तालुक्यांत आदिवासी नसल्याची माहिती आली आहे. वस्तुतः हे चूक आहे. यवतमाळ, केळापूर व वणी तालुक्यात आदिवासींचे प्रमाण जास्त आहे. दारव्हा व पुसद या तालुक्यांत ते कमी आहे. कोलामही या तालुक्यांत कमी आहेत. पुसद तालुक्यात पूर्वेच्या बाजूने काही खेड्यांत कोलाम असल्याचे कळले. त्यांपैकी वाई या खेड्यात कोलामांची १०-१५ घरे आहेत.

दारव्हा तालुक्यात पुढील गावी कोलाम आढळले:--

| गाव | घरसंख्या | लोकसंख्या | गाव | घरसंख्या | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ बागवाडी | ८ | ४० | ९ जवळगाव | १० | ४० |
| २ चाणी | ३० | २०० | १० पिंपळगाव डुबा | — | — |
| ३ जांभोरा | ५ | १७ | ११ सोनखास | २५ | — |
| ४ बोरगाव | — | — | १२ लासीना | ५० | — |
| ५ कापशी | — | — | १३ मालखेड खुर्द | ४ | — |
| ६ ढवळसर | ८ | | १४ मालखेड बु. | ४ | — |
| ७ नारकुड | ३५ | १५० | १५ बरोटापाटा | — | — |
| ८ बोरीअरब | ९ | २० | | | |

याशिवाय मोझर, दिघोरी, चिकणी, घुई, व लोहकरवाडी येथेही काही कोलामकुटुंबे राहतात.

( पृ. ३७ वरील दारव्हा तालुक्याचा नकाशा पाहा )


अमरावती तालुका
अमरावतीकडे
चांदूर तालुका
यवतमाळ तालुका
मुर्तिजापूर तालुका
मुर्तिजापूर कडे
पिपळगाव हुवा
मालखेड बु
मालखेड खु
मोझर
चिकणी
उत्तरवाढोना
सोनखास
लासीना
बोरगाव
दिघोरी
कापशी
ढवळसर
आंमोरा
बोरीअरब
यवतमाळ कडे
धुई
मारकुंड
बागवाडी
धाणी
वरोटावाटा
यवतमाळकडे
मंगरुळ तालुका
केळापूर तालुका
लोहकरवाडी
दारव्हा तालुका
सडक
रेल्वे
कोलामांची वस्ती असलेले गाव
पुसद तालुका
पुसदकडे
किजवट तालुका

## महाराष्ट्र आणि कोलाम

महाराष्ट्र होण्यापूर्वी बहुसंख्य कोलाम मध्यप्रदेशात होते. १९३१ मध्ये मध्य-प्रांत-वऱ्हाडात गोंड, कोरकू, प्रधान, कवर, हलबा, कोळ, सावरा, आंध, बिंझवर, कारियाभुमिया, कोळी, मारिया, बैगा, कोलाम, भील, धनवर, भैना, कमार, मझवर, भुंजिया, ओराओन, नगारची, ओझा, खरिया, मुरिया, भुइनहार, नागासिया, सऊंता, भगा, कोटवा, पारजा व कोया अशा ३२ जाती आदिवासी म्हणून नोंदविल्या आहेत. यांतील आता बऱ्याचशा हिंदी प्रदेशातील भागात राहतात. विदर्भात फारच कमी जाती राहतात. यांपैकी विदर्भाच्या मुख्य आदिवासी जाती गोंड, कोरकू, प्रधान, आंध आणि कोलाम ह्या आहेत.

महाराष्ट्र राज्य झाल्यावर विदर्भ त्यात समाविष्ट झाला. १९६१ मधील शिरगणतीप्रमाणे महाराष्ट्रात ६१ जमातींची नोंद आदिवासी म्हणून केली आहे. त्यांत संख्येच्या दृष्टीने कोलाम जमातीचा क्रमांक १३ वा आहे. मध्यप्रदेशात तो १४ वा होता. महाराष्ट्र राज्यातील आदिवासींची एकूण संख्या २३,९७,१५९ असून या राज्यातील ४३,७८८ कोलाम पूर्ण आदिवासींच्या तुलनेने शेकडा १.८३ इतके आहेत.

## यवतमाळ जिल्हा आणि कोलाम

यवतमाळ जिल्ह्यात १९०१ मध्ये ब्राह्मण ( शे. २ ), राजपूत ( शे. १ ), वाणी ( शे. १ ), कायस्थ प्रभू ( ·०३ ), गवळी ( शे. ३ ), कुणबी ( शे. २२ ), माळी ( शे. ४ ), मराठा ( शे. १ ), मुनुरवार ( शे. १ ), सोनार, ( शे. १ ), सुतारवाढी ( शे. १ ), कोमटी ( शे. १ ), न्हावी ( शे. १ ), भोई ( शे. १ ), वेलदार ( शे. १ ), धनगर ( शे. ४ ), कलार ( शे. १ ) कोष्टी ( शे. १ ), लोहार ( शे. १ ), तेली ( शे. ३ ), बंजारा ( शे. ६ ), चांभार ( शे. १ ), धोबी ( शे. १ ), कुंभार ( शे. १ ), महार ( शे. २ ), मांग ( शे. १ ) व मुसलमान ( शे. ५ ) ह्या आदिवासींव्यतिरिक्त जाती होत्या. यांत सर्वांत जास्त संख्या कुणब्यांची होती. आदिवासींची संख्या त्याखालोखाल ( शे. १७ ) असून त्यांत गोंड ( शे. ८ ), कोळी ( शे. १ ), आंध ( शे. ४ ), कोलाम ( शे. ३ ) व प्रधान ( शे. २ ) यांचा समावेश होता. एकूण आदिवासी ८१,८०३ होते.

१९५१ मध्ये यवतमाळ जिल्ह्याची लोकसंख्या ९,३१,९८२ होती. तीपैकी ३१,५९८ ही लोकसंख्या कोलामांची असून एकूण संख्येशी तिचे प्रमाण शे. ३·८ इतके होते. १९६१ च्या शिरगणतीप्रमाणे या जिल्ह्याची लोकसंख्या १०,९८,४७० आहे. त्यांत आदिवासी म्हणून १,५५,६०९ लोकांची नोंद आहे. त्यांतील ४१,०१३ कोलाम आहेत व ही संख्या एकूण आदिवासींच्या मानाने शे. २६·४ आहे. जिल्ह्यातील एकूण

संख्येशी कोलामांच्या संख्येचे प्रमाण शे. ३·७ आहे. पुसद व दारव्हा तालुक्यांतील कोलामांची नोंद न घेतल्यामुळे हे प्रमाण १९५१ पेक्षाही कमी दिसत आहे.

१९४१ साली यवतमाळ जिल्ह्यात शे. १७·८ आदिवासी होते. १९३१ साली हे प्रमाण शे. १८·७ होते.

## यवतमाळ जिल्ह्यातील आदिवासी व कोलाम

१९६१ साली यवतमाळ जिल्ह्यात असलेले आदिवासी असे :—

| जमात | संख्या (यवतमाळ जिल्हा) | महाराष्ट्रातील संख्या |
|---|---|---|
| (१) गोंड | ८५,८०३ | २,७२,५६४ |
| (२) कोलाम | ४१,०१३ | ४३,७८८ |
| (३) प्रधान | २२,२८० | ३२,२३७ |
| (४) आंध | ४,३१३ | ६०,२६१ |
| (५) पारधी | १,२३६ | २१,४१७ |
| (६) हलबा | ६७४ | ५,४३० |
| (७) कवर | १०१ | २,९१५ |
| (८) कोल | ५३ | ५३ |
| (९) धनवर | ४० | ४० |
| (१०) बिन्हूळ | २२ | २२ |
| (११) भैना | १२ | १२ |
| (१२) बिंझवर | ७ | २४ |
| (१३) भत्रा | ३ | ३ |
| (१४) ओराओन | १ | १ |

संपूर्ण महाराष्ट्रात कोल, धनवर, बिन्हूळ, भैना, भत्रा व ओराओन ह्या जमाती फक्त यवतमाळ जिल्ह्यात व त्याही अत्यल्प आहेत. बिझवर जमात चांदा, अमरावती व यवतमाळ या जिल्ह्यांत आहे. हलबा जात चांदा व यवतमाळ या दोनच जिल्ह्यांत आहे. प्रधान ही जमात यवतमाळ, चांदा व नांदेड या तीन जिल्ह्यांत असून यवतमाळात ती जास्त आहे. आंधांची वस्ती परभणी, नांदेड आणि यवतमाळ या तीनच जिल्ह्यांत आहे. पारधी ही भटकी जमात जळगाव, सोलापूर, धुळे, पुणे, नगर, यवतमाळ व नासिक या ७ जिल्ह्यांत आढळते. यवतमाळ जिल्ह्यातील अदिवासींमध्ये कोलाम ही जमात संख्येने दुसऱ्या क्रमांकाची आहे. या जिल्ह्यात गोंडांचा पहिला क्रमांक लागतो. महाराष्ट्रात जास्त गोंड चांदा जिल्ह्यात असून यवतमाळचा या दृष्टीने दुसरा क्रमांक

लागतो. त्याशिवाय नांदेड व अमरावती या जिल्ह्यांतूनही गोंड राहतात. कोरकू, भुंजिया, कोया, नागेसिया आणि थोती ह्या विदर्भाच्या अन्य जिल्ह्यांतील जमाती यवतमाळ जिल्ह्यात नाहीत.

यवतमाळ जिल्ह्यातील आदिवासींचे तालुकावार आकडे १९६१ मध्ये असे आहेत–

| | पुरुष | स्त्रिया | एकूण |
|---|---|---|---|
| **यवतमाळ तालुका** | | | |
| एकूण लोक | १,०५,९३६ | १,०१,४३० | २,०७,३६६ |
| आदिवासी ( खेडे विभाग ) | २४,८६० | २५,१०४ | ४९,९६४ |
| **केळापूर तालुका** | | | |
| एकूण लोक | ९८,८७९ | ९८,३९१ | १,९७,२७० |
| आदिवासी ( खेडे विभाग ) | ३०,२२९ | ३०,४८२ | ६०,७११ |
| **वणी तालुका** | | | |
| एकूण लोक | ८७,९४७ | ८५,७२७ | १,७३,७७४ |
| आदिवासी ( खेडे विभाग ) | २०,१३९ | २०,६६९ | ४०,८०८ |
| ( दारव्हा व पुसद तालुक्यांतील आदिवासींची नोंद नाही. ) | | | |
| एकूण आदिवासी | ७७,३१५ | ७८,२९४ | १,५५,६०९ |
| खेडे विभाग–एकूण आदिवासी | ७५,२३८ | ७६,२५५ | १,५१,४८३ |
| शहर विभाग–एकूण आदिवासी | २,०८७ | २,०३९ | ४,१२६ |

कोलामांचे तालुकावार आकडे मिळाले नाहीत. मात्र १९५१ मधील आकडे पुढीलप्रमाणे आहेत:—

| तालुका | एकूण संख्या | कोलाम | | | शे. प्र. |
|---|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | एकूण | |
| १ यवतमाळ | १,७७,४५७ | ६,२८७ | ६,९१६ | १३,२०३ | ७·४ |
| २ केळापूर | १,६६,७२० | ५,६५९ | ४,८५७ | १०,५१६ | ६·४ |
| ३ वणी | १,५४,९६९ | २,९३५ | २,५७७ | ५,५१२ | ३·६ |
| ४ दारव्हा | २,११,२५९ | १,०३८ | १,०१५ | २,०५३ | — |
| ५ पुसद | २,२१,५७७ | ५२ | २६२ | ३१४ | — |
| | | १५,९७१ | १५,६२७ | ३१,५९८ | |

## यवतमाळ जिल्ह्याची भौगोलिक माहिती

कोलामांच्या दाट वस्तीच्या या जिल्ह्यातून पूर्व रेखांश ७८ ची रेषा गेलेली असून उत्तर अक्षांश २० ची रेषा गेलेली आहे. हा जिल्हा महाराष्ट्र व आंध्र या राज्यांच्या

सीमाभागात वसला आहे. या जिल्ह्याच्या उत्तरेस अमरावती जिल्हा, पूर्वेस वर्धा नदी व तिच्या पलीकडे वर्धा आणि चांदा हे जिल्हे, दक्षिणेस पैनगंगा नदी आणि तिच्या पलीकडे नांदेड, आदिलाबाद व चांदा हे जिल्हे आणि पश्चिमेस आकोला जिल्हा व परभणी जिल्ह्याचा काही भाग आहे. या जिल्ह्याची लांबी पूर्वपश्चिम १२० मैल व रुंदी दक्षिणोत्तर ८८ मैल आहे. या जिल्ह्याचे क्षेत्रफळ ५,२४८ चौ. मैल असून दर चौरस मैलास २१० लोक राहतात. लोकसंख्येची घनता एकंदरीत विरळ आहे. महाराष्ट्रात हेच प्रमाण ३३४ आहे. या जिल्हयात एकूण गावे १,६४२ असून त्यांत ८ नगरपालिकांची मोठी गावे आहेत. शहरात राहणारे लोक शे. १२·६ असून खेड्यात शे. ८७·४ लोक राहतात.

यवतमाळ हा महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील मागासलेला व डोंगराळ वस्तीचा जिल्हा आहे. या जिल्हयात अजिंठ्याचे फाटे पूर्वपश्चिम पसरलेले आहेत. ते उंच नसले तरी जंगलांनी व्याप्त आहेत. समुद्रसपाटीपासून हा जिल्हा सरासरी १२०० फूट उंच असला तरी काही ठिकाणे २ हजार फुटापर्यंत उंच आहेत. उत्तर सरहद्दीवरील वर्धा व बेंबळा या नद्यांचे खोरे व दक्षिणेकडील पैनगंगा व पूस नदीचे खोरे वगळले तर जिल्ह्यात डोंगर कोठेही दिसतील ! मात्र वणी तालुक्याचा पूर्व भाग, दारव्हा तालुक्याचा पश्चिम भाग व पुसद तालुक्याचा काही भाग सपाट व बराच पिकाऊ आहे. यवतमाळ व केळापूर हे तालुके अधिक डोंगराळ आहेत. पठारी भागातील आणि सपाट प्रदेशातील जमिनी बऱ्यापैकी असून ज्वारी व तूर या धान्यासाठी हा जिल्हा प्रसिद्ध आहे. कापूसही बराच पिकतो. वाघ, बिबळे, लांडगे, रानडुकरे, हरणे, रोही इत्यादि जंगली प्राणी या जिल्ह्यात आढळतात. या जिल्ह्यात पाऊस सुमारे २५ ते ३५ इंच पडतो. पिके पावसावर अवलंबून असतात. जंगली भागातून जंगली उत्पन्न मिळते. चांदा व परतवाडा यांच्या नंतर यवतमाळचे सागवानी लाकूड इमारतींसाठी विदर्भात वापरले जाते. दगडी कोळसा, लोखंड, फरशीचे दगड हे खनिज पदार्थ वणीच्या बाजूस सापडू शकतात. पण अजून तसे प्रयत्न यशस्वीरीत्या करण्यात आलेले नाहीत. वणी-जवळ राजूरला चुन्याचे दगड विपुल आहेत व त्यामुळे चुन्याचा व्यापार वणीस फार चालतो. सिमेंटचा कारखाना या भागात होऊ घातला आहे. कापसाचे जीनप्रेस १०-१२ ठिकाणी आहेत. सुती कापडाची गिरणी निघू घातली आहे. पण हे उद्योगधंदे शहरात निघाले वा निघत आहेत. खेडूत आणि आदिवासी अशा योजनांपासून दूर आहेत.

या जिल्ह्यात दळणवळणाच्या सोयी विशेष आणि विपुल नाहीत. बऱ्याच गावांना जोडणाऱ्या सडका नाहीत. त्यामुळे प्रवास व व्यापार वाढण्यास अडथळे आहेत. लोहमार्ग या जिल्ह्यात १९०९ पर्यंत नव्हते. व्यापारी मालाच्या नेआणीच्या हेतूने एक

छोटा लोहमार्ग मुर्तिजापूर ते यवतमाळ असा सुरू झाला. पण तो प्रवाशांच्या सोयीचा तितकासा नाही, हा अनुभव आहे. राजूरा–वणी–चांदा हाही लोहमार्ग व्यापाराच्या दृष्टीनेच अधिक उपयुक्त आहे. एरवी जिल्ह्यात लोहमार्ग नाहीत. गरज मात्र मोठी आहे.




## यवतमाळ जिल्ह्याचे ऐतिहासिक विशेष

यवतमाळ भागात प्राचीन काळी इंद्र, गृत्समद यांचा संचार होता असे दिसते. ऐतिहासिक काळातील या भागाच्या इतिहासाचे दुवे आरंभी तरी पुसट आहेत. वाकाटकादि राजे विदर्भात होऊन गेले, एवढाच मोघम उल्लेख या जिल्ह्याच्या संदर्भात करता येईल. यादवांच्या पूर्वी हा भाग चांद्याच्या गोंडांच्या ताब्यात होता. कदंबगिरीग्राम नामक स्थानी असलेला किल्ला ( कळंबच्या दक्षिणेस ५ मैल ) प्राचीन स्थापत्याचा नमुना असून तो दोन हजार वर्षांपूर्वी बांधला असावा. माहूर ( यवतमाळ जिल्ह्याच्या हद्दीपासून ३ मैलांवर किनवट तालुक्यात ) व कळंब येथील किल्ले जुने आहेत. ते विदर्भाच्या दक्षिण भागाचे संरक्षक होते. १२ व्या शतकात यादवांचे राज्य या भागात असल्याचे राणीउमरावतीच्या सूर्यमंदिरावरून आणि कळंब येथे सापडलेल्या नाण्यांवरून व अस्तित्वात असलेल्या किल्ल्यांवरून सिद्ध झाले आहे. फरिश्ताच्या नोंदी

व रघुजी राजाच्या कथा या भागातील इतिहासावर प्रकाश टाकतात. कळंब व माहूरचे किल्ले अहंमदशहाने घेऊन देवळांच्या जागी मशिदी बांधल्या. हा काळ १५ व्या शतकातला आहे. पूस नदी आणि पुसद पुराणप्रसिद्ध आहे. अकबर आणि मोगल यांच्या राज्याचे एक सरकार ( जिल्हा ) कळंब येथे होते. भांब, केळापूर, वणी या भागात भोसल्यांचे राज्य असल्याच्या कथा आहेत. काहींना इतिहासाचा आधार आहे. या भागावर पेशवे दौडत आले आणि नंतर निजामाच्या ताब्यात वऱ्हाड गेला. इंग्रजांच्या राजवटीतही गेल्या शतकात वऱ्हाडचे चार जिल्हे निजामाच्या ताब्यात होते. चालू शतकात तो भाग इंग्रजांचा झाला. प्रथम यवतमाळ जिल्हा नव्हता तेव्हा वणी हा जिल्हा होता. चालू शतकाच्या आरंभी वणीऐवजी यवतमाळ हा जिल्हा झाला.

# ३ : :

## जातीचे नाव

या जातीचे नाव ' कोलाम ' असे जवळच्या कोलामेतर लोकांच्या दृष्टीने रूढ आहे. परंतु हे नावसुद्धा सुशिक्षित व दूरचे लोक नीट उच्चारीत नाहीत. त्यामुळे या नावाबाबत बरेच घोटाळे होतात. इतरांना सांगतांना कोलाम लोक जातीचे नाव ' कोलाम ' असेच सांगतात. या जमातीचे सामान्यपणे माहिती असलेले हेच नाव असले तरी या जमातीची कमी माहिती असलेले लोक अनभिज्ञपणे त्याची गल्लत करतात.

### उपजाती नाहीत

वस्तुतः कोलाम ही सलग जात आहे. तिच्यात उपजाती नाहीत. त्यामुळे तर जातिनामाचा घोटाळा होण्याचे कारण नाही. परंतु दुर्लक्षित अशी ही जमात असल्यामुळे व मागासलेपणाने जनसंपर्कात फारशी न आल्यामुळे असे झालेले आहे.

उपजाती नसल्यामुळे कोलामांना आपसात शाखाभेदरूप जात विचारण्याची गरजच पडत नाही. त्यामुळे ' जात ' ह्या शब्दाचा वापर ते आपसात आडनाव विचारण्यासाठी करतात. 'कुल' वा 'कूळ' असाही शब्द आडनावासाठी त्यांच्यात आहेच !

## जातिनामाचे घोटाळे

तुरुंगात गेलेल्या शामा कोलामाचे नाव वऱ्हाडात वर्तमानपत्रांनी व वार्तांनी परिचित झाले. यवतमाळव्यतिरिक्त इतर भागातील लोक अशा वार्तांच्या आधारे 'कोलाम' हे आडनाव मानू लागले. अमरावती भागातील लोक 'कोलाम' हे आडनाव समजतात, असे दिसले. वस्तुतः कोलाम हे आडनाव नसून जातिनाम आहे.

सरकारी कागदपत्रांतील KOLAM चे 'कोलम' असे उच्चारण करून लिहिण्याची प्रवृत्ती काही जागी आढळते. प्रत्यक्ष माहितीच्या अभावी तसे होते, हे स्पष्ट आहे. हिरालाल–रसेल यांच्या आधारे डॉ. केतकरांनी या जमातीसंबंधी 'ज्ञानकोशा'त जी माहिती दिली तिचे शीर्षक 'कोलम' असेच देण्यात आले आहे.[1] मूळ इंग्रजीचे मराठीकरण आपल्या पद्धतीने केल्यामुळे ही चूक झाली. 'महाराष्ट्र–सांवत्सरिका'त श्री. म. माटे यांनी भाषांची जी यादी दिली, तीत या जमातीच्या भाषेचे नाव 'कोलमी' असे दिले आहे.[2] शं. ह. देशपांडे यांनी 'विदर्भातील आदिवासी' हा लेख 'हंस'च्या आक्टोबर १९६४ च्या अंकात लिहिला.[3] त्यात त्यांनी 'कोलमनी गोंड' असे उल्लेख केलेले आढळतात. हा लेख ओझरत्या उल्लेखांचा व धावता असला तरी त्यातून या जमातीचे नाव 'कोलमनी (–णी)' किंवा 'कोलम' (–नी गोंड) असे प्रकटले, ते चुकीचे आहे.

मुंबई नभोवाणीवर (३१–७–६४ ?) झालेल्या एका कार्यक्रमात 'कोलम' असा एकदोनदा उल्लेख झाला, तोही चुकीचा आहे.

'कोळम' असेही या जमातीचे उल्लेख काही वेळा करण्यात येतात. मुंबई नभोवाणीने (३१–७–६४ ?) दिलेल्या माहितीत 'कोलम,' 'कोळम' असे या जातीचे नाव उच्चारले गेले व त्यांच्या भाषेला 'कोळंबी' असे म्हटले, ते बरोबर नाही. विदर्भातील कोणत्याच भागात 'कोळम' किंवा 'कोळंबी' हे शब्द या संदर्भात प्रचारात वा माहितीत नाहीत. 'आदिवासींचा प्रश्न : विदर्भातील कार्य' या महाराष्ट्र सरकारच्या प्रसिद्धी विभागाच्या पुस्तिकेतही 'कोळम' असेच या जातीचे नाव छापलेले आहे. ते चूक आहे, हे सांगवयास नकोच !

या जातीच्या नावाचे उच्चारण काही लोक 'कोलमा' किंवा 'कोल्हमा' असे करतात. परंतु हे दोन्ही उच्चार चुकीचे आहेत. नागपूरचे काही थोडे लोक या जमातीचे नाव ऐकून आहेत. त्यांच्यात हा उच्चार आढळला.

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४.

२. श्री. म. माटे (संपादक) : महाराष्ट्र सांवत्सरिक (१९३३) परिशिष्ट.

३. शं. ह. देशपांडे : 'हंस' मासिक, ऑक्टोबर १९६४, लेख— 'विदर्भातील आदिवासी'.

काही लोक या जमातीचे नाव 'कोल्हाम' आहे असे चुकीने समजतात. 'कोल्हम' किंवा 'कोल्हामा' असे या जमातीचे नाव असावे असाही काहींचा गैरसमज झालेला आहे.[१] ही नावे या जमातीची अर्थात नाहीत.

'कोलामा' असा या जमातीच्या नावाचा काहीजण उच्चार करतात. परंतु या जमातीचे ते नाव नाही. उलट 'कोलाम' या शब्दाचे ते स्त्रीलिंग असल्याचे कोलामी भाषा सांगते. 'कोलाम जमातीची स्त्री' असा 'कोलामा' या शब्दाचा अर्थ आहे. 'पत्नी' असाही दुसरा अर्थ या 'कोलामा' शब्दाचे अर्थान्तर होऊन झालेला आहे.

## कोलाम आणि कोलावान

या जमातीचे खरे नाव 'कोलाम' आणि 'कोलावान' असे आहे. इतरांना 'कोलाम' हेच नाव या जमातीचे माहीत आहे व ते तसे सांगण्याची या लोकांची रीतही आहे. आपसात बोलतांना मात्र हे लोक 'कोलावान' असे आपणास म्हणवून घेतात. 'कोलावान' हा एकवचनी शब्द असून 'कोलावार' हे त्या शब्दाचे अनेकवचन आहे.

## जातिनामाची उकल

'कोलाम' वा 'कोलावान' हे या जमातीचे नाव कसे पडले असावे, हा प्रश्न आहे. या जातीच्या इतिहासाची माहिती कोणालाच नाही. त्यामुळे जातिनामाचा खुलासा इतिहासाच्या आधारे करता येत नाही.

कोलाम लोक मूळचे निलगिरी जिल्ह्यात असलेल्या कोलंबाई टेकड्यांतील असावेत असा हिरालाल यांचा एक तर्क आहे.[२] परंतु या नामसादृश्यामुळे 'कोलाम' या नावाचे कोलंबाई हे मूळ ठरत नाही, असे माझे स्पष्ट मत आहे. कारण कोलामांच्या वस्तीची आजची घनता इकडे यवतमाळ भागात असतांना दूरस्थ निलगिरी भागात कोलामांचे मूळ संभवणे अशक्य आहे. म्हणून त्या भागातील 'कोलंबाई' टेकड्यांचा व 'कोलाम' या नामाचा संबंध नाही, हे उघड आहे.

'कोलाम' हे ह्या जातीचे नाव कसे पडले असेल ह्याचा काहीसा अंदाज घेता येतो. संस्कृतमध्ये 'कोल' या शब्दाचा अर्थ 'डुकर' असा आहे. कोलामी भाषेत

---

१. शां. ब लोणकर : 'गावकरी' ( नासिक ), लेख—'कोल्हामांची गावबांधणी' दि. १७-९-१९६१.

२. Russell–Hira Lal : The Tribes and Castes of the C. P. of India, Vol. iii, पृ. ५२१-५२२.

‘अ’कारान्त उच्चारण बहुतेक ‘आ’कारान्त आढळते. डुकरे मारण्यात, डुकरांची शिकार करण्यात ही जमात अतिशय वाकबगार आहे. केवळ जाड्या काठीच्या मदतीने हे लोक रानडुकरांमागे सुसाट धावून त्यांना मारतात. रानडुकरांच्या मागे लागून त्यांची कुशल शिकार करणारा हा वर्ग ‘कोलाम’ किंवा ‘कोलावान’ या नावाने ओळखला जाऊ लागला असावा. ‘कोलावार’ हे कोलामसमूहाचे नाव ‘वार’वाचक जातिनामांशी मिळतेजुळते दिसेल. कापेवार, मुन्नूरवार असे लोक कोलामांच्या वास्तव्य-प्रदेशाच्या दरम्यान म्हणजे यवतमाळ–आदिलाबादेच्या सीमा-भागात आहेत. डुकरांमागे लागणारा व त्यांची शिकार करणारा वर्ग ‘कोलावार’ म्हणून ओळखला गेला असेल, तो या भागात व असाच! तामिळ भाषेतील ‘कोल’ या शब्दाचा ‘मारणे’ हा अर्थसुद्धा ‘डुकरांना मारणे’ असा दूरान्वयाने लावता येईल. कोलामी भाषेत द्राविडी भाषेची पूर्वरूपे आढळतात, या वस्तुस्थितीचा विचार केल्यास तामिळमधील ‘कोल’ या शब्दाचा आंशिक आधार ‘कोलाम’ या जातिनामाची उकल करण्यासाठी घेता येईल.

## गौण जातिनामे

यवतमाळ भागात कोलामांना ‘नाईक’ म्हणण्याची काही कोलामेतरांत पद्धत आहे. कोलामांच्या वसनिप्रमुखास वा न्यायप्रमुखास ‘नाईक’ असे म्हणतात आणि कोलामेतर लोक सर्वच कोलामांना अशा मोठ्या नावाने संबोधतात.

आदिलाबादेकडील कोलामांना गोंड लोक ‘भूमक’ असे संबोधतात. कोलामां-मध्ये ‘भूमक’ हे एक व्यवस्थापकपद आहे. गौरव म्हणून कोलामांना ‘भूमक’ म्हटले जात असावे किंवा ‘भूमी कसणारे’ म्हणून ‘भूमक’ म्हणत असावेत. ‘पुजारी’ म्हणून सिरपूरकडील कोलामांना गोंड लोक हाका मारतात. मंत्रतंत्र, जादूटोणा इ. पूजाप्रकारांचे ज्ञान कोलामांना असते, अशा भावनेने तिकडील कोलामांना गोंड लोक ‘पुजारी’ असे म्हणतात.

आदिलाबाद जिल्ह्यातील तेलगू लोक कोलामांना ‘मन्योड’ असे म्हणतात. त्यामुळेच तिकडील कोलाम इतर कोलामांपेक्षा थोडे वेगळे पडत गेले असावेत. विशेषतः चिन्नूर, सिरपूर या भागात हे घडते. तिकडे शेती करणारी ‘मन्ने पोड’ नामक एक जात आहे. त्यांच्यासारखेच कोलामही राहातात व शेती करतात, म्हणून ‘मन्योड’ हे नाव तेलगू लोकांनी तिकडील कोलामांना दिले असावे. टेकडीवरील कोलामांना ‘गुत्ता मन्योड’ असे या भागात म्हणातात. आदिलाबाद व नांदेड या जिल्ह्यांत ‘मन्नेवारलू’ या नावाने आढळणारे लोक कोलामच आहेत व १९६१ च्या शिरगणती-अहवालात त्यांची नोंद कोलाम म्हणून केली आहे.

४ : :

# इतिहास आणि मूळ वसतिस्थान

कोलामांच्या भाषेला लिपी नाही. त्यांचे कोणतेही वाङ्मय लिखित रूपात नाही. लोकगीते आणि कथा यांच्यावरूनही त्यांच्या इतिहासाची माहिती लाभत नाही. त्यांच्यासंबंधी इतिहास असा कोणताच, कोठेच उपलब्ध नाही. त्यांच्या जीवनावरून त्यांच्या इतिहासाचा अंदाज घेता येत नाही. इतिहास नसलेली, निदान ज्यांचा इतिहास माहीत नाही, अशी ही जमात आहे.

कोलामांच्या जीवनपटाचा गीतरूप नृत्यांचा कार्यक्रम त्यांच्या सणावारांमध्ये व विवाहांच्या वेळी होतो. त्याला कोलाम लोक इतिहास (कोलामी भाषेत 'वेता') म्हणतात. परंतु इतिहास असा तो नसतो. कोलामांनी मूळ वस्ती केल्यापासून तर स्थिर होऊन जीवन जगण्यापर्यंतच्या प्रक्रियांचे वर्णन या 'इतिहासा'त फार तर येते. कोलामांच्या पूर्वजीवनाचे दर्शन घडविण्यास हा इतिहास समर्थ नाही. मात्र या 'इतिहासा'वरून कल्पना येते की, ही जमात शिवीगाळ, आपसातील मतभेद इत्यादि कारणांमुळे वस्ती हलवी व नव्या वस्तीच्या आश्रयाला जाई. यावरून ही जमात भटकी होती असे मात्र मुळीच ठरत नाही. अशी स्थलांतराची उदाहरणे काही कोलामांच्या बाबतीत व अपवादादाखल घडत. एरवी कोलामांची कित्येक गावे कित्येक वर्षांपासून तीच असून ते स्थिर आहेत. पारधी, घिसाडखाती यांच्यासारखी ही जमात भटकी नव्हती व नाही. जंगलांच्या आश्रयाने वस्ती करून जंगली उत्पन्नावर, शिकारीवर व पठाराउतारावर कशीबशी शेती करून ही जमात जगत आलेली आहे.

भारतातील सर्वात जुने रहिवासी अनार्य या नावाने ओळखले जातात. आदिम जाती किंवा आदिवासी या शब्दातही 'भारतातील सर्वात प्राचीन रहिवासी' असा अर्थ अभिप्रेत आहे. भारतातील बहुतेक आदिवासी द्राविडियन वंशाचे मानले जातात. कोलाम ही जात या द्राविडियन वंशातील मानली जाते. या लोकांची भाषा द्राविडियन भाषांशी संबंधित असल्यामुळेच कोलामांना द्राविडियन समजले जावे, यात गैर काही नाही !

वंश कोणताही असो, आदिवासी हे भारतातील आद्य रहिवासी होत ! या रहिवाशांचा शूरपणा हा प्रामाणिक व पारंपारिक जीवनपद्धतीमुळे आर्यांपुढे, किंवा

नवनव्या सुधारपद्धतींना आत्मसात करणाऱ्या चाणाक्ष वर्गापुढे म्हणा हवे तर, कमी पडला व हार पत्करून आदिवासींना मागेमागे हटावे लागले. त्यांना डोंगरांच्या पायथ्याशी, पहाडावर किंवा दऱ्याखोऱ्यांतून आश्रय घ्यावा लागला. आज भारतातील बहुतेक सर्व आदिवासी डोंगराळ भागात असण्याचे हेच एकमेव कारण आहे. आर्य वा तत्सम वर्ग नद्याकाठच्या किंवा पिकाऊ जमिनीच्या प्रदेशात राहून सुखे मिळवीत राहिला. तो डोंगरांच्या अंतर्भागात धकाधकीचे, कष्टाचे जीवन कशाला जगतो ? तसले जीवन आदिवासींच्या नशिबी आले. अधिक कष्ट करून कसेबसे जगण्याशिवाय त्यांना काय साधणार ? रस्ते, सुधारणा किंवा उत्पन्न या सर्वांचीच प्रतिकूलता असलेल्या प्रदेशात, अगदी निर्जन, एकाकी व डोंगराळ भागात आदिवासी शतकानुशतके कसाबसा जगत राहिला !

विदर्भात सातपुडा व अजिंठा या डोंगरांच्या आश्रयाला आदिवासी राहतात. सातपुड्याच्या आश्रयाने कोरकू ही विदर्भातील एक मोठी आदिवासी जमात राहते. चांद्याच्या बाजूला व इतरत्रसुद्धा गोंड राहतात आणि तेही जंगली आणि ग्रामीण भागातच जास्त ! कोलाम ही वन्य जमातही यवतमाळ जिल्ह्याच्या डोंगराळ व जंगली भागात अधिक आहे. गोवाऱ्यांनाही असाच जंगली व डोंगराळ भाग आवडतो. आंध या गोष्टीस अपवाद नाहीत. डोंगराळ, जंगली, एकाकी व शांत अशा भागात हे लोक राहत असल्यामुळे त्यांची संस्कृती, राहणी व जीवन इतरांच्या संपर्कापासून अलग राहिले. विदर्भाच्या उत्तर भागांतील कोरकूंनी रावणाला व मेघनादाला देव मानले आहे. अमरावतीच्या इंद्राला रावणाने पराभूत केल्यावर मेघनादाकडे हा भाग व्यवस्थेसाठी रावणाने दिला. मेघनादाला आपला पूर्वपुरुष मानण्याकडे कोरकूंचा कल आहे. विदर्भाच्या डोंगराळ भागात आदिवासींच्या पूर्वसंस्कृतीची पदचिन्हे आजही अशा स्पष्टास्पष्ट स्वरूपात कोठे कोठे आढळतात. एकट्या यवतमाळ भागातील नुसती गावांची नावे पाहिली तरी ती मोठी अर्थपूर्ण व आदिवासी जीवनाशी निगडित वाटतात. वेगळेपणाने उठून दिसणारी ही गावे जंगली भागात, डोंगर-पठारांवर असून तेथे आदिवासींची वस्ती प्रामुख्याने आढळते. सालेभट्टी, कोळंबी, झटाळा, पारवा, घोरदरा, वाघदरा, अर्दवन, डोंगरखर्डा अशी कितीतरी नावे आदिवासी वैशिष्ट्यांनी युक्त वाटतील. झटाळा ( ता. केळापूर ) या गावात पूर्ण आदिवासी राहतात. जटायू या नावाशी तर या गावाचा संबंध नसेल ? जटायू, पारवा या नावांत 'पक्षी' आहेत. हे 'वन्य पक्षी' आपल्या या घरट्यांत राहत आले आहेत. पक्षी हे आकाशमार्गी आणि रावणही विमानप्रवासी ! कुणी सांगावे, विमानविद्येशी अशी नावे सुसंगत कशावरून नसतील ? रावण, त्याचे वंशज आणि आदिवासी यांचा असा अन्योन्य संबंध कदाचित असेलही ! घोरदरा, वाघदरा, ही नावे शूरत्वाची व वन्य वातावरणाची निदर्शक आहेत. घोर दरा असो की वाघाची दरा असो, वास्तव्यासाठी आदिवासी ती जागा निवडीत ! कोळंबी या गावाचे आणि कोलाम जमातीचे

काही नाते असू शकेल ! कोळंबीला कोलाम आहेत. रायसा किंवा रासा ह्या नावाची गावे फक्त आदिवासींच्या वस्तीची आढळतात. अशी ही डोंगरी व वनवासी जनांची गावे आपल्या खुरट्या घरांच्या बुटक्या मानांना उंचावीत आणि आपली वैशिष्टये दाखवीत जगत आली आहेत !

सातपुड्याच्या दक्षिणेस असलेल्या पूर्वीच्या दंडकारण्यातील आणि आजच्या विदर्भाच्या आग्नेय भागातील कोलाम असावेत असे निश्चितच वाटते. परंतु विदर्भाच्या बाहेर, विदर्भाच्या अगदी दूर ही जमात आरंभी राहत असावी असे रावबहादूर हिरालाल यांचे म्हणणे आहे. ' दी ट्राइब्ज अँड कास्ट्स् ऑफ दि सेंट्रल प्रॉव्हिन्सेस् ऑफ इंडिया ' या पुस्तकात पुढीलप्रमाणे मजकूर आहे— " Hira Lal suggests that the Kolams may be connected with the Kolas, a tribe akin to the Todas and as low in the scale of civilisation, who regard the Kolambai hills as their original home. He further notes that the name of the era by which the calendar is reckoned on the Malabar coast is Kolamba." [१]

कोलंबाई नामक शिखर समुद्रसपाटीपासून ५६०० फूट उंचीवर निलगिरी जिल्ह्यात ( मद्रास राज्य ) आहे.[२] या जागेचा, त्या भागात राहणाऱ्या लोकांचा व कोलामांचा हा मूळ संबंध अनाठायी जोडण्यात येतो, असे वाटते. कोलामांचे आजचे वास्तव्य व हा दूरस्थ प्रदेश यांचे अतीव अंतर, कोलामांचे एवढ्या दूरचे स्थलांतर अशक्य, अशा काही कारणांमुळे तर हे अशक्य वाटतेच; परंतु केवळ नामसादृश्यामुळे हे नाते जोडणेही अप्रशस्त दिसते. मलबार किनाऱ्यावरील ' कोलंबा ' वर्षगणनपद्धती आणि कोलंबाई टेकड्या यांच्याशी जर कोलामांचे नाते जोडता येत असेल तर मग भारताबाहेरील कोलमपूरशीही ते जोडता येऊ शकेल. आणि असे नावावरूनच नाते जोडायचे झाले तर यवतमाळ जिल्ह्यातील ' कोलाम ' ( आता उजाड गाव, ता. यवतमाळ ) व कोळंबी या गावांशी जोडणे संयुक्तिक होईल. ही गावे कोलाम या शब्दाशी समानोच्चारी असून या गावांच्या आसपासचे राहणारे हे लोक आधीपासूनचे आहेत, असे म्हणणे अधिक संयुक्तिक होईल. तेव्हा, कोलाम लोक दक्षिणेकडील इतक्या दूरचे मूळचे नसावेत, हे स्पष्ट आहे. कोलामी भाषेत द्राविडी भाषांची मूळ रूपे आहेत. कोलाम ती रूपे आणायला गेले नाहीत. ते शक्यही नाही. उलट कोलामांपासून

---

१. Russell, Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, vol. III, ( London, 1916 ) पृ. ५२१-५२२

२. W. W. Hunter : The Imperial Gazetteer of India, Vol. VIII ( London, 1886 ); पृ. २७२

ती दक्षिणेकडे गेली असावी, असे म्हणणे उचित होईल. कारण ही अडाणी जात इतक्या दूरवर जाणार नाही.

ग्रियर्सनने निलगिरीतील तोडा जमातीच्या भाषेशी कोलामीचा संबंध जोडल्यामुळे वरील विधान हिरालाल यांनी केले आहे. ग्रियर्सनची माहिती आता जुनी झाली आहे. कोलामी ही अनेक द्राविडी भाषांची जननी ठरण्याची आणि सिद्ध करून ठरविण्याची आज परिस्थिती आहे. अशा स्थितीत एकट्या तोडा भाषेशी व ती भाषा बोलणाऱ्या लोकांशी कोलामांचे नाते जोडून त्यांचे मूळ वास्तव्य त्याच एका भागाशी निगडित करण्याचे कारण नाही.

कोलामी भाषा द्राविडी असून तिच्यात तेलगू या द्राविडियन भाषेचे शब्द इतर भाषांच्या मानाने जास्त आढळतात. यावरून ही कोलाम जमात तेलगू भागातून निकटच्या चांदा, यवतमाळ, वर्धा या सरहद्द भागात पसरली असेल, असा एक तर्क करता येऊ शकतो. परंतु केवळ कोलामीतील तेलगू भाषेच्या अधिक शब्दांमुळे हे प्रमेय सिद्ध होणे कठीण आहे. यवतमाळ भागातील कोलामी भाषेत मराठी शब्द अधिक आले आहेत, त्यावरून ती भाषा मराठीशी संबंधित आहे असे ठरत नाही. साहचर्याचा तो प्रभाव आहे, एवढेच फार तर म्हणता येईल. कोलाम लोकांची दाट वस्ती यवतमाळ जिल्ह्यात आहे व तेलगू भागात ती विरळ आहे. विरळ भागातून हे लोक आले असतील असे म्हणवत नाही. उलट आर्यांनी आदिवासींना दक्षिणेकडे लोटत नेले, तेव्हा ते डोंगरांत स्थिरावत गेले. म्हणूनच 'हे लोक वऱ्हाडच्या चारही जिल्ह्यांत[१] आधी असतील व मग अधिक डोंगराळ अशा यवतमाळ भागात वसत गेले असावेत असे अनुमान सेतुमाधवराव यांनी काढले आहे.[२] वऱ्हाडच्या अमरावती, अकोला, बुलढाणा व यवतमाळ या चारही जिल्ह्यांत हे लोक आधी होते की नव्हते हा प्रश्न बाजूस ठेवला तरी, आदिवासींची वसण्याची प्रक्रिया उत्तरेकडून दक्षिणेकडे स्थलांतरित होऊन घडली असे म्हणणे अधिक योग्य होईल. यवतमाळ जिल्ह्यातून राजुरा ( जि. चांदा ) व आदिलाबाद या तालुक्यांत बरीच कोलाम-कुटुंबे जाऊन स्थिरावली असे खुद्द कोलाम सांगतात. फार काय, उतनूर ( जि. आदिलाबाद ) या जंगली व आदिवासी भागातही बरेच कोलाम इकडून गेले अशी माहिती मिळालेली आहे. स्वजातीव्यतिरिक्त भाषा, राहणी व संस्कार यांबाबत आदिलाबादेच्या उतनूर, सिरपूर या तालुक्यांतील कोलाम तेलगू लोकांपेक्षा मराठी लोकांना जवळचे आहेत.

---

१. 'मध्यप्रांत-वऱ्हाड' या नावाचा प्रांत होता तेव्हा अमरावती, अकोला, बुलढाणा व यवतमाळ या चार जिल्ह्यांच्या प्रदेशाला 'वऱ्हाड' म्हणण्यात येई.

२. P. Setu Madhao Rao : A Grammar of the Kolami Language ( Hyderabad, 1950 ), प्रस्तावना

उतनूर तालुक्यातील कोलाम दुय्यम भाषा मराठीच अधिक बोलतात. गुन्हेगार ठरणारे काही लोक जुन्या मोगलाईत उतनूरच्या जंगली भागात जाऊन राहत. तसेच जगण्यासाठी जंगले प्रिय असल्यामुळे इकडून गेलेले लोक तिकडच्या जंगलांत वसत, अशी माहिती आदिलाबाद भागात मिळाली. चिन्नूर तालुक्यातील व सिरपूरच्या काही भागातील कोलाम मात्र पक्के 'तेलगू' होऊ लागले आहेत. इकडूनच ते गेले, असे विधान धारिष्ट्यपूर्वक करता येत नाही; तरीपण ते आदिलाबादेकडून पुढे सरकले नसतीलच असेही नाही.

यवतमाळ भागातील कोलामेतरांना कोलामांची थोडीबहुत माहिती आहे; परंतु तेलगू प्रदेशात कोलामांच्या जातीच्या नावांचीही माहिती कोलामेतरांत कमी आहे. काही भागात ते आपल्यातल्या शेतकऱ्यांच्या जातीचेच त्यांना समजतात. काही जण त्यांना 'पुजारी' म्हणतात. याचा अर्थ हा की, या जातीची फार कमी माहिती इतरांना त्या भागात आहे. म्हणजेच नेहमीच्या संपर्कातील व माहितीतील ही जमात तिकडे नाही. नवागत लोकांच्या बाबतीत असे होणे अधिक शक्य आहे. दीर्घकाळापासून स्थिर झालेल्या जमातीची माहिती अधिक असते. कोलामांची माहिती तिकडे ज्याअर्थी कमी, त्याअर्थी कोलाम तिकडचे मूळचे नसावेत, हा अंदाज! भीमपूर खोऱ्याचा शोध घेऊनही यापेक्षा अधिक माहिती मिळेल असे वाटत नाही. फार तर असे म्हणता येईल की, यवतमाळ भागात जेव्हा कोलाम स्थिर झाले, तेव्हापासूनच वा तेव्हाच ते निकटच्या आदिलाबादेच्या सलग भागातील जंगलांतही स्थिर झाले. म्हणजेच तेलगू भागातून कोलाम उत्तरेकडे स्थिर झाले, हे खरे नव्हे! यवतमाळ व यवतमाळजवळील जंगली भूभाग हा कोलामांचा मूळ वास्तव्यप्रदेश असावा, असे यावरून म्हणावयाचे!

संपूर्ण वऱ्हाडात (जुन्या वऱ्हाडात = अमरामती, अकोला, बुलढाणा व यवतमाळ या चार जिल्ह्यांत) आधी कोलाम असतील, असेही वाटत नाही. जर तसे असते तर ते सातपुड्यातील डोंगरांत कोरकूंसह वसले असते. परंतु त्या भागात एकही कोलाम नाही. चांदा जिल्ह्यात गेलेले कोलाम यवतमाळ भागातीलच आहेत. तेव्हा पूर्ण वऱ्हाड वा पूर्ण विदर्भ हा या जमातीचा मूळ वसतिप्रदेश असावा असेही म्हणणे उचित होईलसे वाटत नाही.

अकोला, बुलढाणा, अमरावती व यवतमाळ या चार जिल्ह्यांमिळून झालेल्या जुन्या वऱ्हाडत पूर्व वा आग्नेय टोकाला असलेल्या यवतमाळ जिल्ह्यात कोलामांची वस्ती प्रमुखतया आहे. या जिल्ह्याचे मुख्य ठिकाण यवतमाळ हे शहर उंच जागी डोंगरांत वसले आहे. पन्नाससाठ वर्षांपूर्वी 'येवते' हे 'माळा'वरचे लहानसे खेडे होते. या शहराच्या पश्चिमेस दोनतीन कोसांवर लासीना हे गाव आहे. हा भाग कोलामांच्या

मूळ वास्तव्याचा भाग असावा. इतर काही पुरावे उपलब्ध नसल्यामुळे कोलामांच्या आदिवास्तव्याची निश्चित माहिती मिळत नाही हे खरे; परंतु लासीना गावाजवळच्या जंगली डोंगरांवर कोलामांचे पूर्वज वस्ती करीत होते, असे खुद्द काही कोलामच सांगतात. या डोंगराचे नाव ' कोलाम डोंगर ' असे कोलामांमध्ये प्रचलित आहे. लासीना, यवतमाळ व या भागाचे डोंगर हे कोलामांच्या वस्तीचे मध्यवर्ती ठिकाण पूर्वीपासून आजपर्यंत राहिलेले दिसते. आज तर या भागाच्या आसपास कोलामांची वस्ती असलेली बहुतेक सर्वच खेडी आहेत व ती डोंगरी भागात आहेत. या ' कोलाम ' टेकडीच्या पश्चिमेस १०-२० मैलांपर्यंत कोलामांच्या वस्ती आहेत. पण त्या पश्चिमेकडील सपाट प्रदेशाची सुरुवात होते तेथवर विरळ होत जाऊन संपल्या आहेत. यवतमाळच्या पश्चिमेस यवतमाळ तालुक्यात भरपूर कोलाम आहेत. ते दारव्हा तालुक्यात लगतच्या भागातही पश्चिमेकडे असून नंतर कमी झाले. परंतु लासीना–यवतमाळचा परिसर कोलामांनी गजबजून गेला आहे. उत्तरेकडे सावर-बाभूळगावपर्यंत डोंगरी भाग त्यांनी व्यापला आहे. दक्षिणेकडे पैनगंगातीराच्या जवळपास ते पोहोचले आहेत. यवतमाळ-लासीना या भागाच्या पूर्वेस, विशेषतः आग्नेयेस हे लोक डोंगरपट्टी पसरत गेली तसतसे वसत गेले. ते यवतमाळच्या पूर्वेस नांझा, जोडमोहा, डोंगरखर्ड्यापर्यंत घनस्वरूपात वसले आहेत. कळंब-बाभूळगावच्या उत्तरेस सुपीक भागात नसले तरी वर्धा-आर्वी तालुक्यांतील डोंगरी भागात याच भागातून ते पसरत गेले आहेत. एकंदरीत यवतमाळ तालुका व त्या तालुक्याचा गर्भभाग बव्हंश कोलामांच्या वस्तींनी व्याप्त आहे. सर्वात जास्त कोलाम याच तालुक्यात राहतात. ' वणी तालुक्यात कोलाम जास्त राहतात ' हा गैरसमज पूर्वलेखन करणाऱ्या लेखकांचा झाला. कारण वणी जिल्ह्यातील कोलामांच्या आधिक्याची घेतलेली नोंद, वणी जिल्हा तुटून यवतमाळ जिल्ह्यात सामावलेल्या वणी तालुक्याच्या नावावर चुकून हे लेखक घेत गेले. तरीपण, यवतमाळच्या पूर्वेकडील केळापूर तालुक्यात यवतमाळ तालुक्याच्या खालोखाल कोलाम आहेत व त्या खालोखाल वणी तालुक्यात आहेत. यवतमाळ ते वणी हा डोंगरपट्टाच अधिक कोलामांनी आपल्या वास्तव्यासाठी आधीपासून निवडलेला दिसतो. वणी शहराच्या पूर्वेकडे, दक्षिणेकडे व उत्तरेकडे सुपीक आणि सपाट भाग असून तेथे कोलाम जवळजवळ नाहीत. वणी-केळापूरच्या दक्षिणेस आदिलाबाद भागात मात्र त्यांची वस्ती होत गेली व पुढे पुढे ती विरळ झाली.

तेव्हा यवतमाळ जिल्हा, त्यातल्या त्यात यवतमाळ तालुका व नंतर वणीपर्यंतचा डोंगरपट्टा हाच कोलमांच्या मूळ वास्तव्याचा प्रदेश आहे हे यावरून दिसून येईल. याच पट्ट्यात गोंड, आंध, प्रधान हे द्राविडियन वंशाचे आदिवासी राहतात. द्राविडी संस्कृती येथे या पट्ट्यात नांदते. तेव्हा, कोलामांचे मूळ स्थान या स्थानापेक्षा दुसरीकडे शोधू नये. तसे ते दुसरीकडे असते तर भारतात इतरत्र कोलाम आढळले असत. पण संपूर्ण भारतात या भागाव्यतिरिक्त ही जमात कोठेच आढळत नाही. शिवाय कोलामांचा

विश्वास आपण याच भागातले आहोत असा असून आपले पूर्वज कोठून बाहेरून इकडे आले असतील हे त्यांना पटत नाही. पिढ्यानुपिढ्या आपण जेथे आहोत, तेथेच राहत आलो, असे त्यांना खात्रीपूर्वक वाटते. निदान, (असलेच तर) भटकेपणाचे आदिकाळचे जीवन संपले व वस्तीचे प्रम जडले, तेव्हापासून तरी, तशीच काही कारणे घडल्याशिवाय त्यांनी स्थलांतर केले असेल हे या परंपराप्रिय लोकांच्या बाबतीत शक्य कोटीतील वाटत नाही.

कोलामांची मूळ वस्ती असलेला लासीना-यवतमाळ हा भाग व यवतमाळ जिल्ह्याची आजची राजधानी यवतमाळ शहर ह्या दोन्ही गोष्टी एकाच पंचक्रोशीत असाव्यात, हा योगायोगच म्हटला पाहिजे !

कोलामांची मूळ वस्ती यवतमाळ जिल्हा व त्याचा सलग परिसर याच भागात असली पाहिजे, याला आणखी काही उपोद्बलक पुरावे सापडू शकतात. कोलामांमध्ये बरीच आडनावे ग्रामवाचक आहेत. मूळ गावच आडनाव म्हणून सांगण्याची कोलामां-मध्ये प्रथा आहे. प्रथम ज्या गावाला एखादा कोलामसमूह वा कुलगट वस्ती करू लागला तो त्या आडनावाचा झाला. या आडनावांवरून कोलामांची मूळ वसतिस्थाने कोणत्या भागातील आहेत, त्याचाही अंदाज लागतो. मादनी, खोळद, राजूर, कोलझरी, सुकळी, हिवरी, गोधनी, घोटी, मुरझडी, पोडगौन ही कोलामांची आडनावे आणि याच नावांची यवतमाळ तालुक्यातील गावे यांचा मेळ निश्चितच घालता येतो. या गावांना नक्कीच कोलाम पूर्वीपासून राहत आले, असे यावरून स्पष्ट दिसते. बद्डी, अंद्रवाडी, वाटोडा, मोहदा ही कोलामांची कुलनामे व केळापूर तालुक्यातील याच नावांची गावे यांचीही हीच गत असून वणी तालुक्यातील कुंडी, झामकोल, वाघदरा आणि वर्धा तालुक्यातील लोणसावळी या गावांची व कोलामांच्या ह्याच अडनावांची स्थितीही तशीच आहे. दाभा, कुंभा, लोणी, सावंगी, भोसा, वरझडी, कोंढी, जांभोरा, सिंदी, झोला, किन्हाळा, शिबला, माहूर, मुंझाळा, रामपूर, काप्रा, जांब, वेडद, अर्दवन, बोर्डा, मांगुर्ले, येडशी, कारेगाव इ. अनेक गावे यवतमाळ जिल्ह्यात आणि काही थोडी जवळच्या सलग प्रदेशात असून या ग्रामनामांवरून कोलामांची आडनावे तयार झालेली आहेत. अर्थात या गावी कोलाम पूर्वीपासून होते, हे यावरून फलित होते. यवतमाळ तालुक्यात अशी ग्रामनामे अधिक असून केळापूर व वणी यांचा क्रम त्यानंतर लागतो. यवतमाळ जिल्हा हेच कोलामांचे प्रथमारंभीचे वास्तव्यस्थान होय, असे या भागातील ग्रामनामे व कोलामांची कुलनामे यांच्या युतीवरून वाटते व ते संयुक्तिक नसेल, असे म्हणता येत नाही.

यवतमाळ जिल्ह्यात काही खेडी पूर्णपणे कोलामांची आहेत. चांदा जिल्ह्यात गोंडांच्या पूर्ण वस्तीची गावे कितीतरी आहेत. त्यावरून गोंडांच्या प्रदीर्घ वास्तव्याचा अंदाज

तिकडच्या भागाच्या दृष्टीने लागतो. यवतमाळ जिल्ह्यात वाढोणा, खेकडवाई, धनोडी, ( जवळच वर्धा तालुक्यात कोल्हापूर ) अशी पाचपंधरा गावे पूर्ण कोलामांची आहेत. त्यांची वस्ती इतरांपासून अलग असते. तसे ते अलग गाव धरले तर मग कोलामांची कित्येक गावे स्वजातीच्या वस्तीचीच आहेत. यवतमाळ तालुक्यात कोलामांची पूर्ण वस्ती असलेली गावे अधिक आहेत. कोलामांची वस्ती दीर्घकाळापासून असल्याच्या ह्या खाणाखुणाच म्हटल्या पाहिजेत. शिवाय, या जिल्ह्यात काही गावी कोलामांची संख्या अधिक असून काही गावांतील त्यांची संख्या डोळ्यांत भरण्याजोगी आहे. कारली, भारी, नांझा, पिंपरी ही यवतमाळ तालुक्यातील गावे कोलामांच्या मोठ्या लोकसंख्येची आहेत. नांझ्याची कोलामसंख्या सर्वात जास्त आहे आणि हे गाव सडकांपासून दूर, डोंगरांध्ये जंगलात एकाकी असे आहे. कोलामी भाषेतील 'नंजेंग,' 'नांजूड' 'नांझूल' ( 'मांस' ) ह्या शब्दांशी या ग्रामनामाचा संबंध असेल तर कोलामांच्या पूर्वकाळापासूनच्या वास्तव्याचा पत्ता त्यावरून लागतो. शिकार आणि मांस हे कोलामांना प्रिय असून त्याला योग्य असे हे गाव आहे.

कोलामांची मुख्य देवता माहूरची देवी असून हे माहूर यवतमाळ जिल्ह्याला लागून ३ मैलांवर आहे. यवतमाळ जिल्ह्यातील केळापूरच्या देवीला व भिवसनदेवाला कोलाम लोक जातात. कोलामांचे देव यवतमाळ भागात विखुरलेले आहेत. ह्या देव-देवतांचे वास्तव्य असलेला भाग कोलामांच्या मुख्य वसतिस्थानाचा असावा, असे अनुमान निघते.

५ : :

## कोलाम आणि इतर जमाती

कोलाम जमात वेगळी नसावी असा एक तर्क असून ही जात पूर्वी भिल्लांमध्ये समाविष्ट होती, असे बोलले जाते.[१] भिल्लांशी भांडण होऊन ही जमात फुटून अलग निघाली असा या तर्ककर्त्यांचा कयास आहे. एखाद्या वेळीं कोलामांच्या वसतिप्रमुखांशी ( नाईकादि व्यवस्थापक मंडळीशी ) न पटून कोलामांचा एखादा गट वस्ती त्यागून

---

१. वसंत कापसे : यवतमाळातील वन्य जमाती– 'कोलाम,' गृत्समद वार्षिकांक ( यवतमाळ महाविद्यालय, यवतमाळ, १९५०-५१ ), पृ. ३२

दुसरीकडे जातो, हे खरे आहे. पण भिल्लांशी भांडून असा वसतित्याग केल्याचा पुरावा वा माहिती कोलामांत किंवा कोलामेतरांत नाही. स्वजातीच्या मतभेदांमुळे केलेल्या वसतित्यागावर वरील तर्क केला असावा असे वाटते. तसेच, कोलाम जातीची कित्येकांना माहिती नसते. अशा अनभिज्ञ लोकांनी "कोलाम म्हणजे तुम्ही कोण" असे पुनःपुनः विचारल्यास कोलाम लोक "जसे भिल्ल समजा की!" असे उत्तर देऊन मोकळे होतात. परंतु हे उत्तर एक पळवाट असते. कोलाम भिल्ल नाहीत वा नव्हते, ही वस्तुस्थिती आहे. कोलामांच्या संपूर्ण वैशिष्ट्यांत आणि भिल्लांच्या वैशिष्ट्यांत तारतम्य कोठेच नाही. कोलाम अगदीच वेगळ्या वैशिष्ट्याचे असतांना ते मूळचे भिल्ल होते, असे म्हणणे चूक ठरेल. कोलाम राहतात, त्या भागाच्या जवळपास भिल्ल नाहीत; असल्यास क्वचितच! फुटून निघालेली जात लहान असणार! भिल्लांची संख्या येथे मोठी असावयास हवी. तसे या भागात नाही. शिवाय भिल्लांची वस्ती मध्यभारतात आणि पश्चिमेकडे आहे. त्यांच्यातून फुटून निघालेली जमात यवतमाळसारख्या दूरच्या भागात येणे संभवनीय वाटत नाही. आली असल्यास यवतमाळ व मध्यभारत किंवा यवतमाळ व पश्चिमेच्या वरचा वायव्य भाग यांच्या मधील भूभागात ही जमात काहीच कशी नाही? भिल्ल जमात ही 'बिल्ला' म्हणजे धनुष्य धारण करणारी आहे. कोलामांमध्ये धनुष्य-बाण हे शस्त्र ठाऊकही नाही. पूर्वीही ते नसावे. असे असतांना या दोन जातींचा संबंध दूरान्वयाने सुद्धा जोडता येऊ शकणार नाही. भिल्लांमध्ये घोडा पवित्र मानतात. कोलामांत तसे काही नाही. भिल्लांची वैवाहिक नीती शिथिल असल्याचे म्हटले जाते.[१] कोलामांत तसे नाही. भिल्ल लोक आपणास वाल्मिकींचे वंशज म्हणवून घेतात. कोलामांना तर या वार्तेचा गंधही नाही. भिल्लांचे संबंध नृपनामांशी असून शूरत्वाचे इतिहासही त्यांच्या नावांशी निगडित आहेत. कोलामांच्या पूर्वजीवनात असे काही घडल्याची नोंद नाही. तेव्हा भिल्लांशी कोलामांचे नाते न जोडता स्वतंत्र जमात म्हणूनच कोलामांना ओळखावे, हेच उचित! कोलामांच्या भाषेशी भिल्लांच्या भाषेचे साधर्म्य नाही. क्वचित साम्य आढळू शकले तरी भारतीय भाषांमध्ये असे परस्परसाम्य अंशतः कुठेही आढळणारच! ह्या दोन जमातींच्या भाषांचे भगिनीवत् दृढ नाते नाही.

मुंबई, भडोच, गुजरात, राजपुताना, पंजाब इत्यादि भागात आढळणारे नायक किंवा नाइकडा लोक आणि कोलाम यांचाही संबंध नाही. इतक्या दूरच्या लोकांचे व यवतमाळकडील कोलामांचे काही नाते असू शकते, हे तर्कालाही पटणारे नाही. कोलामांच्या वस्तीच्या मुख्यांना 'नाईक' म्हणतात, एवढेच सूत्र पकडून ह्या दूरच्या 'नायकां'ना व कोलामांना जवळ आणता येणार नाही. या दोन जमातींची राहणी, भाषा व जीवनपद्धती यांत साम्ये शोधल्यास ती सापडणे कठीणच!

---

१. दाते-कर्वे : सुलभ विश्वकोश, भाग ४, पृ. १८१७

तोडा भाषेशी आंशिक संबंध असल्यामुळे कोलामांचे वांशिक नाते तोडा जातीशी जोडणे योग्य नव्हे! तोडा लोकही कोलामांना फार दूरचे आहेत–अंतराने आणि संस्कृतीने! कोलाम आणि कोळी या शब्दांतील साधर्म्यामुळे या दोन जातींना एका साच्यात बसविण्याचा प्रयत्नही योग्य होणार नाही. कोळी जात समुद्राकडे आणि कोलाम समुद्रापासून अगदी दूर! वऱ्हाडाकडील कोळ्यांना 'भोई' किंवा 'ढीवर' म्हणतात. 'कोळी' हा शब्द वऱ्हाडात फारसा प्रचारात नाही. ग्रामीणांत तर मुळीच नाही. कोलामांचे व कोळ्यांचे कोणत्याच बाबतीत तसे साम्य नाही. खुद्द कोलाम लोक भोयांना अगदीच वेगळे मानतात. कोल या जातीचे व कोलामांचे काही लागेबांधे वा सांस्कृतिक संबंध असल्याची माहिती नाही. कोलामांतही तशा प्रकारची माहिती नाही. कोल ही मध्यप्रदेशातील जात असून कोलामांना नाही म्हटले तरी ती दूरचीच आहे.

भिल्ल, नायक, कोळी, तोडा व कोल ह्या जमाती दूरस्थ म्हणून कोलामांना जवळच्या नक्कीच नाहीत. परंतु गोंड, गोवारी, आंध, नाईकपोड, आणि नाईकगोंड ह्या जमाती कोलामांच्या आजूबाजूला राहतात. ह्या जमातींचे व कोलामांचे काही सांस्कृतिक संबंध आहेत काय ते पाहू या.

आंध आणि कोलाम यांच्यात रतिमात्र साम्य नाही. आंध जमात आंध्रातील म्हणून आंध म्हणविली गेली असावी. गोवारी व कोलाम जवळपास राहण्यामुळे काही बाबतीत समान असे दिसतात. गोवाऱ्यांच्या विवाहांत कोलाम लोक आपले प्रचंड डफ व पावे वाजवितात. त्यावेळी कोलामांना 'नाईक' म्हणतात. नाईकांच्या वाजंत्र्यांशिवाय गोवाऱ्यांची लग्ने लागतच नाहीत. गोवाऱ्यांच्या स्त्रिया पदर दुमडून ज्या पद्धतीने लुगडी नेसतात, तीच पद्धत कोलामांच्या स्त्रियांत आहे. किंचित फरक कुठेकुठे आढळतो. 'महादेवाची काठी' किंवा 'ढाल' ही देवता गोवाऱ्यांत आढळते. भीमाय्याक नामक कोलामांच्या देवतेचा तो प्रकार असतो. ही थोडीफार साम्ये सोडल्यास सणोत्सव व जातिरिवाज यांबाबत या दोन जमातींत फरक आहे. लोकांच्या गायी वळण्याचा धंदा करणारे गोवारी व जनतेच्या गावांपासून दूर वसणारे कोलाम यांचे नाते वरील साम्यांपेक्षा इतर बाबतीत जवळचे नाही. ह्या दोन जातींची भाषाही वेगळी आहे. म्हणून दोन्ही जातींच्या एकतेची कल्पना करणे व्यर्थ होय!

गोंड आणि कोलाम यांच्यात बरीच साम्ये असून त्यांच्यात काही जवळीकही आहे. कोलामांना गोंडांची अंतर्गत माहिती फारशी नसते. पण गोंडांना त्यांची अल्पस्वल्प का होईना, पण माहिती असते. कोलामांचा मागासलेपणा या माहितीच्या अभावाचे कारण असू शकते. तरीपण या दोन जमातींचे साहचर्य व घनिष्ठत्व प्राचीन काळापासूनचेच असावे असे वाटते. परंतु, तसे म्हणावे तर, फक्त यवतमाळ जिल्ह्यात कोलामांपेक्षा गोंड अंदाजाने २॥–३ पट असले तरी या दोन जमातींचे फारसे साहचर्य नाही. जवळपासच्या प्रदेशात कोलाम असतील तेथे व यवतमाळ भागात फार तर

काहीसे साहचर्य असेलही; पण इतरत्र गोंडांसोबत कोलाम का नाहीत, हा प्रश्न अनुत्तरितच राहतो. तेव्हा, गोंडांचे आणि कोलामांचे वांशिक संबंध एका विशिष्ट विभागापुरतेच का ठरवावयाचे हाही प्रश्न पुन्हा उरतोच !

आदिलाबाद जिल्ह्यात कोलाम गोंडांपेक्षा पूर्वीच वसले असतील असा सेतुमाधवराव यांचा तर्क आहे. कारण कोलमांची शेतीची मशागत-पद्धती जुनी आहे. गोंडांच्या व कोलामांच्या अर्थजीवनाची विशिष्ट सांगड राहिली. गोंडांपेक्षा कोलाम दुय्यम ठरले. कोलाम उंच जागी व पायथ्याशी गोंड अशा या दोन जमातींच्या वस्ती राहिल्या. गोंडांना चांगली जागा व शेती लाभली. गोंडांपेक्षा संकटांशी, क्रूर जनावरांशी सामना देऊन अप्रत्यक्षरीत्या कोलामांनी गोंडांना संरक्षण दिले. एकाकीपणा कोलामांना व सुखवस्तुपणा काहीसा का होईना गोंडांना लाभला.[१] जंगली वस्तू गोंडांना विकणारी व प्रधानांप्रमाणे दरिद्री असलेली ही कोलाम जमात आहे. प्रधान ही गोंडांना जवळची जात आहे. गोंडांची किरकोळ मजुरी करण्यात आदिलाबादेकडचे कोलाम रत असतात. कोलाम स्त्रिया मराठी व गोंडी गीतेही गातात. कोलामीतही गाणी आहेतच. पण त्यांनी गोंडांचीही गीते घेतली. गवत कापण्याचा नृत्याचा एक कार्यक्रम कोलामांत होतो, त्यात कोलामांना गवत कापून देण्याचे काम गोंड स्त्रिया करतात, असे वर्णन असते. गोंडांचा भिवसनदेव व कोलामांमधील भीमाय्याक एकच दिसतो व दोन्ही जातींतील या देवांच्या पूजेत बरीचशी साम्ये दिसतात. केसलापूरच्या गोंडांच्या यात्रेत कोलाम जातात व गोंडांच्या उत्सवात ते मिसळतात. कोलामांना जादूटोण्याचे मंत्रतंत्र इ. चे ज्ञान असते म्हणून गोंड त्यांच्याकडे त्या दृष्टीने जातात. कोलामांचा ' जयतुर ' देव व गोंडांमधील ' पांढरा सेवर ' एकच वाटतो. कोलामांना गोंडी भाषा बऱ्याच भागात चांगली जमते. गोंडांना कोलामी भाषा क्वचितच येते. १९६१ च्या शिरगणतीनुसार महाराष्ट्रात गोंडी ही दुय्यम भाषा जाणणारे कोलाम ५४४ आहेत; तर फक्त १४९ गोंडांनाच कोलामी समजते. टेकडीवर वस्ती असल्यास ह्या दोन जाती परस्परपूरक वागतात. सपाट भागी मात्र दूर जाण्याची व वागण्याची प्रवृत्ती असते. दोघांचेही जीवन कठीण असले तरी जवळ येण्याची इच्छा कमी आढळते. गोंडांच्या पूर्ण वस्तीच्या गावात कोलाम आढळत नाहीत, तर कोलामांच्या पूर्ण वस्तीच्या गावात गोंड आढळत नाहीत. एखाद्या घराचा अपवाद क्वचित असू शकतो. आदिलाबादेकडे काही जागी गोंडी भाषेत कोलामांच्या मुलांना शिक्षण मिळू लागले आहे. कोलामांनी काही आडनावे गोंडांची घेतली आहेत. कोलाम मुलीच्या संभोगाने गोंडांना जेव्हा मुले झाली, तेव्हा पित्याची ती आडनावे मुलांना मिळून कोलामांत रूढ झाली, अशी एक माहिती आहे. पण हा नियम असू शकत नाही, असे ही माहिती देणाऱ्या सेतुमाधवरावांचे म्हणणे[२] असून

१ व २. P. Setu Madhao Rao : A Grammar of the Kolami Language ( 1950 ), प्रस्तावना

ते रास्त आहे. गोंड पित्याची संतती गोंडच ठरणार; तेव्हा वरील संकरवृत्त चूक आहे हे आलेच !

ही सर्व साम्यस्थळे व विषमस्थळे संकलितपणे अभ्यासली असता गोंड व कोलाम यांचे साहचर्य व घनिष्ठत्व सर्वाधिक असल्याचे पटते आणि म्हणून 'हे लोक गोंड वंशातले आहेत,'[1] असे म्हणण्याचा मोह डॉ. केतकर, हिस्लॉप[2] यांच्यासारख्यांना झाला असावा. वस्तुतः वेषभूषेत कुणब्यांशी काही साम्य आहे म्हणून कुणबी व कोलाम यांचे वांशिक नाते एक आहे असे म्हणता येत नाही, तसेच गोंडांशीही त्यांचे वांशिक नाते जोडण्यात अर्थ नाही. गोंडांशी इतके घनिष्ठत्व असण्याचे कारण गोंड राजे व मालक होते आणि कोलाम त्यांचे नोकर वा सेवक होते, हे असले पाहिजे. आर्थिक दुरवस्था ही त्यामागची मुख्य बाजू आहे. गोंड व कोलाम यांच्यात परस्परविवाह होत नाहीत. गोंडाना कोलामांच्या हातचे अन्न चालत नाही. कोलामांना मात्र चालते. वस्तुतः कोलाम अस्पृश्य नव्हते अन् नाहीत. त्यांना हिंदूंच्या मंदिरात मज्जाव कधीच नव्हता. महार व मांग यांचा विटाळ त्यांनाही होत असे. असे असतांना ज्याअर्थी गोंड त्यांना अन्नसेवनाच्या संदर्भात कमी लेखतात, त्याअर्थी गोंडांचे व कोलामांचे संबंध व्यवहारी पद्धतीचे, सेव्य-सेवकांचे होते व ते वांशिक नात्यातून उद्भवलेले नव्हते वा नाहीत हाच अर्थ यातून फलित होतो. मालकांच्या सणावारांची, रीति-रिवाजांची, देवदेवतांची व तसल्याच काही किरकोळ बाबींची उसनवारी आजवर अनेक जातींच्या व धर्मांच्या संदर्भात झालेली आहे. तेव्हा कोलामांच्या अशा उसनवारीमागे केवळ आर्थिक विपन्नता व प्राप्तस्थिती याशिवाय अन्य कोणतेच सूत्र नाही, हे स्पष्ट आहे. गोंडांच्या घरांची रचना कोलामांच्या तुलनेने आर्थिक दृष्ट्या बरी असते. ते शिक्षणात कोलामांपेक्षा थोथेफार पुढे गेलेले आहेत. सुधारणाही त्यांच्या डोळ्यांना कोलामांपेक्षा थोड्याफार दिसू लागल्या आहेत. सामाजिक जाणीव कोलामांपेक्षा त्यांच्यात थोडीफार आलेली आहे. ह्या बाबी जमेस धरल्या तर कोलामांत व गोंडांत फार फरक पडतो. कोलामांच्या स्त्रियांचे नेसणे व गोंड स्त्रीचे नेसणे यांत अंतर आहे. डुकरांमागे धावण्यात ह्या दोन्ही जाती प्रसिद्ध असल्या तरी गोंडांपेक्षा कोलामांची गती त्या कामात जास्त आहे. गोंडांची व कोलामांची भाषा अगदीच वेगळी आहे. थोडेफार साम्य संबंधाने आले आहे. हे फरक हेच दर्शवितात की कोलाम ही जमात गोंडांशी संबंधित नसून ती स्वतंत्र आहे. खुद्द कोलामांनाही आपण गोंडांच्या वंशातील वाटत

---

१. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

२. Hislop : Papers Relating to the Aboriginal Tribes of the Central Provinces, पृ. १०

नाही आणि गोंडांनाही ते मान्य नाही. कोलाम ही गोंडांची उपजात नसून ती स्वतंत्र आहे, या वस्तुस्थितीचा उच्चार ग्रिक्सन यांनीही केला आहे.[1]

गोंडांसारख्या मोठ्या जमातींपेक्षा कोलाम वेगळे आहेत, हे मान्य केल्यावर कोलामांच्या जातिविषयक स्वतंत्र अस्तित्वाला बाध येत नाही. कोलामांपेक्षा लहान जमातींच्या बाबतीत तर विशेष चर्चेचे कारण नाही. नाईकपोड आणि नाईकगोंड ह्या लहान जमातींपासून कोलाम जात निघाल्याची चर्चा अनाठायीच ठरेल ! उलट ह्या दोन जमातीच कोलामांच्या शाखा ठरतात काय किंवा कोलामच ठरतात याचा शोध घेण्यासाठी बराच वाव आहे. नाईकपोड ही जमात आदिलाबाद जिल्ह्यात व किनवट तालुक्यात आहे. तिचा समावेश गोंडांतच करण्यात आला असला[2] तरी ही जमात कोलामच असावी असे वाटते. 'नाईक' हा कोलामांचा न्यायप्रमुख असतो आणि कोलामांच्या वस्तीला 'पोड' असे म्हणतात. दोहोंमिळून तयार होणारा 'नाईकपोड' हा शब्द आणि 'नाईकपोड' ही जात यांतील सूत्र एकच असणे अधिक संभवते. कोलाम व नाईकपोड यांचे कमालीचे साम्य या एकसूत्रतेला पोषक ठरते. काही नाईकपोड हे स्वतःस कोलामसुद्धा मानतात. किनवट भागातील नाईकपोड मराठी बोलतात व त्यांना वऱ्हाडात 'नाईक' म्हणतात. कोलामांना वऱ्हाडात 'नाईक' म्हणण्याची वहिवाट आहे. तेव्हा नाईकपोड व कोलाम वेगळे नसावेत असे म्हणावयास हरकत नाही. कोलामांचे व नाईकपोडांचे दारिद्र्य, राहणी व रीतीरिवाज यांत मनस्वी साम्य आहे. कोंबडी–कुत्री पाळणारे, साधे, सरळ व कमगर्जी असणारे कोलाम आणि तसेच असलेले नाईकपोड या दोहोंचा ज्ञातिसंबंध एकच वाटतो !

कोलामांची नीट माहिती नसणारे गणक शिरगणतीच्या वेळी नोंद घेतांना नीट लिहीत नाहीत. त्यांच्या दृष्टीने गोंडांतच ही जमात जाते. अशा समजापयी कोलामांची वेगळी नोंद होत नसल्याचे काही वेळा घडते. अशाच काहीशा घोटाळ्यातून किंवा प्रथम पाहणी करणाऱ्या लेखकाकडून चूक होण्यामधून चांदा भागातील कोलामांची नोंद 'नाईकगोंड' म्हणून झालेली दिसते. ग्रियर्सनच्या लक्षात ही गोष्ट आलेली असावी. म्हणून त्याने नाईकगोंड व कोलाम एक असावेत असा तर्क केला.[3] कारण 'नाईक' या शब्दाला काही भागात 'कोलाम' असा अर्थ चिकटलेला आहे व कोलामांच्या न्यायप्रमुखाला 'नाईक' म्हण्याचा रिवाज आहे. नाईकगोंड हे गोंडांपेक्षा वेगळे तर

---

१. हेमनडॉर्फकृत 'दी ॲबोरिजिनल ट्राइब्ज ऑफ हैद्राबाद, खंड १ ( लंडन, १९४३ )' या पुस्तकाला डब्ल्यू. व्ही. ग्रिक्सन यांनी लिहिलेली प्रस्तावना : पृ. १४

२. Census of India—Maharashtra : Vol. X, Part V-A; पृ. २१४

३. Russell—Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III ( London 1916 ), पृ. ५२२

काढण्याचा प्रयत्न गणकांनी केलाच, पण गोंडांतीलच ' नाईक ' म्हणून त्यांची नोंद ' नाईकगोंड ' अशी करून टाकली, असे विधान करण्यास काहीच हरकत नाही. १९५१ नंतर चांदा जिल्ह्यातील अहेरी विकासगटात ११०० नाईकगोंड होते. १९०१ च्या शिरगणतीत चांद्याकडील या नाईकगोंडांची संख्या ५ हजारांहून थोडी कमी नोंदविलेली आहे. तिकडे त्यांना ' धुर्वे गोंड ' असेही म्हणण्यात येते. धुर्वे हे गोंडांतील एक आडनाव आहे व कोलामांमधील कोणीतरी ते गोंडांपासून उचललेले असेल. ह्या नाईकगोंडांना त्या भागातील वैपुल्याने असलेल्या मारिया गोंडांची भाषा समजत नाही. हे नाईकगोंड चांदा जिल्ह्याच्या दक्षिणभागी राहतात. या लोकांनी गोंड जमीनदारीत सैनिकांच्या नोकऱ्यासुद्धा केल्या, अशी माहिती आहे.[1] या नाईकगोंडांची भाषा नायकी आहे; आणि गंमत ही की नायकी भाषा व कोलामी भाषा जवळजवळ काय, पूर्णतः एकच आहेत. या दोन भाषांतील समान शब्दांचा संग्रह ह्याची खात्री पटविण्यास समर्थ आहे. ' नाईक ' म्हणजे ' कोलाम ' आणि त्यांची भाषा ' नायकी ' हीही कोलामी, हे सत्य नाकारता आले नाही, तर नायकी भाषा बोलणारे नाईकगोंड हे कोलामच ठरतात.

जर हे नाईकगोंड व नाईकपोड कोलाम असतील तर त्यांचे वास्तव्य कोलामांच्या मूळ वास्तव्यस्थानाला निकट म्हणून सुसंगत ठरते. नाईकगोंडांच्या लगतच्या भागात राजुऱ्याजवळ माणिकगडला कोलाम राहतात. गोंडांमधील माणकूबाई हे नाव व कोलामांमधील माणकूबाई ही देवता, यांचे काही नाते संभवू शकते. चांदा, माणिकगड येथील गोंडांच्या राज्यात त्यांचे अश्रित म्हणून कोलाम कधीकाळी राहिले असतील. गोंड जमीनदारीत नाहीतरी नाईकगोंड ( कोलाम ? ) सैनिकांचे काम करीत होतेच !

गोंड, नाईकगोंड आणि कोलाम हे देवीचे पूजक आहेत. माहूरची देवी या तिन्ही जातींची पूज्य देवता आहे. चांदा आणि माहूर ही स्थाने देवीसाठी प्रसिद्ध आहेत. कृतयुगात चांद्याच्या महाकाली देवीचा पुत्र भूतनाथ ह्याने देवस्त्रियांची चेष्टा केली. त्यामुळे माता महाकाली रागावली. तेव्हा भूतनाथ माहूर ( मातापूर ) येथे गेला व रेणुकेजवळ राहिला. राग शमल्यावर महाकाली चांद्याहून निघाली व माहूरला गेली. तेथे ती रेणुकेला भेटली. भूतनाथास समजावून महाकालीने त्याला चांद्यास परत आणले. सोबत रेणुकाही चांद्याला आली व काही दिवस तेथे राहिली. काही दिवसांनी ती आपल्या माहूरला परत गेली. ह्या घटनेची स्मृती म्हणून माहूरला रेणुकेसोबत महाकाली व चांद्याला महाकालीसोबत रेणुकेची स्थापना करण्यात आलेली आहे. रेणुकेला ' एकवीरा देवी ' म्हणून संबोधतात. केळापूर येथेही एकवीरा देवी असून तेथेच जुन्या किल्ल्याचे अवशेष आहेत. कोलाम या देवीच्या दर्शनाला जातात. माहूरची देवी ही कोलामांची मुख्य देवता आहे. चांद्यालाही ती आहे. गोंडांनाही ह्या

---

१. A. E Nelson ( Editor ) : C. P. District Gazetteers, Chanda District, Vol. A ( 1909 )

दोन्ही देवी प्रिय आहेत. नाईकगोंडांनासुद्धा त्या प्रिय आहेत. अशा धार्मिक व सांस्कृतिक संबंधांतूनही या तीन जमातींची जवळीक दिसते. गोंड हे कोलामांहून अलग पडतात, हे आपण पाहिलेले आहे. उरलेले कोलाम व नाईकगोंड परस्परांना जवळचे आहेत, हे सिद्ध करण्यासाठी वरील देवींची या दोन्ही जातींमधील भक्ती पुरावा म्हणून अंशतः उपोद्बलक ठरू शकेल.

नाईकपोड व नाईकगोंड हे कोलाम असावेत असे माझे मत झाले आहे. कोलामी व नायकी भाषा एकच आहेत, या मतावर मी आलो आहे. तरीपण, नाईकपोड व नाईकगोंड या जमातींचा स्वतंत्र व सर्वांगपरिपूर्ण अभ्यास करून कोलाम, नाईकपोड व नाईकगोंड यांचे संबंध व साम्ये-वैषम्ये शोधण्यासाठी आणि ह्याही जमाती कोलामच आहेत की काय हे हुडकून काढण्यासाठी फार मोठा वाव आहे. ह्या दिशेने संशोधनाची गरज आहे. तूर्त, मी सदहू ग्रंथात कोलाम या नावाने ओळखल्या जाणाऱ्या जमातीचीच माहिती मांडलेली आहे. नाईकपोड व नाईकगोंड यांची माहिती या प्रबंधाच्या मांडणी-साठी घेतलेली नाही. नाईकपोड व नाईकगोंड ह्या जमाती कोलामच आहेत हे जोवर निश्चितपणे सिद्ध होत नाही, तोवर त्यांना कोलाम समजण्यास व त्या दिशेने ओढाताण करण्यास मन धजावत नाही. म्हणूनच फक्त 'कोलामां'वर ह्या ग्रंथाचे लेखन केलेले आहे. त्यातल्या त्यात यवतमाळ जिल्ह्यातच कोलाम अधिक प्रमाणात असल्यामुळे त्याच भागाच्या तपशीलावर व माहितीवर अधिक भर दिला आहे. आदिलाबादेकडील कोलामांवर स्वतंत्र प्रबंध तयार होणारच नाही, असेही नाही. त्या दिशेने प्रयत्न झाल्यास या जातीच्या माहितीत आणखी मोलाची भर पडल्याशिवाय राहणार नाही.

## कमालीची मागासलेली जमात!

आदिवासींसाठी राखीव मतदारसंघ ठेवावे लागतात अशा यवतमाळ जिल्ह्यात अदिवासी अधिक आहेत. या जिल्ह्यातील व जवळच्या परिसरातील गोंड, प्रधान, आंध, बंजारा यांसारख्या जातींपेक्षा कोलाम कमालीचे मागासलेले आहेत. गोंड लोक 'वन्य' खरे; पण ते या जिल्ह्यात तरी त्यांच्या मानाने व इतर आदिवासींच्या तुलनेने बरेच पुढे जाऊ लागले आहेत. ते मराठी लोकात बरेच मिसळले आहेत. ते गाव-गाड्यात राहातात व गावकीची कामेधामे करतात. कोरकू, मारिया या गोंडापेक्षा यवतमाळ भागातील गोंड काहीसे 'नागर' झाले आहेत. ते माणसाळून मराठमोळे बनले आहेत. मात्र कोलामांचे तसे नाही. ते या गोंडांच्या मानाने अगदी मागे आहेत. ४ थी ते ७ वी शिकलेले गोंड बरेच आहेत. गोंडांमधील काही लोक महाविद्यालयांत गेलेले आहेत. आमदार, खासदार व सरकारी नोकर गोंडांमधून होत आहेत. कोलामां-मध्ये आमदार, खासदार, मामलतदार असे हुद्देदार नावालाही नाहीत. महाविद्यालया-मध्ये गेलेला व जाणारा कोलाम अपवादाला आढळला तरी नशीब! आता प्राथमिक शाळांमध्ये कोलामांची काही मुले शिकतांना दिसू लागली आहेत. पण त्यात कोलामांना

रस नाही. शहरी किंवा नागरी माणूस आला की कित्येक कोलाम त्याला पाहून भितात; इतके हे कोलाम मागे आहेत. 'वेडी आणि बावळट जात' म्हणून कोलामांकडे कोलामेतर पाहतात. डॉ. एल्विन यांचे आदिवासींच्या क्षेत्रातील कार्य फार मोठे व महत्त्वाचे आहे. भारत सरकारच्या एका समितीचे अध्यक्ष असतांना त्यांनी आदिलाबाद जिल्ह्यातील उतनूर विकासगटाला भेट दिली. १६६ गावांच्या या विकास-खंडात कोलाम, नाईकपोड, राजगोंड, प्रधान इत्यादि जमाती आहेत. डॉ. एल्विन यांनी या विकासखंडाच्या पाहणी-संदर्भात कोलामांसंबंधी जे शब्द लिहून ठेवले, ते बोलके व महत्त्वपूर्ण आहेत. ते लिहितात–

"It is The Kolams or Kolavars who can best claim the title of 'aboriginal' in this area."[१]

डॉ. एल्विन यांचे हे विधान उतनूर तालुक्यातील कोलामांनाच फक्त लागू पडते असे नसून संपूर्ण कोलाम जातीलाच ते लागू आहे. मग ते कोणत्याही भागातील असोत !

卐 卐 卐

१. Dr. Verrier Elwin : Report of the Committee on Special Multipurpose Tribal Blocks ( Ministry of Home Affairs, New Delhi, March 1960 ), पृ. ३७८

१ : :

# स्वतंत्र वस्ती

कोलाम हे गावात बहुधा राहत नाहीत. ग्रामवस्तीपासून फर्लांग-दीड फर्लांग अंतरावर गवतकुडांच्या झोपड्यांची यांची स्वतंत्र वस्ती असते. सर्व कोलाम याच वस्तीत राहातात. या वस्तीव्यतिरिक्त अन्यत्र कोलाम राहत नाहीत. यांच्या वस्तीतही इतर जातींचे लोक राहत नाहीत. ऐक्य, संघटन, साहचर्य आणि सहकार्य यांचा नमुना म्हणजे कोलामांची वस्ती !

गावापासून कोलाम–वस्तीचे अंतर कधी जास्त असते, तर कधीकधी कोलामांची वस्ती गावालगतच असते. गाव वाढत गेल्यामुळे आधीचे अंतर कमी होते आणि म्हणून गाव व कोलाम-वस्ती यांच्यातील अंतर नंतर उरत नाही. तरीही त्यांची वस्ती तेथेसुद्धा अलगच असते. गावाची हद्द यांच्या हद्दीला भिडली तरीही त्या हद्दीनंतरची यांची वस्ती वेगळीच असते ! स्वतःच्या देवदेवतांचे, त्यांच्या पूजेचे व सणोत्सवाचे स्वरूप सरमिसळ न होता वेगळे राहावे या धार्मिक श्रद्धेतूने अजूनही ह्या वस्ती गावाच्या बाहेर किंवा अलगच राहतात.

क्वचित काही ठिकाणी कोलाम लोक गावांमध्ये येऊन राहिल्याचे दिसते. कदाचित मोठ्या गावांच्या सहवासाने असे झाले असेल. परंतु हे कारण खरे नसावे. खरे तर, गावातील वस्ती वाढल्यामुळे निरुपाय म्हणूनच त्यांची वस्ती गावात समाविष्ट होऊन गेली असेल. थोडी मोठी गावे, मोठ्या गावाजवळची खेडी व मैदानी आणि काहीशा

पिकाऊ प्रदेशातील कोलामांची वस्ती यांच्याच बाबतीत अशी शक्यता आहे. यवतमाळ तालुक्याचा उत्तर भाग, वर्धा जिल्हा आणि यवतमाळजवळील (५ मैलांवरील) भारी हे गाव, येथे असे काहीसे दृश्य दिसते. परंतु, तरीही यांची वस्ती गावात असूनसुद्धा अलगच पडते, असे म्हणणे रास्त होईल.

गावामध्ये येऊन राहणे हा कोलामांचा स्वभाव नसला तरी काही वनग्रामांमध्ये कोलाम हे गावातच राहतात असे दिसून येते. वनग्रामे ही बहुतेक आदिवासींच्याच वस्तीची आहेत. त्यांत कोलामही राहतात. तरीपण, त्यांची घरे सलग व अलग उमटून दिसतातच ! घोडदरा (ता. केळापूर) या वनग्रामात ही स्थिती आहे.

कोल्हापूर (ता. वर्धा), खेकडवाई (ता. वणी) अशा काही खेड्यांमध्ये फक्त कोलाम लोकच राहातात. ती गावे नाहीतरी स्वतंत्रच असल्यामुळे तेथील कोलाम अमुक गावांच्या आत किंवा अमुक गावांच्या बाहेर राहतात, असे म्हणण्याचे प्रयोजनच नाही.

क्वचित, काही मोठ्या गावी एखाददुसरे कोलाम-कुटुंब शेतीच्या किंवा शेत-मालकाकडे नोकरी करण्याच्या निमित्ताने येऊन राहिले आहे. हा अर्थात अपवाद असून आजच्या काळाचा जीवनकलह त्यामागे कारणीभूत आहे. एरवी वस्तीबाहेर राहण्याची कारणे वा उदाहरणे नाहीत. उस्मानाबाद जिल्ह्यातील एखाददुसरे कुटुंब (एवढीच त्या जिल्ह्याची कोलाम-संख्या आहे.) हे शेती किंवा शेतमजुरी या निमित्ताने गेलेले आहे. यवतमाळसारख्या मोठ्या गावात कोलामांची स्वतंत्र वस्ती नाही. ते वस्तीत कोठेतरी सोयीप्रमाणे राहतात किंवा लगतच्या वाघापूर, लोहारा अशा खेड्यांतील त्यांच्या जमातीच्या वस्तीत राहतात. झाडगाव (ता. केळापूर) येथे श्री. कोल्हे यांच्या शेतीच्या कामावर एक कोलाम-कुटुंब आहे. त्या निमित्ताने तेवढेच कुटुंब त्या गावी आले आहे. नांदुरा खुर्द (ता. यवतमाळ) येथे दोन कुटुंबे शेती व मजुरीच्या निमित्ताने आली आहेत. अशा अपवादांनी, कोलाम स्ववस्तीबाहेर राहतात, असे सिद्ध होत नाही, हे वेगळे सांगावयास नकोच.

वरीलप्रमाणे अवचट उदाहरणे सोडली तर कोलाम लोक गावातील वस्तीत इतर लोकांबरोबर येऊन राहिल्याचे कुठेच दिसत नाही. ह्या लोकांना वस्तीत आणण्याचे प्रयत्न झाले नाहीत, असे नाही. पण त्यात यश आले नाही. स्वतःची वस्ती सोडून दुसरीकडे राहावयास कोलाम आजवर तरी मुळीच उत्सुक दिसले नाहीत. कळंब (ता. यवतमाळ) ह्या साडेपाच हजार लोकवस्तीच्या गावातही कोलामांना गावापासून अलगच राहावेसे वाटते. या गावाच्या पश्चिमेकडून दक्षिणोत्तर अशी चक्रावती नामक नदी वाहते. संपूर्ण गाव चक्रावतीच्या पूर्वेस वसले आहे; तर कोलाम लोकांची वस्तीच फक्त गावाच्या पश्चिमेस नदीपलीकडे एका उंचवट्यावर आहे. राणीउमरावती

( ता. यवतमाळ ) हेही एक मोठ्यापैकी गाव आहे. ( येथील लोकसंख्या १९६१ च्या शिरगणीनुसार १५५० आहे. ) पण तेथील कोलामही गावाबाहेरच राहतात.

## निसर्गाच्या सान्निध्यात

कोलाम लोक सपाटीच्या प्रदेशात कमी प्रमाणात राहतात. याउलट, कोलामांची राहण्याची ठिकाणे बहुतेक डोंगराळ भागात गावांशेजारच्या पण डोंगरांजवळच्या उतारा-पठारावर आहेत. उंच डोंगर सुरू होतात, पिकाऊ भाग संपतो अशा मधल्या पायथ्या-पठाराच्या भागात यांची वसतिस्थाने जास्त आहेत. पूर्वीच्या काळी कोलाम लोक डोंगरांच्या उतरणीवर शेती करण्यासाठी म्हणून झोपड्या उभारून राहू लागले. कमीतकमी तीनचार झोपड्याची त्यांची ही वस्ती तयार होई. शेती व डोंगरी उत्पन्न यांवर कशीबशी गुजराण करावी आणि जंगली वस्तू शेजारच्या मोठ्या गावी विकून रिकाम्या वेळी जगण्यासाठी धडपडावे, असा या आदिवासींचा नित्यक्रम होता आणि आहे. गावांवर अवलंबून असणारा, गावांशी साहचर्य राखणारा आणि तरीही वेगळा राहणारा असा हा वर्ग आहे.

निसर्गाच्या मोकळ्या वातावरणात वावरण्यामुळे दारिद्र्यातही संतुष्ट आणि बेफिकीर राहणारी ही जमात आहे. जीवनासाठी कष्ट व धडपड कमी नाही; तरीही जीवनाची काळजी नाही ! पावसाळ्यात हिरवीगार शेते, माळराने आणि झुळझुळणाऱ्या नद्या-नाल्यांकाठच्या झाडांशी हितगुज करीत वाहणारा सुसाट वारा यांच्याशी नित्य-मैत्री असलेला हा वर्ग आहे. यांच्या वस्तीची बहुतेक स्थाने नद्या आणि डोंगर यांच्या परिसरात आढळतात.

## ‘ पोड ’

कोलामांच्या स्वतंत्र वस्तीला ‘ पोड ’ असे नाव आहे. जवळपासच्या कोलामेतर लोकांच्या तोंडी या वस्तीचे नाव ‘ कोलामपोड ’ असे असते. इतर लोक आपल्या बोलण्यात या वस्तीचा उल्लेख नेहमी ‘ पोड ’ किंवा ‘ कोलामपोड ’ अशा नावाने करतांना आढळतात. ‘ कोलामपोड ’ म्हणजे ‘ कोलामांची वस्ती ’ असा अर्थ सर्व साधारणपणे आजूबाजूला रूढ असतो. बंजारी ( लभान ) लोकांच्या वस्तीस ‘ तांडा ’ आणि गवळ्याच्या वस्तीस ‘ हेटी ’ ही नावे वऱ्हाडच्या खेड्यापाड्यांत रूढ आहेत; तद्वतच कोलामांच्या वस्तीस ‘ पोड ’ असे नावही कोलाम राहतात त्या भागात रूढ आहे.

काही वेळा कोलामांच्या वस्तीला ‘ पोड ’ हे विशिष्ट नाव असल्याचे इतर भागातील लोकांना माहीत नसते. त्यामुळे गावाच्या विशेषनामाशी त्या शब्दाचे सादृश्य जोडले जाते. माहितीच्या अभावी असे होते. नागपूरच्या ‘ तरुण भारत ’ या दैनिकात

दि. १६ मे १९६४ रोजी आलेल्या बातमीचे शीर्षक "केळापूर तालुक्यात, कोलामपोड येथे आग" असे आहे. गावाचेच नाव 'कोलामपोड' असल्याचा ग्रह हे शीर्षक वाचून होतो. 'कोलामपोडाला' किंवा 'कोलामपोडावर' असा शब्द असता तर त्याचा अर्थ वेगळा झाला असता. 'कोलामपोडाला आग लागली' किंवा 'कोलामपोडावर आग लागली' असाच वाक्यप्रयोग या संदर्भात होतो.

कोलामांच्या वस्तीच्या शेजारच्या गावी राहूनही कोलामांच्या वस्तीची पुरेशी माहिती नसणारे काही शिक्षित लोक त्या वस्तीला 'कोलामखेड' असे संबोधतांना दिसतात. कोलामांचे खेडे ते 'कोलामखेड' असा सोयीस्कर समज करून घेऊन हे नाव ते उच्चारतात. 'पोड' हा शब्द त्यांनी ऐकलेला नसतो किंवा ऐकला असला तरी तो त्यांना चूक वाटून तो शब्द ते सुधारून घेतात असे दिसते! पण ती दुरुस्ती नसून चूकच असते. 'कोलामखेड' हे नाव कोलामांच्या वस्तीला कधीच देण्यात आले नाही. बाभूळगाव विकास-खंडातील (ता. यवतमाळ) एका उजाड गावाचे नाव 'कोलाम' असे आहे. पण 'कोलामखेड' अशा नावाचे गाव कोठेच आढळले नाही. जातीच्या नावावरून गावाची नावे पडल्याची क्वचित काही उदाहरणे दिसतात. पुसद तालुक्यात (जि.यवतमाळ) 'मारवाडी' या नावाचे गाव आहे; तर वणी तालुक्यात (जि. यवतमाळ) 'गोवारी' या नावाची दोन गावे आहेत. वर दिलेले 'कोलाम' हे ग्रामनामसुद्धा अशाच तऱ्हेचे असावे.

उतनूर तालुक्यातील कोलामांच्या वस्तीला आदिलाबाद जिल्ह्यातील काही शिक्षित लोक 'कुलामगुडा' किंवा 'कोलामगुडा' असे संबोधतात. 'लेंडीगुडा', 'काचीगुडा' अशी तिकडची ग्रामवाचक नामे असल्यामुळे शिक्षितांना कोलामांच्या वस्तीला 'गुडा' म्हणण्याचा मोह होतो, असे दिसते. 'कोलामखेड' म्हणणारे व 'कोलामगुडा' म्हणणारे लोक एकाच कोटीतील आहेत. कोलामांच्या वस्तीला वस्तुतः 'पोड' किंवा 'कोलामपोड' हेच नाव माहीतगारांमध्ये रूढ आहे.

गावाची उपवस्ती म्हणून 'कोलामपोड' वसलेला असतो. 'कोलामपोडां'ची नोंद स्वतंत्र गाव म्हणून बहुधा नसते. गावापासून थोडी दूर असली तरीही कोलामांची वस्ती त्या गावाचा 'मजरा' (उपवस्ती) म्हणून गणली जाते. उदाहरणार्थ सुभानहेटी (ता. केळापूर) ही वस्ती घ्या. या वस्तीत गोंड, गवळी, धोबी, कोलाम हे लोक राहतात. ही पूर्ण 'हेटी' (सुभानहेटी) वर्धे या गावाची उपवस्ती किंवा वर्धे या गावाचा 'मजरा' आहे. (सुभानहेटीमध्ये कोलामांची वस्ती अलग आहे, ते पुन्हा वेगळेच!) गावापासून मैलमैल दूर असलेले 'कोलामपोड'ही त्या त्या गावाचे 'मजरे' आहेत. ज्या गावात कोलामेतर नाहीत, त्या गावांना असलेले नावच 'कोलामपोडा'स लाभते. पण अशी गावे अगदीच कमी!

इतर लोक कोलामांच्या वस्तीला ' पोड ' किंवा ' कोलामपोड ' म्हणून ओळखतात आणि तशा नावांनी संबोधतात, हे खरे; पण खुद्द कोलाम लोक ' पोडा'बद्दल काय भावना ठेवतात हेही पाहण्याजोगे आहे. ते स्वतःच्या वस्तीला ' गाव ' असेच म्हणतात. कोलामी भाषेत ' गाव ' या शब्दास ' उर ' असा शब्द आहे. ते आपल्या वस्तीचा उल्लेख नेहमी ' आपले गाव ' म्हणूनच करतात. खमकुंड (ता. केळापूर) येथील एका ' पोडा'चे नाव ' रेंगा उर ' ( बोरींचे गाव, बोरगाव ) असे कोलामांनी रूढ केले आहे. कोलामेतरांना हे नाव ठाऊकही नाही. अर्थ हा की, कोलाम हे आपल्या वस्तीला ' गाव ' असे म्हणतात. याउलट कोलामेतरांच्या वस्तीला ते ' रीठ ' असे संबोधतात. ' रीठ ' या शब्दाचा अर्थ कोलामेतरांमध्ये ' उजाड गाव ' असा आहे; तर कोलामांनी इतरेजनांच्या वस्तींना ' रीठ ' असे संबोधून ' उजाड ' करून टाकले ! कोलामांनी स्ववस्तीस ' गाव ' म्हणावे यात त्यांची स्वग्रामाबद्दलची ( म्हणजे स्वतःच्या कोलाम-वस्तीची ) आपुलकी दिसते आणि इतरेजनांच्या गावाला ' रीठ ' म्हणावे यातून त्यांची इतरांमध्ये वावरण्याच्या बाबतीतली अनास्था सूक्ष्मपणे व्यक्त होते ! नाहीतरी, कोलाम लोक शेजारी राहूनही शेजारच्या गावी मनाने मिसळत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. कोलामांनी इतरांच्या गावांची प्रत्यक्ष हेटाळणी केल्याची किंवा तशी भावना ठेवल्याची मात्र उदाहरणे अपवादादाखलसुद्धा नाहीत, हीही वस्तुस्थिती आहे.

कोलाम लोक स्वतःच्या वस्तीस इतरांच्या संपर्कामुळे ' पोड ' असेही संबोधतात. अर्थात ते इतरांना समजावे म्हणून. तसेच स्थानिक वैशिष्ट्यांवरून 'पोडां'ना कोलामेतरांकडून काही नावे दिली जात असावी असे वाटते.

## ' पोड ' या शब्दाची फोड

कोलामांच्या वस्तीस ' पोड ' का म्हणतात याचा शोध घेण्याचा प्रयत्न करणे आवश्यक आहे. ' पोड ' किंवा ' कोलामपोड ' कोलामवस्तीस का म्हणतात हे खुद्द कोलामांपैकी एकालाही माहीत नाही. किनवट-आदिलाबाद भागातील ' नाईकपोड ' जातीच्या लोकांपैकी काहींना विचारले असता कोणीच ' पोड ' या शब्दाची फोड करू शकले नाही.

' गाव ' किंवा ' वस्ती ' हा शब्द गृहीत धरून पूर–Pore–पट्टण-पोड या शब्दांमधील साम्य शोधता येण्याजोगे आहे. परंतु सकृद्दर्शनी व्युत्पत्तींची अशी वालमेल बरी वाटत असली तरी, तेथवर जाण्याची आवश्यकता नाही. कारण ' पोड ' या शब्दाशी कोलाम जातीचा पूर्वापार असा उद्योगविषयक संबंध निगडित असल्याचे आढळून आले आहे. कोलामी भाषा द्राविडी आहे. अंत्य ' उ'कार ' अ'कारयुक्त उच्चारण्याची प्रक्रिया मराठीत आढळते. तीनुसार द्राविडी ' पोडु ' शब्द मराठीत किंवा मराठीच्या संसर्गाने कोलामीत ' पोड ' असा उच्चारला जातो. ' पोड ' हा शब्द मूळ ' पोडु'वरून तयार झाला आहे आणि ' पोडु ' ( podu ) हा शेती करण्याचा

एक विशिष्ट प्रकार आहे. ‘ शिफ्टिंग कल्टीव्हेशन ’ या नावाने ओळखला जाणारा हा शेतीप्रकार ओरिसातही ‘ पोडु ’ या नावाने ओळखला जातो. शेतजमीन सोडून देऊन दुसरीकडे पिके काढणे हा प्रकार ‘ पोडु’शेतीत असतो. कित्येक आदिवासी ही शेती करीत आले आहेत. कोलामांमध्येही पूर्वी ही शेतीपद्धती रूढ होती. शेती करतांना आजही काही भागातील कोलाम ‘ पोडु’पद्धतीची शेती करतात. परंतु ते प्रमाण अगदीच अल्प असे आज उरले असून ती पद्धती इतिहासजमा झालेली आहे. कोलामांच्या या जुन्या शेतीपद्धतीत कुदळी, फावडी व टोकदार काठ्या यांनी टेकड्यांच्या उतरणीवरची शेती खणून काढावयाची असते. अशा रीतीने मशागत झाली की, तीत बी फेकून पेरणी केली जाते. औते आणि बैल यांचा वापर या शेतीत नसतो. नांगर, वखर इ. साधनांशिवाय ही तकलादू शेती केली जाते.

‘ पोडु’शेती डोंगराच्या उतरणीवर किंवा जवळपास करण्यासाठी तेथेच जवळ कुठेतरी टेकडीवर ४–२ घरे करून राहण्याची प्रवृत्ती अगोदर कोलामांमध्ये होती. “ शेती जवळ पडावी म्हणून ‘पोड’ अलग राहिले ” अशी कारणमीमांसा काही कोलाम म्हातारे देतात, त्यावरून शेती आणि वस्ती यांचा संबंध त्यांनाही काहीसा अंधुकपणे का होईना माहीत असावा, असे दिसते. ‘ पोडु’शेती करणारे कोलाम जेथे वसले त्या जागेला ‘ पोड ’ असे नाव या शेतीवरूनच रूढ झाले. ‘ पोडु’शेती करणारे लोक जेथे राहतात किंवा ‘ पोडु’शेतीच्या शेजारी जी वस्ती आहे, ती ‘ पोड ’ म्हणविली गेली हे यावरून स्पष्ट आहे. ‘ नाईकपोड ’ व ‘ कोलामपोड ’ या दोन शब्दांतील साम्यही असेच विचारात घेतले पाहिजे. कोलामांना यवतमाळ जिल्ह्यात ‘ नाईक ’ म्हणतात व त्यांच्या वस्तीला ‘ पोड ’ हे नाव आहे. किनवट–आदिलाबादेकडे नाईक-पोड नावाची जमात आहे. ‘ पोडु’शेती करणारे ‘नाईक’ असा त्यांच्या जातिनामाचा खुलासा होऊ शकतो.

दक्षिणी भाषामधील काही शब्द ‘ पोडु’शी संबंधित वाटतात आणि वरील विधाने व वर्णन यांना पूरक ठरतात. तेलगू भाषेत ‘ पोडुगु ’[१] या शब्दाचा अर्थ ‘ लांबी ’ असा असला तरी ‘ पोडुगुपार ’ या शब्दाचा अर्थ ‘ फावडे ’ असा आहे आणि ‘ पार ’ या शब्दाचा अर्थ ‘ कुदळ ’ असा आहे. पोडुगु ( लांब ) + पार ( कुदळ ) ( = फावडे ) या दोन शब्दांनी तयार झालेला ‘ पोडुगुपार ’ ( फावडे ) हा शब्द आणि वरील दोन्ही भिन्नभिन्न शब्द या सर्वांचे अर्थ लक्षणीय आहेत. मराठीतील ‘ पार–पहार ’ ( सब्बल ) हा शब्द व तेलगूतील ‘ पार ’ हा शब्द एकाच तोंडवळ्याचे आहेत. ह्या तेलगू शब्दांमधील अर्थ आणि कुदळी, फावडी व टोकदार काठ्या ( = पहारी ? ) यांच्यायोगे करावयाची ‘ पोडु’शेती आणि ती शेती करणारे लोक राहतात ते ‘ पोड ’ यांच्यातील नात्याची उकल होण्यास अडचण पडू नये !

---

१. तेलगू भाषेत :— पोडवैन—लांब; पोडुगु—लांबी; पोडुगैन—उंच.

तामिळ भाषेत ‘ पोड्डु ’ या शब्दाचा अर्थ ‘ फेकणे ’ असा आहे. दूरान्वयाने हा अर्थ ‘बी फेकणे ’ असा केला तर ‘ पोड्डु’शेतीशी त्या शब्दाचा संबंध दूरान्वयानेच पोचतो. कारण ‘ पोड्डु’शेती करणारे आदिवासी नुसते बी फेकूनच पेरणी करीत असत. आजही क्वचित आढळतात. तेलगू भाषेत ‘ पोलमु ’ या शब्दाचा अर्थ ‘ शेत ’ असा आहे. महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावरील कोकण-भागात ‘ पोंढ–ड-पोंढा ’ असा शब्द प्रचारात असून त्या शब्दाचा अर्थ ‘ भाताचे रोप लावण्यासाठी केलेला खोलगट जमिनीचा तुकडा ’ असा आहे.

## गाव एक, ‘ पोड ’ अनेक

एका गावाच्या लगत त्याच गावात समाविष्ट होणाऱ्या एकापेक्षा अधिक अशा कोलामवस्त्या काही जागी असतात. त्यांतील प्रत्येक वस्ती अलगअलग, बऱ्याच दूर अंतरावर वसली असते. नांझा ( ता. यवतमाळ ) हे कोलामांच्या वस्तीचे सर्वात मोठे गाव असून तेथे सहा ‘ कोलामपोड ’ आहेत. ‘ खडकी पोड, ’ ‘ गव्हाणकडी पोड, ’ ‘ लहान गणेश पोड, ’ ‘ मोठा गणेश पोड, ’ ‘ घारोड्या पोड ’ अशी त्या प्रत्येक वस्तीची नावे आहेत. एका गावात अनेक ‘ पोड ’ असले तर प्रत्येक ‘ पोडा’ला नावे दिलेली किंवा प्रचाराने पडलेली असतात. ती सहजपणे व सकारण प्रचारात येत असली तरी अगदी साधी असतात. उदा. नांझ्याच्या ज्या वस्तीत ‘ घारवडे ’ ( = घारी-गिधाडे ) बसतात, ती वस्ती म्हणजे ‘ घारोड्या पोड ’ ! खडकी गावाच्या रस्त्यावरचा तो ‘खडकीपोड’ ! यवतमाळ तालुक्यातील भारी, खोरद बु. या गावी तीन तीन ‘पोड’ असून रोहटेक, शिवनी खु. , पिंढा व भिसनी येथे दोन दोन पोड आहेत. भिसनीच्या दुसऱ्या ‘ पोडा’चे नाव ‘ मोळोना ’ असे आहे. पहूर–मार्कंड्यास चार ‘ पोड ’ आहेत. केळापूर तालुक्यातील खमकुंड, दहेगाव, पळसकुंड, करंजी, वागदा, मोहदा येथे तीन तीन ‘ कोलामपोड ’ आहेत. खमकुंड येथील ‘ पोडांची ’ नावे ‘ रेंगा उर ’ ( बोरगाव ! ), ‘ भोराटी पोड ’ ( = सनकाडीचा पोड ! ), ‘ शेंडा उर ’ अशी आहेत. दहेगावला ‘ डुकर पोड ’, ‘ गारगोटी पोड ’, ‘ नागदेव पोड ’ ( विहिरीत नागदेवता स्थानापन्न आहे म्हणून ) अशी नावे आहेत. मांगुर्डा येथे ‘सीता पोड’ व ‘ शंकर पोड ’ अशा नावांचे दोन ‘ पोड ’ आहेत. अंजी, सोनुर्ली ज्ळका, जीरा या गावी दोन दोन ‘ पोड ’ आहेत. एका गावाच्या ‘ पोडा ’चे नाव ‘ पारधी पोड ’ असे आढळले: तर दुसऱ्या एका गावातील ‘ पोडा’चे नाव ‘ सुपरटेकडी ’ असे दिसले. ‘ वाढीपोड ’ ( = सुताराचा पोड ! ) असेही नाव आढळले. काही जागी देवांच्या ( शंकर, गणेश इ. ) नावांवरून ‘पोडा’ना-नावे देण्याची पद्धती आढळली. एखाद्या गावाला जाणाऱ्या रस्त्यावर असलेल्या ‘ पोडां’ना त्या गावाची नावे दिलेली दिसली. उदाहरणार्थ, शिवनीला जाणाऱ्या रस्त्यावरचा ‘शिवनी पोड’; झोटींगदरा गावाला जाणाऱ्या रस्त्यावरचा ‘ झोटींगदरा पोड ’ !

कोलामांच्या वस्तीचे त्यांचे स्वतःचे एक न्यायव्यवस्थामंडळ असते. एका गावात जर अधिक ‘ कोलामपोड ’ असतील तर त्या प्रत्येक ‘ पोडा’चे न्यायव्यवस्थामंडळ अलगअलग असते. त्याच वस्तीतील व्यक्तींनी ते तयार झालेले असते. ‘ गावबांधणी- ’ सारखे मोठे उत्सव आणि इतर सामुदायिक सणोत्सवसुद्धा प्रत्येक वस्तीचे अलग-अलग होतात.

## वस्ती हलविणे आणि वसविणे

कोलाम लोक असंख्य वर्षे आपल्या एकाच वस्तीत राहत आले आहेत. ते अगदीच साधे, सरळ मनाचे व जगाचा फारसा संबंध न ठेवणारे, फार काय जवळच्याही गावांची नावे लवकर सांगू न शकणारे असे आहेत. जवळच्या गावातील माणसांशी मैत्री करण्यापेक्षा त्यांनी आजवर जंगली जीवांशी, जंगली शिलाखंडांशीच अधिक मैत्री केली आणि स्ववस्तीचीच जाण ठेवली !

बहुसंख्य कोलाम एकाच वस्तीत अनेक वर्षांपासून राहत आले असले तरी त्यांच्यापैकी काही जणांच्या गटांनी स्वतःचे जीवन, स्वतःची शेती व स्वतःची घरेही हलविल्याचे दृश्य यांच्या समाजात आढळते. यावरून ही जमात भटकी आहे, असा अर्थ मात्र करता कामा नये. पारधी, घिसाडखाती ह्या जाती जशा भटकत भटकत कुठेही रानावनात पाले मांडतात व वाटेल तेव्हा वस्ती हलवून दुसरीकडे जातात, तसे कोलामांचे नाही. कदाचित अतिप्राचीन काळी कोलाम लोक भटके असतीलही; पण निश्चित सांगता येत नाही. जेव्हापासून ते वस्ती करू लागले, शेतीवर मेहनत करू लागले, तेव्हापासून तरी चारदोन घरांपुरती का होईना, त्यांची वस्ती होत गेली व ती तेथेच राहिली. आणि हा काळ काही अलीकडचा नक्कीच नाही.

तरीपण, वस्ती व शेती हलविल्याची उदाहरणे काही कोलामांत घडतात. कोलाम जमात इतर जमातींशी विनाकारण भांडायला नेहमीच भिते. नसते आरोप ठेवून कोणी यांना गुन्हेगार ठरविले की यांना मनस्वी भय वाटते. अशा वेळी निकराचा प्रसंग येऊ पाहत असता हे स्वतःची वस्ती सोडून पळून जातात व दुसऱ्या वस्तीचा आसरा घेतात. स्वतःच्या मूळ वस्तीतील घरे तशीच मागे राहतात. त्यांची शेतीही ते सोडतात. हे स्थलांतर सामुदायिकपणे एकदम होते. पारवा या नावाचे एक लहानसे खेडे यवत-माळच्या आग्नेयेस ४ मैलांवर आहे. पारवेकर देशमुखांचे पारवा (ता. केळापूर) आणि हे पारवा ही दोन गावे वेगळी आहेत. यवतमाळजवळील या पारव्याला सुमारे चार वर्षांपूर्वी कुणाचा तरी खून झाला. त्यामुळे काही लोक पकडले गेले असे सांगतात. त्यांत कोलामांमधील एक तरुणही पकडला गेला. या प्रकरणामुळे कोलामवस्तीतील सगळ्या कोलामांना भयाने गाठले व रातोरात ‘ तुलुर ’ ( पळा ! ) म्हणून ते पळाले ! नंतर ते लोक बोथ या गावाजवळ वसले असे कळले. अशा गंभीर गुन्ह्यांच्या संदर्भात

नुसत्या आरोपाच्या शंकांनी व कधी गुन्ह्यांमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीने हे लोक स्वतःच्या वस्तीचा, घरांचा व स्थिर मालमत्तेचा मोह सोडून एकदम स्थलांतर करतात हे या उदाहरणावरून दिसेल. पारव्याच्या कोलामांच्या त्या उजाड वस्तीत आम्ही गेलो, तेव्हा गावाबाहेर अर्ध्या मैलावर टेकडीशेजारी वसलेल्या त्या वस्तीत फक्त उभी घरे आढळली. तीत एकही कोलाम नाही. गावात पाटलाकडे नोकरीस असलेली तीन कुटुंबे मात्र पळून गेली नाहीत. ही तीन कुटुंबे 'पोडा'त न राहता गावात राहतात. अशाच तऱ्हेची गुन्ह्यांच्या आरोपाखाली आलेली काही कुटुंबे व काही वस्त्यासुद्धा थोड्या पुढारलेल्या भागातून पळून जाऊन आदिलाबाद जिल्ह्यातील उतनूर तालुक्याच्या जंगलात स्थिर झाल्याची माहिती तिकडे मिळाली. अशी आवक झालेली कोलामकुटुंबे उतनूर तालुक्यात अधिक असल्याचे कळले. अशा लोकांच्या श्रमाचा फायदा तिकडील कोलामेतरांना अधिक मिळाल्यामुळे इतरांनी त्यांना जमिनी वगैरे दिल्या व त्यामुळे असे कोलाम लोक तिकडे स्थिरावले, असे अधिक चौकशीअंती समजले.

कोलामांमध्ये मालकांची शेती मक्त्याने वाहणारे लोक बरेच आहेत. मालक परगावाला असायचे किंवा गावात राहावयाचे. ते किंवा त्यांचे दिवाणजी एखाद्या वेळी मक्त्याचे पैसे घेण्याकरिता कोलामाकडे यायचे. त्या मालकाने किंवा दिवाणजीने जर कोलामास शिवी दिली तर त्या गोष्टीचा ही जमात विटाळ मानते. त्यानंतर त्या शेतीवर काम न करता शेती व वस्ती सोडून हे लोक दुसऱ्या गावाला जाऊन स्थिर होण्याचा प्रयत्न करतात. अशी उदाहरणे आता क्वचित आढळतात. पूर्वीसुद्धा अशी उदाहरणे कमीच घडत असत. अशाही पद्धतीने वस्ती हलविण्याचे या जमातीत घडत असे.

वस्तीतील एखाद्या घराला जरी आग लागली तरी ते अशुभ लक्षण मानून कोलाम लोक त्या वस्तीचा त्याग करतात. शेती व वस्ती सोडून देऊन ते दुसरीकडे निघून जातात.

कोलाम-स्त्रिया अधिक कष्टाळू असल्यामुळे या जमातीत त्यांची किंमत लग्नाच्या बाजारात अधिक असे ! त्यामुळे 'घरजावई' ठेवण्याची व जाण्याची रीतही या जमातीत अधिक प्रमाणात होती. कधीकधी घरजावई जाण्यामुळे 'कोलामपोड'च ओस पडत, असे कोलाम सांगतात ! या विधानातील अत्युक्ती वगळली तरी या पद्धतीने वस्तीतील काही लोक कमी होणे अशक्य नाही. एका ठिकाणचा माणूस दुसऱ्या गावी जाण्यामुळे मूळ वस्तीतील त्याची शेती व घर हे आपोआपच सुटत असे. आता घरजावयांचे प्रस्थ या जमातीत कमी आढळते.

कोलामवस्ती हलविण्याची वरील कारणे कमी प्रमाणात आढळणारी आहेत. त्यापेक्षाही महत्त्वाचे व पूर्वी थोड्या जास्त प्रमाणात आढळणारे मुख्य कारण वेगळे व

वैशिष्ट्यपूर्ण आहे. एखाद्या कोलामवस्तीच्या न्यायमंडळातील पंचांशी त्याच वस्तीतील एखाद्या गटाचे पटेनासे झाले तर स्वेच्छेने हा नवा गट त्या वस्तीचा त्याग ( भांडण न करता ) करतो. तेथील स्वत:ची घरे व शेतीवाडी सोडून काही कुटुंबे त्या वस्तीचा त्याग करतात. साधी घरे सोडणे व नवी करणे फारसे प्रयासाचे व खर्चाचे पडत नसावे, हेही एक कारण वसतित्यागामागे संभवते. परंतु, त्याहीपेक्षा भावनात्मक कारणेच अशा प्रक्रियांमध्ये दिसून येतात.

एका वस्तीतील एक गट न पटल्यामुळे स्वेच्छेने बाहेर पडल्यावर तो त्यानंतर नव्या वस्तीत स्वत:चे जीवन स्थिर करण्याचा प्रयत्न कशा तऱ्हेने करतो याची माहिती कोलामांच्या 'इतिहास'प्रकरणावरून सांगोपांग मिळते. कोलामांच्या मोठ्या सणोत्सवांमध्ये रात्री सोंगे काढून गाणी म्हणतांना कोलामांच्या जीवनाचा सविस्तर पट या 'इतिहासा'च्या रूपाने साकार होतो. हा इतिहास 'वेता' या नावाने कोलामी भाषेत 'सोंगाड्या' वा 'वेताळक' सांगतो किंवा म्हणतो. त्याबरहुकूम नृत्यगीतांचा खास कार्यक्रम चालतो. फुटून निघालेल्या कोलामांच्या नव्या गटाची ही वस्ती वसतांना काय काय होते किंवा कोलामांची कोणतीही वस्ती प्रथम जेव्हा वसली असेल तेव्हा काय झाले असेल याची कल्पना त्या 'इतिहासा'वरून येते. या 'इतिहासा'च्या आधारे असे दिसून येते की, एका वस्तीचा त्याग करून निघालेला काही कोलामकुटुंबांचा गट दुसरे एखादे डोंगरी गाव शोधून तेथे जातो. अगदी आरंभीच्या काळी कोलामवस्तीस सुरुवात झाली तीसुद्धा एखाद्या डोंगरी गावाचा असा शोध व आश्रय घेऊनच, असेही या 'इतिहासा'वरून दिसते. कोलामांच्या या 'इतिहासा'ची सुरुवात वस्ती वसण्याच्या कार्यक्रमापासूनच होते.

साधारणत: जंगल जवळ पडेल अशी, उतरणीवरील, पडीत व जंगली जमीन गावाच्या मुख्याकडून सहज मिळण्यास अडचण पडणार नाही अशा गावी काही कोलाम कुटुंबे जातात. तेथील पाटलाकडे किंवा मुख्याकडे जाऊन ते त्यास विनवितात, " मालक ! आम्ही काही कोलाम तुमच्या आश्रयाने गावाशेजारी वस्तीला राहू इच्छितो. तुम्ही गावाच्या जवळपास डोंगराच्या उतरणीवर आमच्या या पाचदहा कुटुंबांसाठी घरांना जागा द्या आणि शक्य असेल तर वाहितीला जमीन द्या किंवा शेतमजुरीची कामे द्या. " त्यांची विनवणी पाटलास प्रामाणिक वाटली तर वस्तीस व वाहितीस जमीन फुकटातही वाहायला दिली जाते. या लोकांचा आपल्या कामांसाठी उपयोग होईल ही भावनासुद्धा पाटलाच्या दयाबुद्धीमागे असते.

'इतिहासा'च्या गाण्यातील वरील वर्णनानंतर पुढे वस्ती करण्याचे वर्णन येते. गावाच्या मुख्याने वा पाटलाने एकदा अनुमती दिली की, कोलामांचा तो पाचदहा कुटुंबांचा गट वस्तीला योग्य अशी गावाजवळची जमीन निवडतो. ही निवड सर्व दृष्टींनी सोयीची होईल, अशा पद्धतीने होते. जवळपासच्या इतर गावांतील 'कोलामपोडां'चे

मुख्य ' नाईक ' निमंत्रिले जातात. त्यांच्या मदतीने व आपल्यातील किंवा दुसऱ्या एखाद्या वस्तीतील ' भगता'च्या सल्ल्याने नव्या वस्तीची जागा पक्की करण्यात येते. ' भगत ' हा त्या जागेच्या शुभाशुभ वैशिष्ट्यांबद्दल सल्ला देतो. त्याच्या ' अंगात देव येतो '. ' ही जागा उत्तम ' आहे असे तो ' देव ' सांगतो. ' अंगात आल्यावर ' तो ' भगत ' म्हणतो-" कानांनी ऐकू येईल; पण डोळ्यांनी दिसू देणार नाही-- असा देव येथे नांदेल; विश्वास ठेवा. " त्या देवाजवळ प्रश्नोत्तरे होतात. लोक विचारतात, " गावाचे काही होईल का ? " तेव्हा ' भगत ' म्हणतो, " हे गाव सुरक्षित राहील. काही होणार नाही. " पुन्हा ' देव ' सांगतो, " येथे या बाजूला एक देव आहे. आंबील देऊन त्याची शांती कराल तर गाव अधिक सुरक्षित राहील. "

अशा तऱ्हेने प्रश्नोत्तरे झाल्यावर तो ' भगत ', आजूबाजूच्या कोलामवस्त्यांचे मुख्य ( नाईक ) आणि नवीन वस्ती वसविणारा कोलामसमूह हे सर्व मिळून नवी वस्ती वसवावयाच्या जागी चार कोपऱ्यावर चार दगड ठेवतात. त्या चौकोनी जागेत प्रथम कोलामांची मुख्य देवता जी माहूरची देवी, तिची स्थापना मध्यभागी कोलामांच्या ' भगता'च्या हस्ते करण्यात येते. ' भगत ' सांगतो व कोलाम लोक दगड आणतात. हे दगड ' भगत ' आपल्या हातांनी वस्तीच्या चार कोपऱ्यांवर व देवीच्या स्थळी मांडतो. तेच दगड नंतर देव म्हणविले जातात. देवीचे तोंड माहूरकडे किंवा दक्षिणेकडे असावे, अशी दृष्टी असते.

बाजारात जाऊन काही कोलामांनी एक मेंढा विकत आणलेला असतो. तो मेंढा या नव्या वस्तीसाठी नेमलेल्या जागेच्या आग्नेय कोपऱ्यातील दगडाच्या देवाजवळ उभा करतात. ह्या देवाला ' मोराम ' असे म्हणतात. या ' मोराम 'देवाची स्थापना वस्तीच्या आरंभापासूनच होते. ' मोरामा'जवळ उभा केलेल्या मेंढ्याचा बळी दिला जातो. मेंढ्याच्या मांसाची शिजवून भाजी तयार केली जाते. या भाजीबरोबर खाण्यासाठी खीस ( = खिचडा; कांडलेल्या ज्वारीचा शिजविलेला विशिष्ट पदार्थ ) करतात. मेंढ्याच्या मांसाची भाजी व खीस या दोहोंचा नैवेद्य 'मोराम'देवाला व देवीला दाखवितात आणि नंतर सर्वजण त्या पदार्थांवर ताव मारतात.

नव्याने अशी वस्ती होताना त्या नव्या वस्तीसाठी ' नाईक ', ' कारभारी ', ' महाजन ' व ' घस्या ' या लोकांचे पंचमंडळ वा न्यायव्यवस्थामंडळ निवडण्यात येते. हे पंचमंडळ प्रथम तीन वर्षे काम करते आणि नंतर दर वर्षाला बदलले जाते. त्या नव्या वस्तीत कोलामांचा मुख्य मानला गेलेला ' गावबांधणी ' हा वार्षिक उत्सवसुद्धा तीन वर्षेपर्यंत होत नाही. कोलामांची मने स्थलांतराने अस्थिर झालेली असतात. त्यांच्यात भावात्मक व संरक्षणात्मक स्थैर्य येण्यासाठी एवढा अवधी लागतोच. त्या दृष्टीने नव्या वस्तीत तीन वर्षे ' गावबांधणी ' होत नाही हे व्यावहारिकतेला धरूनच आहे, असे म्हटले पाहिजे !

'मोराम'देवाला मेंढा देऊन प्रथम वस्ती वसविली जाते, त्यानंतर दर तीन वर्षांनी 'मोराम'देवाची पूजा करण्याची प्रथा त्या वस्तीत सुरू राहते. कोलामांच्या प्रत्येक वस्तीचा हा नियम आहे. मेंढ्याबरोबर 'मोरामा'ला पूर्वी बैल, गायी यांसारखे पशू बळी देण्याची प्रथा होती. पण आता मेंढा तेवढाच बळी देतात. कोलामांच्या 'वेता' किंवा 'इतिहास' नामक प्रकरणावरून असे दिसते की, प्राचीन काळी कोलामांनी नवीन वस्ती केली असेल तेव्हा प्रथम 'मोराम'देवाची वरीलप्रमाणे पूजा करून वस्ती केली व नंतर तीन वर्षांनी पुढच्या उत्सवादि परंपरा सुरू झाल्या.

एकदा देवतांची प्रतिष्ठापना झाली की, मग कोलाम लोक आपली घरे बांधायाची तयारी करतात. शेजारच्या जंगलातून गवत व लाकडे आणण्याची रम्य गीते 'इतिहासा'त आहेत. गवताला जाणाऱ्या स्त्रिया हास्य-मनोरंजनासह गवत कापून आणतात. पुरुष वेल्वाख आणि लाकडे आणतात. या साहित्यानिशी ही नवी वस्ती नव्या घरांनी नटू लागते! वस्तीत एखादा कोलामसुतार असल्यास शेतीवाडीची औजारे व बैलगाड्या करविण्यासाठी त्याची मदत घेतात. नसल्यास गावातील कोलामेतर सुतार आणि लोहार यांच्या मदतीने गरजेची कामे करण्यात येतात. सुतार आणि लोहार 'दानीने' (=वर्षाकाठी काही धान्य घेऊन) काम करण्यास तयार होतात. शेतीची औजारे तयार झाल्यावर पडीत किंवा मक्त्याची जमीन निवडून किंवा पाटलास (वा मुख्यास) मागून शेती करण्यासाठी सुरुवात होते. सर्वांना शेती पुरेशी नसल्यास काही जण मजुरीची कामे करतात. जीवनाची घडी बसली की, नित्याचे सणोत्सव त्या वस्तीत सुरू होतात. हे सारे वस्ती वसविण्याचे वर्णन ह्या पद्धतीने 'इतिहासा'त कथन केलेले असून नृत्यगीतांसह ते जातिबांधवाना सणोत्सवात व लग्नांत कृतिपर दाखविले जाते.

स्थलांतर करून अशा तऱ्हेने वसलेल्या वस्तींची उदाहरणे आजकाल आढळत नाहीत. ४० वर्षांपूर्वी स्थलांतरित झालेली काही कोलामकुटुंबे वरोरा (जि. चांदा) तालुक्यात मांगली व पिंजदुरा या गावी वस्ती करून राहिली व स्थिरावली. ह्या दोन्ही वस्तींचे कोलाम यवतमाळ तालुक्यातून आलेले आहेत. राजुरा तालुक्यातील बरेचसे कोलाम वणी तालुक्यातून पूर्वी केव्हातरी आलेले आहेत. उतनूर (जि. आदिलाबाद) तालुक्यात स्थिरावलेल्या कोलामांच्या वस्तींच्या बाबतीतही काहीशी हीच स्थिती आहे.

## 'कोलामपोडा'ची रचना

कोलामांची कोणतीही वस्ती रचनादृष्ट्या मोठी नीटस व पद्धतशीर असते. वस्तीच्या मध्यभागी कोलामांचे सार्वजनिक सभागृह ('चावडी') असते. हे फारसे मोठे नसते. चौकोनी आकाराची ती एक झोपडी असते. या झोपडीची पुढील बाजू उघडी असते. या 'चावडी'पुढे शेकोटीची लांबोळी जागा असते.

कोलामांच्या वस्तीची रचना चौकोनाकृती असते. ती वाकडीतिकडी नसते. या वस्तीतील कोणताही रस्ता 'चावडी'ला येऊन मिळतो. 'चावडी'पुढच्या अंगणात 'माहूरची देवी' असते तेथवर किंवा त्या अंगणापर्यंत हे रस्ते येतात. कोलामांची घरे रांगेत आणि सारख्या आकाराची असतात. या घरांची तोंडे पश्चिमेकडे नसतात. बाकी कोणत्याही दिशेस तोंडे असलेली घरे वस्तीत आढळतात. एका ओळीतील घरांची तोंडे एकाच दिशेला असतात.

पूर्वी स्त्रियांना जाण्यासाठी 'कोलामपोडा'त वेगळे मार्ग असत, म्हाताऱ्यांसाठी अलग रस्ते ठेवीत आणि 'चावडी'ला जाणाऱ्यायेणाऱ्यांचे मार्ग अलग ठेवले जात असत, असे कोलामांच्या गीतनृत्यांत प्रकट होणाऱ्या 'इतिहासा'वरून वाटते.

वस्तीच्या स्वच्छतेत व टापटीपपणात हे लोक कमालीचे पुढे आहेत. यांची घरेसुद्धा फार स्वच्छ असतात. वस्ती आणि घरात केरकचरा कोठेही पडलेला आढळत नाही. सडासारवण रोज केलेच पाहिजे, असे जरी नसले तरी आठवड्यातून एखाद्या दिवशी संपूर्ण घर, ओसरी, अंगण, 'चावडी' आणि रस्ते साफ केले जातात. आता दररोजसुद्धा ही कामे करण्याची रीत काही 'पोडां'वर पडली आहे. खाल्ले की कामाला जाणे आणि एरवी झोपा काढणे इकडे या लोकांचा यापूर्वी थोडा जास्त कल होता. आता हा काहीसा कमी झाला. यामुळे पूर्वीपेक्षा आता हे लोक स्वच्छतेकडे अधिक लक्ष देतात. इतरांच्या वस्तींच्या मानाने कोलामांची वसतिस्थाने कमालीची नीटनेटकी व स्वच्छ असतात. हे परंपरेनेच त्या लोकांना अवगत आहे. कोणत्याही सुधारणेमुळे असे काही घडले, असे कोणी समजू नये. डॉ. इरावती कर्वे यांनी कोलामांची वस्ती पाहून काढलेले उद्गार बोलके आहेत–"इतकी स्वच्छ, योजनाबद्ध आखणी मी अजून कोणत्याही ठिकाणी पाहिली नाही. अशी पद्धत सर्व कोलामांची आहे असे मला सांगण्यात आले."[१] एखादे स्वतंत्र व व्यवस्थित राज्य असावे, तसा 'कोलामपोड' असतो. मात्र, हे राज्य गरिबांचे असते !

२ : :

## यवतमाळ जिल्हा आणि कोलामांची घरे

यवतमाळ जिल्ह्यातील कोलामांच्या घरांची माहिती पुढील यादीवरून कळून येईल. प्रथम यवतमाळ तालुक्याची यादी देत आहे. ( घरांची संख्या १९६४ मध्ये केलेल्या पाहणीवरून दिली आहे. )

---

१. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती—पृ. ११०-१११

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| यवतमाळ | २५ | वडगाव | ४ | बोधगव्हाण | १० |
| वाघापूर | ५५ | गोधनी इजारा | ४० | भोसा | ६ |
| धानोरा | १८ | किटा | २० | निळोणा | ३० |
| पारवा | ३ | किन्ही इजारा | ५७ | जांब | २० |
| डोरली | १० | तळेगाव | २५ | बरबडा | ८ |
| मोहा | ६० | कारली | १२० | चौधरा | ५ |
| मेंढला | ४० | मडकोना | ४३ | घोडखिंडी | २६ |
| बोरगाव | ३८ | भारी | ९० | रातचांदणं | ४० |
| दाई | १५ | वार्का | ३० | खरद | २० |
| झोला | ६ | धामनी | २० | म्हसोला | ३० |
| टाकळी इजारा | ५ | खानगाव | २० | अर्जुना | २० |
| सावर | ४० | जामडोह | ५० | मनपूर | २० |
| हातोला | २५ | मुरझडी इजारा | २६ | वेचखेडा | ६ |
| पिंपरी | ३० | जोडमोहा | ३० | रुई | १० |
| पांढुर्णा | ४० | खोरद खुर्द | ८ | वेलोरा | २० |
| आसोला | ५ | शेळी | ९ | रुई गोसावी | २० |
| काप्रा-महारथड | ७६ | येरद | २० | घटाणा | ३० |
| लोहारा | ४० | शिवनी बुद्रुक | ४० | लोणी | २० |
| भिसनी-मोळोना | २७ | मुरझडी ताभारी | ७२ | सायखेडा खुर्द | १० |
| चिचबर्डी | २८ | चापडोह | २० | बोरी सिंह | १० |
| पिंपरी इजारा | २५ | चिचघाट | २० | सालोड | १२ |
| भोयर | ३६ | सावरगड | १० | मादणी | ३४ |
| कळंब | ३२ | सायखेडा ( दुधाना ) | ३० | मांजर्डा | ८ |
| रासा | २२ | नांझा | १४४ | झुली | ७ |
| दत्तापूर | ४० | पोडगव्हाण | ४० | मेटीखेडा | ४० |
| चापर्डा | ५४ | खोरद बु. | ४० | पहूर इजारा | ४७ |
| घोटी | २७ | पिढा | ३० | वेलोरी | १५ |
| वेलोना | १४ | पिंपळखुटी | ७ | किन्हाळा | ४ |
| नरसापूर | १५ | शिवनी खु. | ४० | पालोती | ३ |
| राजूर | १३ | खैरी | ३६ | कोलझरी | ९ |
| कान्होली | ११ | पोफळणी | ३५ | नकटी पार्डी | १२ |
| खडकी | २५ | शरद | ५१ | प्रधानबोरी | ७ |

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| सरपधरी | २० | मोहदरी | १५ | आष्टी ( अगासकांड ) | ३५ |
| दुग | १२ | वाढोणा खु. | ३० | धनोडी | ११ |
| निंबगव्हाण | २० | गांढा | ९ | पिंपळगाव होरे | १५ |
| येळाबारा | ४० | हिरडी | ५० | पार्डी | ७ |
| रोहटेक | ४० | अकोला बाजार | २० | वडगाव ( पो. स्टे. ) | १५ |
| सायखेडा बु. | ३ | हातगाव | १० | आकपुरी ( गणेशपूर ) | १५ |
| दहेली | १० | पिंपरी बुटी | २० | कारेगाव | १३ |
| सुकळी | २० | वरझडी | २१ | कोळंबी | १३ |
| वागदा | ५ | येवती | १४ | हिवरी | २० |
| वटबोरी | २० | वरूड | ५ | धानोरा | १० |
| रामगाव | २० | खैरगाव | १० | मुरझडी | २० |
| बार्की | १० | कामठवाडा | ८ | झपाटखेडा | ३० |
| बाभूळगाव | ५ | कोटंबा | ४ | देवगाव | २० |
| आसेगाव | ३० | नायगाव | २० | चिमणापूर | ३ |
| गळव्हा | २० | वीरखेड | २१ | बोरगाव | १५ |
| कोपरा | २५ | मिटनापूर | ९ | चेंडकापूर | १५ |
| गणोरी | १८ | येरंडगाव | १५ | यावली | ५० |
| राणीउमरावती | २० | पिंपरी | १३ | पिंपळगाव | १३ |
| घारफळ | १५ | नांदुरा खुर्द | २ | महंमदपूर | ४० |
| शिंदी | २१ | माहुली | ३० | टाकळगाव | ६ |
| सारफळी | १९ | तरोडा | २० | करळगाव | ३१ |
| खर्डा | १६ | पंचगव्हाण | २५ | चोंढी | २९ |
| सरूळ | २४ | कृष्णापूर | ६ | | |

एकूण घरे ४,००७

कोलामांची वस्ती असलेल्या प्रत्येक गावात कोलामांची सरासरी २४ घरे यवतमाळ तालुक्यात आढळतात. प्रारंभीच्या ४–२ घरांवरून हे प्रमाण वाढत जाऊन १५–२० वर्षांपूर्वी १०–१२ घरे असे होते. आज ते २४ झाले आहे. काही गावांमध्ये दोनदोन, तीनतीन 'पोड' आहेत. त्यांची गणना प्रत्येक वस्ती अलग समजून केल्यास हे प्रमाण प्रत्येक वस्तीमागे २० घरे असे पडू शकते. साधारणतः १८–२० घरांची वस्ती म्हणजे आजचा 'कोलामपोड' असे मानावयास हरकत नाही.

यवतमाळ तालुक्यात ३८,३८८ घरे असून कोलामांच्या वाट्याला ४,००७ घरे आली आहेत. एकूण घरांमधील शे. १० घरे कोलामांच्या वाट्याला आलेली दिसत

आहेत. १९६४ मध्ये घरसंख्या वाढली असे गृहीत धरल्यास हे प्रमाण नक्कीच कमी होईल. कोलामांचे घर म्हणजे एकटी खोली अशी स्थिती असल्यामुळे घरातील कर्ता मुलगा लवकरच वेगळे घर थाटतो. त्यामुळेही कोलामांची घरे प्रमाणात अधिक आढळतात. वस्तुतः त्यांची घरे ‘ घरे ’ नसून दरिद्री झोपड्या असतात !

## केळापूर तालुका

केळापूर तालुक्यात यवतमाळ तालुक्याच्या खालोखाल कोलामांची संख्या आहे. या तालुक्यातील गाववार घरांचा पुढील अंदाज आढळला. त्यापैकी काही गावांचे आकडे नक्की स्वरूपाचे आहेत.

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| कोंगारा | २० | आंवेझरी | २० | अंजी | ३० |
| बेलुरी | २० | डोरली | १० | आटमुर्डी | ३० |
| वाई | २५ | मंगी डिगडोह | ३० | भुल्गड | २० |
| कोंढी | २२ | वागदा | ६० | लोणी | ४० |
| ढोकी | २० | करणवाडी | ५ | बंदर | १२ |
| जांब | २० | चनाई | १५ | तेजनी | ३५ |
| वर्ना | ४० | सुरदेवी | २० | विहीरगाव | ३० |
| वाघोली | १० | खैरगाव दे. | १५ | वर्ध–सुमानहेटी | ९२ + २१ |
| मारेगाव | १२ | धारणा | १२ | सावरखेड | ३० |
| कारेगाव | २० | घोन्सी | १६ | खमकुंड | ९० |
| हिवरी | १० | केळापूर | ५० | खैरगावकासार | ४० |
| दर्यापूर | १० | क्रिन्ही | २ | चोंदी | २० |
| केगाव | १२ | खैरगाव | २० | सराटी | १५ |
| खैरगाव बु. | ३० | करंजी | ७० | पळसकुंड | ५० |
| खैरगाव खु. | २० | जगी | १५ | उमरविहीर | १२ |
| कोची | ७ | बोथ | १० | सिंगलडीप | ६० |
| दाभा | १० | पहापळ | १२ | खातारा | १० |
| जीरा | ४० | मोहदा | १२५ | अडणी | ३० |
| मीरा | १५ | मांगुर्डा (मांगुर्ले) | ४० | देवधरी | २० |
| जोगीनकवडा | १६ | सुन्ना | २५ | सोनुर्ली–ज. | ५० |
| चिखलधरा | ४३ | शिवणी ( प्र. ) | ८० | जळका | ७० |
| मोहदरी | ९ | वासरी | ३० | सखी खुर्द | १२ |
| कृष्णापूर | १४ | शिरोली | २५ | वाठोडा | १० |

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| गणेशपूर | २० | जुनोनी | २४ | दहेगाव | ५० |
| पिंपळापूर | २ | किन्ही | १० | झाडगाव | १ |
| सखी बु. | ४० | पेंडरी | २० | किन्ही–जवादे | १५ |
| घोडदरा | १२ | बोदडी | १२ | एकुर्ली | ८ |
| वाढोणा खु. | ७ | पंगडी | १० | मुंझाळा | २४ |
| बहात्तर | ७ | मांडवा | १० | कोपामांडवी (कोपबाई) | ५ |
| | | | | एकूण घरे | २,२६० |

केळापूर तालुक्यात प्रत्येक कोलामवस्तीत सुमारे २६ घरे आहेत असे वरील आकड्यांवरून दिसते. या तालुक्यात बऱ्याच गावी २–२, ३–३ ‘पोड’ आहेत. ‘पोड’ म्हणजे एक वस्ती, हे जमेस धरले असता ही संख्या २० पर्यंत येते. यवतमाळ तालुक्यातही साधारणतः एवढेच प्रमाण पडते.

केळापूर तालुक्यात ३४,४५२ घरे असून ८७ गावांतील कोलामांच्या वाट्याला २,२६० घरे आलेली दिसतात. शेकडा ७ घरे कोलामांच्या वाट्याला आलेली आहेत, असे यावरून दिसते. (याशिवाय काही गावांत कोलामांची घरे किती आहेत, ते कळू शकले नाही.)

## वणी तालुका

वणी तालुक्यातही कोलामांची संख्या बरीच आहे. या तालुक्यात कोलाम असलेल्या ज्या गावांतील घरांची संख्या अंदाजे कळली, ती पुढे देत आहे. काही गावांचे आकडे नक्की आहेत.

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| बोरी बु. | १२ | मंढनी | १० | खंडणी | ३० |
| मांगली | ५ | रोहपट | ३५ | आवळगाव आं. | १८ |
| शिंदी | १२ | पेंढरी | ३५ | बागदरा | ४० |
| महागाव | १५ | सगणापूर | १५ | दुर्गाडा | १० |
| खेकडवाई | ५० | अर्जुनी | १० | आंबेझरी खु. | १० |
| घोगुल्दरा | ३० | बोर्डा | ५ | आंबेझरी बु. | १० |
| शिवनाला | ५५ | गोधनी | १० | कुंडी | १० |
| नरसाळा | २५ | उमरघाट | १० | टेंभी | ६० |

| गाव | घरे | गाव | घरे | गाव | घरे |
|---|---|---|---|---|---|
| बुरांडा-गोंड | १५ | साखरा | २० | मूळगव्हाण | २० |
| पांढरकवडा | ४ | भालेवाडी | १६ | चिखलडोह | २० |
| पिजगाव | १० | इंझासन | ६ | कारेगाव खु. | १० |
| सालेभट्टी | ३० | कुंभारखन | १३ | निंबादेवी | १२ |
| रासा | १० | वल्लासा | ५ | जुनोनी | ६ |
| वीरकुंड | १० | लेंढोरी | १० | गवारा | ७ |
| दहेगाव | २० | येसापूर | १० | आंबेझरी | १० |
| वेगाव | १५ | चिंचघाट | १२ | सुरदापूर | १० |
| खापरी | १० | जुनोनी | १३ | कमळवेली | ५ |
| हटवांजरी | २० | निमनी | ६० | मुधाटी | २० |
| बुरांडा-खडकी | २५ | झमकोला | ३० | शेकापूर | १० |
| सराटी | २० | सुरला | १० | माथार्जुन | २० |
| झळका | २० | पाचपोहोर | ५ | मांडवी | १० |
| पांडविहीर | १५ | दाभाडी | ४ | पांढरवानी | १३ |
| चिंचोनी-बोटोनी | २० | बोरगाव | १० | महादापूर | ६ |
| खैरगाव बु. | ३५ | | | एकूण घरे | १,१५४ |

वणी तालुक्यात प्रत्येक कोलामवस्तीत १७ घरे आहेत, असे वरील आकड्यांवरून दिसून येते. २–२, ३–३ ' पोड ' असलेल्या गावांची वस्ती अलग धरल्यास ही संख्या १३–१४ पर्यंत येते.

वणी तालुक्यात ३४,२६१ घरे असून ७० गावांतील कोलामांच्या वाट्याला १,१५४ घरे आलेली दिसतात. शे. ४ घरे कोलामांच्या वाट्याची आहेत, असे दिसते. अर्थात हे प्रमाण यापेक्षा अधिक असणार! कारण कोलामांच्या काही वस्तीतील घरांची संख्या कळू शकली नाही.

यवतमाळ जिल्ह्यातील कोलामांच्या वस्तीचे यवतमाळ, केळापूर व वणी हे तीन तालुके मुख्य असून या तिन्ही तालुक्यांतील प्रत्येक गावात साधारणतः २२–२३ घरे असे प्रमाण पडते. त्यातच प्रत्येक ' पोड ' अलग वस्ती धरल्यास प्रत्येकी १७–१८ घरे असे हे प्रमाण पडते. तसेच कोलामांच्या वाट्याला आलेली घरे शेकडा ७ च्या वर निश्चितच आहेत, असेही यावरून दिसते.

दारव्हा व पुसद या तालुक्यांत कोलामांची वस्ती कमी असल्यामुळे त्यांच्या घरांची नोंद येथे घेतलेली नाही.

## घरांची दशा

'कोलामपोडा'वर गवती छपरांची पंधरावीस घरे असतात. खऱ्या अर्थाने ही घरे निसर्गाने निर्माण केलेली असतात. जंगलात मुबलकपणे मिळणारे गवत, लाकूडफाटे व काड्या यांनी ही घरे तयार होतात. पळस, मोह, साग यांची मोठमोठी पानेही विपुल असतात. त्यामुळे घर चांगल्या रीतीने छावता येते. यांची घरे कमी खर्चात व कमी अवधीत तयार होऊ शकतात.

कोलामांची घरे अगदीच जवळजवळ एकमेकांना लागूनलागूनच असतात. आपल्या घरातील एक किंवा दोन खोल्यांना लागणारी जागा कोलामांच्या एका संपूर्ण घराला पुरते. त्या घराला तुराट्या, पराट्या, काटक्या अथवा वेलावाखाच्या काड्यांच्या ताट्या वा कूड यांच्या चार बाजू असतात. त्याच त्यांच्या भिंती होत. मध्ये दोन उभ्या फाट्यांवर एका आडव्या बल्लीचे आढे करून शाकारलेल्या काड्या आणि वाळलेले गवत यांनी वरचे छप्पर छावले जाते. बरेचदा यांचे हे खोलीवजा घर एवढे लहान असते की, त्यावर एक इरले टाकले तरी पुरते. या संपूर्ण घराची उंची कमीत कमी ६ फूट आणि जास्तीत जास्त ९ फूट असते. मातीचे हे घर सारवले जाते आणि समोरचे लहानसे अंगण सडा टाकून साफ व निबर ठेवण्यात येते.

घरात खोल्या किंवा स्वयंपाकगृहाची वेगळी व्यवस्था नसते. उठणे, बसणे, खाणे, पिणे, निजणे सारे काही त्या एकाच खोलीत होते. क्वचित् काही घरांमध्ये सिद भरून किवा कूड करून दुसरी खोली काढली जाते. पण त्यात फारशी सोय नसते. नावापुरत्याच ह्या एका मोठ्या खोलीच्या दोन खोल्या केल्या जातात.

घराला एकच दार असून तेही वाकून जावे लागण्याइतके ठेंगणे व अरुंद असते. घराचे दारही गवतकाडीचे वा तुराट्यापराट्यांच्या कड्यांचे असते. अशा दारांना वऱ्हाडात झोपा वा झोपाटा म्हणण्याची प्रथा आहे.

कोलामांच्या घराच्या पुढच्या जागेला बंद आवार नसते. झोपडीच्या कुडाच्या चार भिंतींशिवाय कोणताच बंद असा भाग नसतो. घराच्या आगेमागे पावसाळ्यात कोहळीं, दोडकी असे वेल लावून भाजीपाल्याची व्यवस्था हे लोक करतात. गवती झोपड्यांवर वेलांची जाळी विणल्यासारखे दिसते. झोपडीला लागूनच बाहेरच्या बाजूस यांची न्हाणी ( स्नानगृह ) असते. ती बहुधा उघडीच असते. क्वचित काटक्यांचा मांडव केलेला असतो. या न्हाणीत एक साधा चापट दगड बसायला ठेवतात. एक मातीची नांद, ४-२ 'हेल' ( घागरी ) आणि कधीकधी एखादा रांजणही ठेवलेला असतो. त्यात पाणी साठविले जाते. कोलाम लोक न्हाणीजवळ फारशी घाण साचू देत नाहीत. उतरणीवरच वस्ती असल्यामुळेही घाण पाणी दूरवर वाहून जाते. कोलाम स्त्रीपुरुष अशा उघड्या स्नानगृहातच आंघोळी करतात.



कोलामांचे घर

यांच्या घरांची स्थिती आर्थिक दृष्ट्या फार वाईट असते. कोलाम-वस्तीत कोणत्याही घरावर कौले दिसणार नाहीत. गवताचीच घरे असतात. ते गवत बदलविणे-सुद्धा त्यांना आजकाल महाग पडते. म्हणून कोलामांची घरे बहुधा कुजलेल्या गवताची म्हणजे ' बुरां 'ची आढळतात. ही घरे यांच्या दारिद्र्याचे स्पष्ट चित्र अडाण्यालाही समजावून देण्यास समर्थ असतात. यांच्या घराला मातीच्या भिंती नसतातच. काटक्यांचा नि कुडांचाच पसारा असतो. अगदी अलीकडे यवतमाळसारख्या शहरी वस्तीच्या जवळ असलेल्या व सडकेवरील ' पोडां'त काही कोलामांच्या घरांच्या भिंती अगदी अपवादादाखलच मातीच्या झालेल्या दिसतात. या घरांवर कौलेही आढळतात. ( उदा. मडकोना, भारी या गावी अशी काही घरे आढळली. )

काही गावी सरकारी मदतीमुळे कोलामांच्या घरात अल्पसे बदल झालेले दिसतात. कळंब येथे त्यांच्या सार्वजनिक सभागृहासाठी ( ' चावडी'साठी ) कोलामांना विकास-कार्यालयाने कौले पुरविली आहेत. भालेवाडी व सालेभट्टी येथे सरकारने कोलामांसाठी काही घरे बांधून दिली आहेत. परंतु हे अपवाद वा नमुने म्हणजे सुधारणा नव्हे किंवा कोलामांच्या झोपड्यांचा साचा या अपवादामुळे बदललेला दिसतो असेही नव्हे.

पारवा आणि मेटीखेडा येथेही सरकारने आदिवासींसाठी काही घरे बांधली आहेत. मेटीखेडा येथील घरे निरुपयोगी ठरलेली असून पारवा येथील घरांचा वापर न केल्यामुळे त्या चांगल्या घरांची पडझड होत आहे.

## घराच्या आत

कोलामांचे घर एका खोलीचे असल्यामुळे त्यात सामान अगदीच कमी मावते. शिवाय कोलामांच्या कमगर्जी स्वभावामुळे खोलीत सामानाची गजबज होत नाही. दारिद्र्यामुळे सामान वाढत नाही किंवा गरजेव्यतिरिक्त सामान घेतले जात नाही, हेही आलेच!

यांच्या घराला स्वतंत्र ओसरी नसते. घरांना पायऱ्याही बहुतेक नसतात. असले तर एखाद्याच पायरीने घर उंच असते. घरात फरशी वा दगड नसतात.

घरात एक मोडकेतोडके चुलगट ( चूल ) एका कोपऱ्यात असते किंवा तीन दगडांचा ' इटोला ' ( चुलीसारखे विटादगड मांडणे ) असतो ह्या चुलीजवळ मातीची एकदोन पसरट पाळी ( = मातीच्या थाळ्या ) व मातीच्या सानक्या ( = झाकण्या ) असतात. सानक्या-पाळ्यातून हे लोक जेवण करतात आणि झाकण्यासाठीही त्यांचा वापर करतात. शिजविण्यासाठी मातीच्या मडक्यांचा वापर केला जातो. हांडक्या-मडक्यांची एक लहानशी उतरंड घरात असते व त्यांपैकी काहींमध्ये मीठ, मिरची, ज्वारी असले पदार्थ ( उपलब्ध असल्यास व शक्य असल्यास ) राखून ठेवतात. यांच्याकडे तांब्यापितळेचे कोपर, थाळ्या, गंज क्वचित असतात. पाणी पिण्यासाठी अल्युमिनियमचे किंवा पितळी पेले आणि एखादा पितळी लोटा घरात आता आढळू लागला आहे. टिनाची ' थाली ' ( = लोटा ) मात्र बहुतेकाकडे असते. टिनाच्या ह्या लोट्याचा उपयोग शौचाला जाण्यासाठी, अंगावर पाणी घेण्यासाठी, हातपाय-तोंड धुण्यासाठी केला जातो. वस्तुतः धातूंचा वापर या काही वर्षांत सुरू झाला. त्यापूर्वी हे लोक पाणी पिण्यासाठी तुंब्याचा ( = भोपळ्याच्या लोट्याचा ) उपयोग करीत असत. आजही बहुसंख्य कोलाम तुंब्या वापरतात. तुंब्या मोठा असल्यास त्याचा उपयोग झारी, चरवी वा गुंड ( = हंडा ) यांच्याप्रमाणे पाणी साठवून ठेवण्यासाठी करतात.

पीठ भिजवायला पाळ्याऐवजी ' काठौका'चा ( लाकडी परातीचा वा कोपराचा ) उपयोग बरेच कोलाम करतात. प्रत्येक कोलामाकडे लोखंडी तवा असतो. वरण व पातळ भाजी वाढण्यासाठी आणि ढवळण्यासाठी ' चाटू'चा ( लाकडी पळीचा ) उपयोग करण्यात येतो. सराटा ( = उलथणे ) आता आला असला तरी काही वर्षांपूर्वी सराट्याचे काम कामचीने केले जाई. जळण म्हणून काटक्या, तुराट्या, पराट्या व सनकाड्या यांचा उपयोग केला जातो.

यांच्या घरात खिडक्या ठेवून उजेडाची सोय केलेली नसते. सायंकाळनंतर मातीच्या तेलाच्या चिमण्या अलीकडे क्वचितच दिसतात. काही काळापूर्वी कोलामांकडे दिव्याची सोय मुळीच नसायची ! त्यावेळी ते घरात एक शेगडीवजा आगटी किंवा जगरे पेटवून त्याच्या प्रकाशात स्वयंपाक करीत आणि जेवणे आटोपून अंधारात झोपत.

नंतरच्या काळात एरंडेलाचे दिवे हे लोक वापरू लागले. एरंडेल ठेवण्यासाठी एखादी बुधली व खायचे तेल ठेवण्यासाठी दुसरी बुधली बहुतेक कोलामांच्या घरी आढळते.

कोलाम लोक आपल्या एका खोलीच्या घरात, खाली जमिनीवर, एकत्र झोपतात. काही कोलामांकडे म्हातारी मंडळी तुटक्याफुटक्या बाजल्यांचा वापर करतात. ह्या बाजा अंबाडतागाच्या दोरीने विणलेल्या असतात. ह्या खाटा तयार करणे व विणणे ही कामे स्वतः कोलामच करतात.

कोलामांच्या घरात सोटा व कुऱ्हाड हटकून आढळते. काही घरी अलीकडे लाकडी किंवा लोखंडी संदूक असतो.

## ३ : :

## घरातील व्यक्ती

कोलामांच्या घरात किती व्यक्ती असतात याचा अंदाज येण्यासाठी पुढील काही गावांचे आकडे असे मांडता येतील:—( आकडे १९६४ च्या पाहणीतील आहेत. )

| गाव | तालुका | घरे | लो.सं. | गाव | तालुका | घरे | लो.सं. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ बोरगाव | यवतमाळ | ३८ | १५० | १२ सालोड | यवतमाळ | १२ | ५१ |
| २ काप्रा | ,, | ३० | १३७ | १३ कळंब्र | ,, | ३२ | १४० |
| महारथड | ,, | ४६ | १९९ | १४ रासा | ,, | २२ | १०० |
| ३ भिसनी | ,, | ७ | ३२ | १५ चापर्डा | ,, | ५४ | २७० |
| ४ मोळोना | ,, | २० | १०० | १६ घोटी | ,, | २७ | १३० |
| ५ चिचबर्डी | ,, | २८ | १३० | १७ वेलोना | ,, | १४ | ५९ |
| ६ पिंपरी इजारा | ,, | २५ | १२४ | १८ नरसापूर | ,, | १५ | ८५ |
| ७ भोयर | ,, | ३६ | १४७ | १९ सरपधरी | ,, | २० | ८८ |
| ८ मडकोना | ,, | ४३ | १६२ | २० सायखेडा बु. | ,, | ३ | १६ |
| ९ मुरझडी इजारा | ,, | २६ | १२० | २१ नांझा | ,, | १४४ | ६८५ |
| १० मुरझडी तांभारी | ,, | ७२ | ३२४ | २२ खैरी | ,, | ३६ | १५१ |
| ११ घोडखिंडी | ,, | २६ | ८३ | २३ पोफळणी | ,, | ३५ | ११२ |

| गाव | तालुका | घरे | लो.सं. | गाव | तालुका | घरे | लो.सं. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४ शरद | यवतमाळ | ५१ | २२५ | ४६ सखी खुर्द | केळापूर | १२ | ५६ |
| २५ मोहदरी | ,, | १५ | ४५ | ४७ झाडगाव | ,, | १ | ६ |
| २६ गांढा | ,, | ९ | ३३ | ४८ खेकडवाई | वणी | ५० | २२६ |
| २७ धनोडी | ,, | ११ | ४५ | ४९ भालेवाडी | ,, | १६ | ७१ |
| २८ बाभूळगाव | ,, | ५ | १८ | ५० बुरांडा | ,, | २५ | १२५ |
| २९ पिंपरी | ,, | ९३ | ४२१ | ५१ मांगली | वरोरा | २९ | १०६ |
| ३० नांदुरा खुर्द | ,, | २ | ७ | ५२ माहूर | किनवट | २६ | ११६ |
| ३१ कोपरा | ,, | २५ | ११० | ५३ कोल्हापूर | वर्धा | ६५ | ३५७ |
| ३२ यावली | ,, | ५० | ३०० | ५४ चाणी | दारव्हा | ३० | २०० |
| ३३ पिंपळगाव | ,, | १३ | ६० | ५५ जांभोरा | ,, | ५ | १७ |
| ३४ महंमदपूर | ,, | ४० | १६७ | ५६ ढवळसर | ,, | ८ | ३५ |
| ३५ घारफळ | ,, | १५ | ६१ | ५७ नारकुंड | ,, | ३५ | १५० |
| ३६ गणोरी | ,, | १८ | १०० | ५८ बोरीअरब | ,, | ९ | २० |
| ३७ मादनी | ,, | ३४ | १४० | ५९ जवळगाव | ,, | १० | ४० |
| ३८ पिंपळखुटी | ,, | ७ | ४५ | ६० चूचूघाट | आदिलाबाद | १० | ५० |
| ३९ बोधगव्हाण | ,, | २० | १०२ | ६१ ओगपूर | ,, | ८ | ३२ |
| ४० चिखलधरा | केळापूर | ४३ | १९६ | ६२ गोपालापूर | आदिलाबाद | १५ | ७५ |
| ४१ कृष्णापूर | ,, | १४ | ६९ | ६३ भरेमूपूर | ,, | ९ | ३६ |
| ४२ सखी बु. | ,, | ४० | १८५ | ६४ सगणापूर | ,, | १६ | ९८ |
| ४३ घोडदरा | ,, | १२ | ७० | ६५ मामोडीगुडी | ,, | २५ | १२५ |
| ४४ बोथ | ,, | १० | ५० | | | | |
| ४५ वर्धे | ,, | ९२ | ३९९ | | | १,८५५ | ८,४५५ |
| सुभानहेटी | ,, | २१ | ८१ | | | | |

वरील आकड्यांवरून असे दिसून येते की प्रत्येक कोलामकुटुंबात सुमारे पाच व्यक्ती असतात. (४·५५ असे हे प्रमाण पडते.) कोलामकुटुंबे लहान घरांमुळे लवकर विभक्त राहतात. शेती एकत्र व गुण्यागोविंदाने करणारे दोन भाऊ दोन घरांमध्ये (म्हणजे खोलीवजा झोपड्यांमध्ये) राहतात, असे दिसून आले. घरे मोठी असती तर विभक्त होण्याला कमी वाव मिळाला असता. यवतमाळ जिल्ह्यात प्रत्येक घरामध्ये ५ ते ६ व्यक्ती राहतात. ग्रामीण भागात हे प्रमाण पाचाहून थोडे जास्त आहे.

**वर्ण व शरीराची ठेवण**

कोलामांचा वर्ण काळा आहे. कष्टांचे जीवन, रानटी राहणीमान व उन्हातान्हातील उघड्यावरचे विचरण यांमुळे यांचा वर्ण राकट दिसतो. यांच्यात क्वचितच गोरा पुरुष

आढळतो. स्त्रियांमधून मात्र शंभरातून एखादी स्त्री निमगोरी आढळते. एरवी त्यांचाही वर्ण काळाच दिसतो. काही स्त्रिया सावळ्या आढळतात; पण त्यांचे प्रमाण जास्त नाही.

कोलामांची शरीरे राकट खरी. पण धष्टपुष्ट व काहीशी सौष्ठवपूर्ण असतात. स्त्रियांची शरीरे ( राकट व रानटीपणाची झाक दिसली तरीही ) सौष्ठवयुक्त व बांधेसूद अशी वाटतात. काही कोलाम सुंदरतेत इतर आदिवासींना मागे टाकतात. कोलाम व मारिया गोंड यांच्या शरीरठेवणीत काही साम्ये आढळतात. यवतमाळ भागातील गोंड आणि कोलाम यांचा काळा वर्ण एकमेकापासून अलग काढणे कठीणच जाईल! वर्धा भागातील कोलाम गोंडांपेक्षा अगदी निराळे दिसतात. वर्ध्याकडील कोलाम आदिवासी वाटतात व गोंड थोडे पुढे गेलेले दिसतात! सामान्यतः सगळीकडील कोलाम गोंडांपेक्षा काहीसे ओबडधोबड दिसतात.

डॉ. इरावती कर्वे यांनी महाराष्ट्रातील बऱ्याच जातींची डोकी, नाक आणि अवयव यांसंबंधीची मापे दिलेली आहेत. त्यात कोलामांच्या डोक्याचा घेर ५२७·९० मिलिमीटर असून डोक्याचे सापेक्ष प्रमाण शे. ७६·१३ असे आहे. नाकाच्या उंचीचे प्रमाण १०८·५७ असून नाकाच्या रुंदीचे सापेक्ष प्रमाण ८६·४१ असे आहे. वरच्या जबड्याच्या लांबीचे प्रमाण ४५·३२ असून चेहरा व डोके यांच्या रुंदीचे प्रमाण ९५·८५ आहे.[१] डॉ. कर्वे यांनी विविध जातीजमातींच्या डोक्यांच्या मापांवरून अती लहान डोक्याच्या जाती, लहान डोक्याच्या जाती, मध्यम डोक्याच्या जाती व मोठ्या डोक्याच्या जाती असे गट पाडले असून लहान डोक्याच्या जातींच्या गटात कोलाम येतात, असे दाखविले आहे. कोलाम हे दीर्घकपाळाचे लोक आहेत, हेही त्यांनी दाखविले आहे. कोलामांची उंची मध्यम असते. बहुधा ती ५ ते ५।। फूट अशी आढळते.[२]

## वेषभूषा

बहुतेक कोलाम पुरुष मिशा ठेवतात. काहीजण डोकीवरचे केस राखतात. डोक्याला ते फडके गुंडाळतात आणि ते फडके फेट्यासारखे दिसते. जाडेभरडे व आखूड असे धोतर दोन्ही काचे मारून पचांगपद्धतीने ( विशिष्ट अशी धोतर नेसण्याची रीत म्हणजे पचांग ) नेसतात. अंगात कुडते किंवा बंडी घालतात. बरेचसे कोलाम अंगात कुडते वा बंडी न वापरता बारा महिने तेरा काळ उघडे राहतात. सवयीने त्यांना त्याचे काही वाटत नाही. अर्थात् दारिद्र्यामुळेच अशा सवयी जडलेल्या असतात, हे स्पष्ट आहे. वस्ती व घर यांच्या स्वच्छतेच्या मानाने शारीरिक स्वच्छता यांना अवगत नसते. यांचे कपडे अगदी मळकट व कुबट वास येणारे असे असतात.

---

१. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. १३६

२. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. १४६ ते १४९

त्यांची शरीरेसुद्धा घामेजलेली असतात. यांना पोटासाठी कष्टत राहावे लागते. शिकारीसाठी सतत २-२ दिवस रानात भटकावे लागते. त्यामुळे त्यांना वेळ कमी मिळतो. साहजिकच त्यांना कपडे धुणे शक्य होत नाही. जीर्ण कपडा लवकर फाटेल व दारिद्र्यात अधिक भर पडेल म्हणूनही कित्येकदा कपडे धुणे लांबणीवर टाकले जाते. कपडे धुण्यासाठी साबणाचा वापर हे लोक करीत नाहीत. नदी, नाला किंवा विहीर यांच्या पाण्याने कपडा अपटून धुतला आणि वाळवला की यांच्या वापरण्याच्या कामी तो लगेच येतो. धोतर वगळल्यास दुहेरी कपडे यांच्याजवळ नसतात. एक धोतर अंगावर असले की दुसऱ्याचा उपयोग रात्री अंथरापांघरायला केला जातो. कोलाम लोक आंघोळीं-सुद्धा चारआठ दिवसांतून एकदाच करतात. या मागेसुद्धा वरीलप्रमाणेच कारणे आहेत.

यवतमाळ जिल्ह्यातील कोलाम पुरुष आणि शेती करणारे कुणबी वगैरे लोक यांच्या वेषभूषेत फारसा फरक नाही. त्यामुळे कोलाम आणि कुणबी दुरून एकसारखे दिसतात. जवळून मात्र चेहेऱ्याची ठेवण अलग दिसताच फरक लक्ष्यात येतो. कोलामांच्या चालण्याची लकबही काहीशी वेगळी आहे.

कोलाम पुरुष दागिने बहुधा घालीत नाहीत. क्वचित काहीजण चांदीचे कडे एका हातात घालतात. कान टोचलेले असल्यामुळे काही कोलाम लोक तांब्याच्या तारेच्या बाळ्या कानात घालतात. त्या बाळ्यांपैकी ‘ मुडकी ’ नावाचा एक प्रकार आहे. पण तो कोलामांमध्ये क्वचितच आढळतो.

कोलाम स्त्रिया गुडघ्याच्या वरून, दुमड घातलेले लुगडे नेसतात. गोंड स्त्रियांपेक्षा यांच्या नेसण्याची पद्धती थोडी वेगळी आहे. गोवारी बायकांची व कोलाम बायकांची लुगडे नेसण्याची पद्धती सारखीच आहे. कोलाम स्त्रिया मध्यंतरी चोळ्या वापरीत नव्हत्या. लुगड्याचा पदर उरोजावरून दुमडून घेत असत. परंतु कोलामांत चोळ्या वापरण्याची रीत आजकाल सर्रास चालू आहे. जुन्या काळीसुद्धा कोलाम स्त्रिया चोळ्या वापरीत असाव्या कारण कोलामी भाषेत ‘ चोळी’साठी दोन स्वतंत्र शब्द प्रचारात आहेत.

कोलाम स्त्रिया कोलाम पुरुषापेक्षा कष्ट अधिक करतात आणि थोड्या स्वच्छही असतात. त्यांच्याजवळ दोन लुगडी व दोन चोळ्या एवढेच कपडे असतात. नेसलेल्या लुगड्याव्यतिरिक्त असलेल्या दुसऱ्या लुगड्याचा उपयोग आंथरापांघरायला करतात.

स्त्रिया डोक्याच्या मधून भांग काढतात. त्यासाठी फणीचा वापर करतात. कपाळाला सुके लाल कुंकू लावतात. क्वचित डोळ्यांत काजळ घालतात. डोकीच्या केसांना त्या एरंडेल लावतात. आता खोबरेलाचा वापर काही कोलाम स्त्रिया करू लागल्या आहेत. कुंकू नीट चिकटावे म्हणून त्या कपाळाला मेणपट्टी लावतात.

कोलाम स्त्रिया सोन्याचे दागिने वापरीत नाहीत. त्यांच्याजवळ शक्यता असली तर निकृष्ट चांदीचेच थोडेफार दागिने असतात. पायांच्या अंगठ्याजवळच्या बोटांत जोडवी आणि गळ्यात काळ्या मण्यांचे मंगळसूत्र प्रत्येक कोलाम स्त्री घालते. बऱ्याचजणी गळ्यात चांदीची सरी व हातात चांदीच्या पाटल्या ( = जाडया बांगडया ) घालतात. काहीजणी चांदीच्या कोपरकडया ( = बाजूबंद ) दंडात घालतात. चांदीची नथ, चांदीची अंगठी, चांदीच्या गुंडया आणि कुडया ( = कानातील अलंकार ), चांदीच्या तोरडया, चांदीचे तोडे, गळयातील चांदीच्या कडया असले अलंकार काही थोडया कोलाम स्त्रिया वापरतांना दिसतात. एरवी कडया, गुंडया, नथ, अंगठी, तोडे, तोरडया हे अलंकार कोलामांत दिसत नाहीत.

कोलाम स्त्रिया लाजाळू असतात. इतर पुरुषांपुढे त्या सहसा येत नाहीत. अर्थात लाजाळूपणापेक्षा भयाचीच भावना त्यात अधिक असते, असे वाटते.

कोलाम पुरुष व स्त्रिया जोडेचपला वापरीत नसत. आता काहीजण वापरू लागले असले तरी त्यांचा कल तिकडे फारसा नाही. सवयीने त्यांचे पाय काटे, तापलेले रस्ते, दगड व खडे यांना भीक घालीत नाहीत. त्यांच्या पायात काटा गेला तरी कित्येकदा त्यांना ते कळत नाही.

**खाणेपिणे**

कोलामांच्या जेवणात ज्वारीची भाकरी, तुरीचे, मुगाचे किंवा मटकीचे वरण व मिरचीचे तिखट हे पदार्थ नेहमी असतात. तूर व ज्वारी हे पदार्थ वऱ्हाडात विपुल आहेत. चटणी कोरडी किंवा तीवर पाणी ( शक्य असल्यास तेल ) टाकून भिजवून घेतात. ओली मिरची असल्यास वाटून घेतात. आंबा, तरोटा, तांदुळजा यांसारख्या जवळपास उगवणाऱ्या व बिनखर्चाने मिळणाऱ्या भाज्या, तुरीच्या ओल्या शेंगा हेही पदार्थ त्या त्या हंगामात मधूनमधून जेवणात असतात. कण्या, घुगऱ्या, घाटा असले पदार्थ दारिद्र्यामुळे खाण्याचे प्रसंग यांच्यावर नेहमीच येतात.

हे लोक मांसाहारी आहेत. परंतु मांस विकत घेऊन हे लोक खात नाहीत. रिकाम्या वेळी व विशिष्ट सणांच्या वेळी शिकारीस जाऊन हे लोक निरनिराळे प्राणी मारून आणतात आणि ते शिजवून त्या मांसावर ताव मारतात. आरंभी ही जमात पूर्णांशाने मांसाहारी असावी. कापलेले मांस, अंगावरचे मांस, शिजवलेले मांस, उकळणे, कढवणे, रस्सा असे विविध शब्द यांच्या भाषेत आहेत. मांसाचे कापलेले, अंगावरचे, शिजविलेले असे प्रकार इतर भाषांच्या शब्दांमध्ये आढळत नाहीत. कोलामांच्या खाण्यात डुकराचे मांस विशेष असते. डुकराची शिकार मिळाली तर यांना अत्यानंद होतो. डुकराची शिकार करण्यात हे लोक विशेष वाकबगार आहेत. शिकारीतील इतर प्राण्यांचेही मांस हे खातात. वाघ, डुकर, रोही, सर्प, उंदीर,

घोरपड, हरीण, एन, सांबर, गाय, बैल, खार इ. बहुतेक प्राण्यांचे मांस हे खातात. फक्त मांजर, कुत्रा, वानर, गाढव व कोल्हा या प्राण्यांचे मांस हे खात नाहीत. वानर हा 'हनुमान' म्हणून हे मारीत नाहीत. कुत्रा यांना आवडतो. कुत्रा आणि मांजर यांना मारणे यांच्या जमातीत पाप मानले असून या प्राण्यांना मारणाऱ्या कोलामांना जातीबाहेर टाकण्यात येते. बाटरे, भोऱ्या, देवचिमण्या, लावे, तितिर यांसारखे बहुतेक पक्षी मारून हे नेहमीच भाजतात व खातात. अलीकडे वाघ, सर्प गाय व बैल यांचे मांस खाण्याचे प्रमाण कमी झाले आहे.

कोंबडा–कोंबडी व बकरा-बकरी यांच्या मांसावर आणि कोंबडीच्या अंड्यांवर कोलामांचे सणवार व पाहुण्यांचे सत्कार साजरे होतात. सणावाराला भात, पोळी हे पदार्थ क्वचित असतात. एरवी वऱ्हाडात आढळणारी पुरणपोळी हे खाद्य नसले तरी मोहाच्या 'पानोळ्या' (पुरणाच्या पोळीसारखा पदार्थ) हे करून खातात. दुष्काळाच्या वेळीं आंबाडीच्या बिया व सुकलेली मोहफळे एकत्र भाजून खातात. तांदुळाच्या भागात किंवा तांदूळ पिकवणाऱ्या कोलामांकडे जाडाभरडा भात, भाताची पेज आणि आंबील मात्र नेहमीच्या खाण्यात असते.

ज्या भागात मासे सापडतात तेथून हे लोक कधीकधी मासे पकडतात. डोकडा, काळा मासा, झिंगे यांसारखे मासे या भागात सापडू शकतात. ते मासे आणि खेकडे काही लोक पकडून आणतात व खातात. काकड्या, बरबटी, चवळी, कोहळीं, भोपळे, टमाटे, मध, मुळे, वाघाटे, वाळूक, मका, तीळ इ. पदार्थ जसे यांच्या खाण्यात तुरळकपणे (उपलब्ध असल्यास) येतात तसेच या माशांचे आहे.

दूध, दही, तूप, लोणी हे पदार्थ यांच्या घरात क्वचित आढतात. गायी–बकरीचे दूधही हे लोक पूर्वी काढीत नसत. वासरू वा पिलू यांनीच आईचे दूध प्यावे असा प्रघात होता. आताशा जनलेल्या गायीचे प्रथम ५-६ दिवस फक्त दूध काढतात व त्याचे दही, लोणी वगैरे पदार्थ खातात. विकत घेऊन दही, दूध खाण्याची प्रवृत्ती वा परिस्थिती या लोकांची नाही.

हे लोक सकाळी ७–८ वाजता किंवा त्यापूर्वीसुद्धा शिळी वा ताजी भाकरी आणि चटणी खाऊन न्याहारी करतात आणि कामासाठी बाहेर पडतात. स्त्रियासुद्धा त्यांच्या मागोमाग बाहेर पडतात. दुपारचे जेवण बांधून नेतात. रात्री ८–९ वाजता तिसरे जेवण होते. फराळ व चहापाणी मधल्या वेळात होत नाही. फराळ, चहापाणी मिळत नाही व सवयही नाही. सकाळचा चहा मात्र आता यांच्यामध्येही आला आहे. साखरेऐवजी गुळाचा चहा ते करतात व त्यासाठी दूध बकरीचे किंवा गायीचे वापरतात. दूध विकत घेतले जात नाही. घरी बकरी, गाय नसल्यास शेजारी फुकटात थोडे दूध देतो. सर्वच कोलाम चहा पीत नसून काहींमध्ये तो शिरला आहे.

हे लोक पोपट पाळीत नाहीत. उलट जंगलातील पोपट शिकारीत मिळाल्यास हे खाण्यासाठी त्याचा उपयोग करतात.

गोंडांनी शिजविलेले अन्न कोलाम लोक खातात; मात्र गोंडांना कोलामांच्या हातचे अन्न चालत नाही.

### व्यसने

जंगली विभाग, मोहांचे वैपुल्य व परंपरा या कारणांमुळे पूर्वी कोलामात दारूचा मनस्वी प्रचार होता. यांचे कोणतेही सणवार, उत्सव व नृत्ये दारूशिवाय होतच नसत. दारूबंदीमुळे आता आलेली बंधने हे लोक पाळू लागले आहेत.

कोलामांना चिलीम फार आवडते. तीवर यांचा फारच जीव असतो. चिलमीला ते विसरत नाहीत. कामात उत्साह येण्यासाठी त्यांना चिलमीची साथ असते. कोलामांच्या ' चावडी'त सर्वजण बसले की सामुदायिकपणे चिलीम ओढण्यात हे लोक रंगून जातात. तंबाखू खाणेही त्यांना फार आवडते.

चिलमीपेक्षाही जंगलातील टेंभुरणीच्या पानाचा चुट्टा त्यांना अधिक प्रिय आहे. चुट्टा म्हणजे विडीचा मोठा भाऊच ! टेंभुरणीचे ताजे पान विडीसारखे गुंडाळून ते पाईपसारखे वाकवायचे व त्यात वरून तंबाखू टाकून विस्तवाने पेटवावयाचे ! असा हा चुट्टा रिकाम्या वेळी पिण्यात कोलाम फार पुढे आहेत.

चिलीम व चुट्टा यांच्याबरोबर आता यांच्यात विडीही शिरली आहे. विड्या विकत घेऊन पिण्याची सवय यांच्यात अगोदर नव्हती. आता मात्र परिस्थिती बदलत चालली आहे.

भांग, गांजा, अफू यांची व्यसने यांच्यामध्ये नव्हती. आता फार तर एखादाच अपवाद अशा गोष्टीबाबत दिसून येतो. एरवी ह्या वस्तूंचे व्यसन त्यांना नाही.

# ४ : :

# नातेसंबंध

कोलामांची कुटुंबे अविभक्त असतात. तरीपण लहान घरांमुळे तरुण लोक विभक्त होतात. लहानशा झोपडीत १०–१० लोकसुद्धा राहतात. कधीकधी घरे विभक्त असली तरी जेवण एकत्रच असते.

कोलामांमध्ये पुढील नातेसंबंध आढळतात :--

| नाते | कोलामी नाव |
|---|---|
| ( १ ) बाप ( स्वतःचा ) | आम्बान, बान, बांद |
| ,, ( दुसऱ्याचा ) | ताक, बान, बाद |
| ( २ ) आई ( स्वतःची ) | आम्याय, आम्मान, आम्मा |
| ,, ( दुसऱ्याची ) | वे, बेक, आया |

वरील फरक मोघम आहेत. स्वतःच्या व परक्याच्या आईबापासंबंधी वापरावयाचे हे शब्द तितकेसे काटेकोर पाळले जातातच असे नाही.

| | |
|---|---|
| ( ३ ) पुत्र, मुलगा | पडस |
| ( ४ ) कन्या | कोम्माल, पिल्ला |
| ( ५ ) भाऊ ( लहान ) | तोरेन, सिन्नाम ( लहान ) तोरेन |
| ,, ( मोठा ) | दादा, दादाक, दोतोरेन, दोड्डान दादा |
| ( ६ ) बहीण ( लहान ) | तोरंदाळ, बाई, सिन्नाम बाई |
| ,, ( मोठी ) | दोबाई, बाई |
| ,, ( स्वतःची ) | आम्बाई |
| ( ७ ) भाऊबहिणी, भाऊबंद | तोरेनसिल तोरंदाळसिल |
| ( ८ ) आजा | दोबाक, धोबाक |
| आईचा बाप ( आजा ) | अय्या |
| ( ९ ) आजी | दोई, धोई |
| (१०) नातू, नात | मारगे |
| नात ( मुलाची मुलगी ) | बाई |
| (११) काका, मावसा | काकोक |
| मोठा काका ( मोठा बाप ) | धोकाकोक,धोबान |
| लहान काका (बापाचा लहान भाऊ) | काकोक, पेरेंदा |
| (१२) मामा | मामाक |
| (१३) मामी<br>आत्या ( बापाची बहीण ) | आप्पा |
| (१४) मामेभाऊ | मामाकने तोरेन |
| (१५) भाचा | भाशा |
| (१६) मावशी | सानमा, पेरामा |
| मोठी मावशी, आईची मोठी बहीण | धोवेक |
| लहान मावशी, आईची लहान बहीण | सानमा |

| नाते | कोलामी नाव |
|---|---|
| (१७) सासरा | सासराक; मामाजी ( संबो. ) |
| (१८) सासू | पोदाळ |
| (१९) सून | कोराळ |
| (२०) नवरा, पती | मागवान, मास |
| (२१) पत्नी | मासाळ |
| (२२) भावजय, मोठ्या भावाची पत्नी, भावाची बायको | वान्ना |
| (२३) साळा ( मेव्हणा ), दीर ( नवऱ्याचा लहान भाऊ ) | मारांद |
| (२४) साळी ( मेव्हणी ) नणंद, मामेबहीण, | मारंदाळ |
| (२५) भासरा ( मोठा दीर=नवऱ्याचा मोठा भाऊ, भाऊ सासरा=भासरा ) | तांगोद |
| (२६) आखाडसासू ( बायकोची मोठी बहीण, मोठी मेव्हणी ) | तांगोदा |
| (२७) बायकोचा मोठा भाऊ | बोआ |
| (२८) जावई | सांजिन |
| भाट्वा ( मोठ्या बहिणीचा नवरा ) | बाकेर |
| लहान बहिणीचा नवरा; जावई | सानीकुल |
| बहिणीचा नवरा, जावई | बावा |
| (२९) घरजावई | इल्टाम |
| (३०) व्याही | वियाकुल |
| (३१) विहीण | वियाकराळ |

कोलामी भाषेतील वरील शब्द सर्वत्र प्रचारात असलेले आणि आंध्र भागात काहीसे प्रचारात असलेले असे दोन्ही प्रकारचे आहेत. मामी व आत्या या दोहोंसाठी कोलामीत ‘ आप्पा ’ हा एकच शब्द आहे. तसेच साळा ( मेव्हणा ) व दीर यांच्यासाठीही ‘ मारांद ’ हा एकच शब्द असून साळी ( मेव्हणी ), नणंद व मामेबहीण यांच्यासाठी ‘ मारंदाळ ’ हा एकच शब्द आहे. नागर मराठी जीवनात न आढळणारे नातेसंबंधातील फरक दाखविणारे काही शब्द कोलामीत आहेत. उदा. मोठा दीर, मोठ्या बहिणीचा नवरा इ.

### स्त्रीपुरुष-प्रमाण

महाराष्ट्रात १९५१ साली संपूर्ण लोकांमध्ये दर हजारी ९४१ स्त्रिया होत्या. आदिवासींमध्ये हे प्रमाण ९४३ होते. १९६१ मध्ये हजारात ९३६ स्त्रिया असून आदिवासींत त्या ९७८ आहेत. शहरात हे प्रमाण सर्वसाधारणपणे ८०१ आणि आदिवासींच्या बाबतीत ९११ आहे, तर खेड्यांच्या बाबतीत ते अनुक्रमे ९९५ व ९८१ असे आहे. या प्रमाणांत स्त्रियाची संख्या कमी आहे. मात्र कोलामांतील स्त्रियांचे प्रमाण १९६१ च्या शिरगणतीनुसार दर हजाराला १०४३ असे असून महाराष्ट्रातील सर्व आदिवासी जमातींत हे प्रमाण सर्वाधिक आहे. कोलामांच्या खालोखाल गोंड ( १००६ ) व प्रधान ( १००१ ) यांचा क्रम आहे. कोलाम स्त्रियांची कार्यक्षमतेत प्रसिद्धी आहे. कष्ट, आरोग्य आणि स्त्री-प्रमाण याचे काही नाते असू शकते. १९६१ च्या शिरगणतीनुसार नोंदविलेल्या ४३७८८ कोलामांमध्ये महाराष्ट्रात २१४३६ पुरुष व २२३५२ स्त्रिया आहेत.

१९५१ च्या शिरगणतीमधील स्त्रीपुरुष-प्रमाणाच्या काही गमती पाहण्याजोग्या आहेत. अमरावती जिल्ह्यात १९५१ मध्ये १३२ कोलामांपैकी १२१ पुरुष होते तर स्त्रिया फक्त ११ होत्या. याउलट यवतमाळ जिल्ह्याच्या पुसद तालुक्यात मात्र पुरुष ५२ असून स्त्रिया २६२ होत्या. पुसद तालुक्यात १९५१ मध्ये एकूण ३१४ कोलाम होते व त्यांत फक्त ५२ स्त्रिया होत्या. हे प्रमाण १ पुरुष तर ५ बाया असे पडते. अमरावती जिल्ह्यात १ स्त्री तर ११ पुरुष असे प्रमाण दिसते.

१९५१ च्या शिरगणतीप्रमाणे यवतमाळ जिल्ह्यात स्त्री-प्रमाण या जमातीत कसे होते हे पुढील तक्त्यावरून दिसून येईल.

| तालुका | पुरुष | स्त्रिया | एकूण |
|---|---|---|---|
| १ यवतमाळ | ६,२८७ | ६,९१६ | १३,२०३ |
| २ केळापूर | ५,६५९ | ४,८५७ | १०,५१६ |
| ३ वणी | २,९३५ | २,५७७ | ५,५१२ |
| ४ दारव्हा | १,०३८ | १,०१५ | २,०५३ |
| ५ पुसद | ५२ | २६२ | ३१४ |
| | १५,९७१ | १५,६२७ | ३१,५९८ |

यवतमाळ जिल्ह्यात १९६१ मध्ये नोंदविलेल्या एकूण १,५५,६०९ आदिवासींमध्ये ७७,३१५ पुरुष व ७८,२९४ स्त्रिया आहेत. त्यापैकी खेडेभागात राहणाऱ्या १,५१,४८३ आदिवासींपैकी ७५,२३८ पुरुष व ७६,२५५ स्त्रिया आहेत. शहरात राहणारे आदिवासी ४,१२६ असून त्यांत २,०८७ पुरुष व २,०३९ स्त्रिया आहेत.

# आडनावे

कोलामांमध्ये आढळणारी आडनावे वा कुळे ( वऱ्हाडात आडनावास ‘ कूळ ’ असे म्हणतात. ) कोणत्या प्रकारची आहेत, हे पुढील यादीवरून कळेल. कोलामांमध्ये ‘ जात ’ असा शब्द कुळासाठी वा आडनावासाठी रूढ आहे. ‘ कुळ ’ अथवा ‘ कुल ’ हाही शब्द संवादांमध्ये येतो.

कोलामांमध्ये पुढील आडनावे आढळली:--अतराम (अत्राम, आतराम, आत्राम), अंद्रवाडी, अरधुने, आमझोर, आस्वले, एगरी (एघरी, येगरी, येघरी), एलकी ( एलके ), कसार, काण्णी, कापरे, कारेगामा, किनारे, किरीट, कुंडी, कुंबरे, कुंभेकर ( ०कार ), केलगामा, केलेगुंडी, कोंढेकर ( ०कार ), कोमटी, कोंबी, कोरझरी, कोल्हे, खडसे, खोळद, गजरा, गुजाराम, गुंजटे, गोटी ( घोटी ), गोधनी ( गोदनी ), घरगडे, घासाडे, घेरडे, घोटेकर ( ०कार ), घोरपडे, चिचगामा ( शीतगामा ), च्यागेड ( शागेड ), जहागड, जांभूळकर ( ०कार ), जांभे, जुनघरे, झामकोल, झेडगे, झोले, टेकाम ( तेकाम, तैकाम ), डेबरे, डेब्बूर, ढुमणे, ढोबरे, तलवारे, ताबड्, ताडाम ( तालाम ), तुमकर ( ०कार ), दाभे ( दाबे ), दाभेकर ( ०कार ), देवगडे, देवटकर ( ०कार ), देवनकर ( ०कार ), देवनारे, धोटे, नाईकवाडे, पाटोले, पाडसी, पाडसी-नेकुन, पीडीगामा ( पीळगाम ), पोडगौन, पोलेगाम ( पोलेगामा ), बदडी, बुरुकटे ( बोरकुटे ), बोच्या, बोडे, बोदे, बोरकर ( ०कार ) बोस्से, भिवईकर ( ०कार ), भिवनकर ( ०कार ), भिवनारे, भोराडे, भोसे, भोसेकर (० कार ), मडावी, मराठे, मसराम, माऊर्ले, मांगुर्ले ( मांगोर्ले ), मादनी, मानगी, मारेगाम (मारेगामा), मितेलाक, मुंजाळे, मुंढाली ( मुंडाली ), मुंढेकर ( ०कार ), मुरझडी ( मुरझुडी ), मुरारी, मोभद ( मोद, मूद, मोहद ), मोरे, मोवरे, येडसे, राऊत, राजूर, राजूरकर ( ०कार ), राड्डी, राड्री, रामगडे, रामपुरे, लव्हाणे, लुंगसे, लोणकर ( ०कार ), लोणसावळी, वडदे ( वेडदे ), वरझडकर ( ०कार ), वागदरा ( वाघदरा ), वाटोडा ( वाठोडा ), वाटोडे ( वाठोडे ), वाडा, विल्लारी, वीरगाम ( वीरगामा ), शिंदे, शिबले, सकरापुरे, सावंगीकर ( ०कार ), सापोडे, सिरेबंदी ( शिरबंदी ), सिवनकर ( ०कार ), सिवनी, सुकली, सुरपाम, सोरांबले, हिवरी.

कोलामांमधील आडनावांची यादी याहीपेक्षा मोठी असू शकेल. कारण वरील आडनावे काही गावांमधूनच गोळा केलेली आहेत. विशेषतः यवतमाळ जिल्ह्यातील दाट कोलामवस्तीच्या भागातून ही मिळविलेली आहेत.

आदिवासींच्या आडनावांमध्ये त्यांचे कुलचिन्ह प्रकट होऊ शकते. कोलामांच्या आडनावांतही ते तसे नसेल असे म्हणवत नाही. इतर आदिवासींच्या मानाने बरीचशी आडनावे कोलाम जातीत व शेजारी राहणाऱ्या यवतमाळ भागातील कुणबी, माळी इत्यादि लोकांत सारखी आढळतात. परंतु कोलामांची असली आडनावे मूळची नसावीत. ती मूळाला बदलून सुधारलेली किंवा इतरांकडून स्वीकारलेली असावीत. त्यामुळेच 'कोलामांची आडनावे मराठी पद्धतीची आहेत'[१] असा समज झालेला आहे. पण त्याची छाननी केल्यास त्यात तथ्य कमी उरते. कोलामांनी आपली मूळ आडनावे सोडून नवी आडनावे घेतली असावी असे काही आडनावांच्या संदर्भात वाटते. कोलामांची ती मूळ उपनामे ठरत नाहीत. तरीपण मराठी लोकांची व कोलामांची काही आडनावे एकच आढळतात, हेही खरे आहे. राऊत, शिंदे, घोरपडे, तलवारे, बोरकुटे, मराठे, बोंडे, जुनघरे, मोरे अशासारखी आडनावे मराठी दिसतात. राऊत, शिंदे, घोरपडे ही तर कुणब्या-मराठ्यांची आडनावे असून मराठे हे ब्राह्मणांतील आडनाव आहे.

परंतु ह्या समानतेच्या मागे धावण्यापेक्षा कोलामांच्या अनेक आडनावांशी संबंधित असलेल्या एका बाबीचा विशेष खुलासा करणे आवश्यक आहे. गावावरून आडनावे पडतात, हे बऱ्याच भागात दिसून येते. कोकणस्थांची आडनावे बहुतेक अशीच आहेत. उदा. माडखोल गावाचे माडखोलकर. इतर विभागांत व जातींतसुद्धा गावांवरून आडनावे पडल्याची उदाहरणे विपुल आहेत. उदा. मांडव गावाचे मांडवकर, कळंबचे कळंबकर, सासवडचे सासवडकर, आकोल्याचे आकोलकर. कोलामांच्या आडनावांचेही नाते त्यांच्या मूळ गावाशी निगडित आहे. एका कोलामवस्तीत वसलेले लोक त्या गावाचे ( = म्हणजे त्या उपनावाचे ) समजले व ओळखले जाऊ लागले आणि नंतर तेच त्यांचे आडनाव पडले. मूळ गावाचे नाव हेच कोलामांचे आडनाव, असे बऱ्याच जणांच्या बाबतीत असले पाहिजे. कोलामांची दाट वस्ती असलेल्या भागातील गावे व कोलामांची आडनावे एकच आहेत. वरील यादीतील अशी काही आडनावे पाहा:--

| **आडनाव** | **गाव** | **तालुका** | **कोलामांची वस्ती आहे काय ?** |
|---|---|---|---|
| मादनी | मादनी | यवतमाळ | आहे |
| खोळद | खोरद ( वऱ्हाडात 'ळ'चा 'र' होतो ) | यवतमाळ | आहे |
| राजूर | राजूर | यवतमाळ | आहे |

१. Russell—Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III ( London 1916 ), पृ. ५२१

| आडनाव | गाव | तालुका | कोलामांची वस्ती आहे काय ? |
|---|---|---|---|
| मोअद, मोद, मूद, मोहद (उच्चारांचा फक्त फरक दिसेल.) | मोहदा | केळापूर | आहे |
| कुंडी | कुंडी | वणी | आहे |
| वाठोडा, वाटोडा | वाठोडा | केळापूर, वर्धा | आहे |
| कोरझरी | कोळझरी ('ल' 'ळ' 'र' यांचे विपर्यय वऱ्हाडात होतात) | यवतमाळ | आहे |
| सुकली | सुकळी ('ल' 'ळ' चा विपर्यय) | यवतमाळ | आहे |
| अंद्रवाडी | अंधारवाडी | केळापूर | पूर्वी असतील |
| हिवरी | हिवरी | यवतमाळ, केळापूर | आहे |
| गोधनी, गोदनी | गोधनी | यवतमाळ | आहे |
| घोटी, गोटी | घोटी | यवतमाळ | आहे |
| उकंडा | उकंडा (मोहा) | यवतमाळ | आहे |
| सिवनी | शिवनी ('स' 'श' चा घोटाळा वऱ्हाडात फार !) | यवतमाळ | आहे |
| झामकोल | झमकोला, झमकोलंऽऽ | वणी | आहे |
| मुरझडी, मुरझुडी | मुरझडी | यवतमाळ | आहे |
| वाघदरा, वागदरा | वाघदरा | वर्धा, वणी | आहे |
| बदडी | बोदडी | केळापूर | आहे |
| लोणसावळी | लोणसावळी | वर्धा | आहे |
| पोडगौन | पोडगव्हाण | यवतमाळ | आहे |

वरील आडनावे निश्चित मूळ गावांची नावे आहेत. या गावांना प्रथम वसणारा कोलामवर्ग पुढे त्याच गावाच्या नावाने तेच कुळनाम घेऊन परिचित झाला हे स्पष्ट आहे.

वरील आडनावांचेच असे आहे, असे नाही. इतर काही आडनावांतही हीच प्रक्रिया दिसेल. उदा. दावे किंवा दाभे या आडनावाच्या कोलामांचे मूळ गाव दाभा (ता. केळापूर) हे आहे. या गावात कोलाम राहतात. दाभा गावाच्या नावाचा उच्चार 'दाभे' असा मूळात असून वऱ्हाडीकरण 'दाभंऽऽ' असे झाले.

मराठी ‘ ए’कारान्त आडनावांप्रमाणे आपली आडनावे सांगण्यासाठी काही कोलामांची मूळ गाववाचक आडनावे ‘ ए’कारान्त झाली असावी. आडनावे मूळातच अशिक्षितांमध्ये कमी सांगितली जातात. विचारल्यावर शेजारच्या लोकांच्या धर्तीने सांगण्याचा कोलामांचा कल ! अशा आडनावांमध्ये ‘ करा’न्त आडनावेही येतात. वाटोडे हे आडनाव मूळात ‘ वाटोडा ’ असून ते ‘ वाटोडे ’ या रूपात सुधरवून सांगितले जाते, हे स्पष्ट आहे. ‘ करा’न्त आडनावे खेड्यात ‘ कारा’न्त उच्चारली जातात. गोहोकर, मांडवकर ही आडनावे गोहोकार, मांडोकार अशी सर्रास उच्चारली जातात. हे धोरण डोळ्यांसमोर ठेवून मूळ ग्रामवाचक आडनावे ‘ कारा’न्त आणि ‘ करा’न्त झाली आहेत, हेही स्पष्ट आहे. उदा. सिवनकार हे आधीचे सिवनी कुळ असून ते आता तर सिवनकर झालेले आहे. हीच स्थिती घोटेकर वा घोटेकार या आडनावाची असून ते आडनाव मूळचे घोटी या गावाशी संबंधित असावे, असे दिसते. राजूरकर हे मूळचे राजूर आडनाव असणे शक्य आहे.

‘ करा’न्त आणि ‘ कारा’न्त अशी आडनावे गावावरून पडतात व मूळ गावाशी ती संबंधित असतात या अनुभवाप्रमाणे पुढील आडनावे ही त्या आडनावा-पुढील गावाशी संबंधित असावीः--

| **आडनाव** | **संबंधित गाव व तालुका** | **त्या गावी कोलाम आहेत काय ?** |
|---|---|---|
| दाभेकर, दाभेकार | दाभा ( केळापूर ) | आहेत |
| कुंभेकर, कुंभेकार | कुंभा ( वणी ) | आहेत |
| लोणकर, लोणकार | लोणी ( वर्धा ) | आहेत |
| सावंगीकर, सावंगीकार | सावंगी ( आर्वी ) | आहेत |
| भोसेकर, भोसेकार | भोसा ( यवतमाळ ) | आहेत |
| वरझडकर, वरझडकार | वरझडी ( यवतमाळ ) | आहेत |
| कोंढेकर, कोंढेकार | कोंढी ( केळापूर ) | आहेत |
| जांभूळकर, जांभूळकार | जांभोरा ( दारव्हा ) | आहेत |

( हे आडनाव जांभूरकर, ०कार असले तरी जांभूळकर हे शुद्धीकरण मानून सांगितले जात असावे. )

‘ करा’न्त वा ‘ कारा’न्त अशी ही कोलामांची आडनावे त्यांच्या मूळ ग्रामवाचक आडनावांचीच परिष्कृत रूपे आहेत, या निर्णयावर वरील उदाहरणांवरून यावेसे वाटते. कोलामांमधील ‘ करा’न्त आडनावांमधील भिवईकर, भिवनकर यांच्याशी कोणत्या गावांचे नाते असेल ते सांगता येणे कठीण आहे. भिवईकर व भिवनकर ही आडनावे दोन नसावीत. एकाच कुळातील व्यक्ती दोन तऱ्हेने ही आडनावे

सांगत असाव्यात. भिवनारे हे कोलामांतील आडनाव या दोन आडनावांचे मूळ असावे असे वाटते व एखाद्या भिवनळा नामक ग्रामनामाशी त्याचा संबंध असणे अशक्य नाही. देवटकर व देवनकर याही आडनावांची हीच गत असून ती आडनावे दोन नसून एकच असावी. देवनकर या आडनावाचे कोलाम मूळात देवनारे या आडनावाचे असावेत. कोलामांतील देवनारे हे आडनाव देवनळा ( ता. यवतमाळ ) या गावाशी संबंधित आहे. देवनळा हे डोंगरी गाव जंगलात असून तेथे आज कोलाम नसले तरी एके काळीं असावेत, असे काही लोकांच्या सांगण्यावरून वाटते. मुंढेकर वा मुंढेकार या आडनावाचे कोलाम मूळात मुंडाली वा मुंढाली आडनावाचे असणे शक्य आहे. मुंडाली वा मुंढाली या नावाचे कोलामवस्तीचे गाव पाहण्यात आले नाही. वणी तालुक्यात असलेल्या मेंढोली गावात कोलाम बहुधा नसावेत. या गावाशी मुंडाली या आडनावाचा संबंध असू शकेल असे म्हणण्यासाठी आधार नसल्यामुळे अडचण आहे. तुमकर या आडनावाच्या मूळाशी कोलामी भाषेच्या अनुषंगाने टेंभुरणीच्या झाडाचा संबंध पोहोचू शकेल.

पुढील 'ए'कारान्त आडनावे मराठी पद्धतीची वाटतात. पण ती मूळ गांवावरूनच आलेली असावीत असे वाटते. कारण कोलामांची आडनावे तयार होण्याची हीच प्रक्रिया आहे.

| आडनाव | कोणत्या गावांशी संबंध असू शकेल | तालुका | त्या गावी कोलाम आहेत काय ? |
|---|---|---|---|
| झोले | झोला | यवतमाळ | आहेत |
| शिंदे | सिंदी, शिंदी | यवतमाळ, वणी, वर्धा | आहेत |
| किनारे | किन्हाळा ( 'ळ'चा 'र' वऱ्हाडात होतो ) | यवतमाळ | आहेत |
| शिबले | शिबला | वणी | आहेत |
| मोरे, मोवरे | माहूर | किनवट ( यवतमाळ तालुक्यातील दत्तापूरला निरंजन माहूर म्हणतात. तेथेही कोलाम आहेत. ) | आहेत |
| माऊलें | माहूर ? | किनवट | अ.हेत |
| भोसे | भोसा | यवतमाळ | आहेत |
| बोस्से | भोसा ( की बोथ ? ) | यवतमाळ | आहेत |
| मुंजाळे | मुंझाळा | केळापूर | आहेत |
| रामपुरे | रामपूर | वणी | आहेत |

| आडनाव | कोणत्या गावाशी संबंध असू शकेल | तालुका | त्या गावी कोलाम आहेत काय ? |
|---|---|---|---|
| सकरापुरे | सकरापूर | यवतमाळ | आता नाहीत. अगोदर असावेत; जवळच्या नरसापुरात आहेत. |
| कापरे | कापरा | यवतमाळ | आहेत |
| जांभे | जांब | यवतमाळ | आहेत |
| वडदे, वेडदे | वेडद | केळापूर | आहेत |
| अरधुने | अर्जुना ? | यवतमाळ | आहेत |
| | अर्जुनी ? | वणी | आहेत |
| | अर्दवन | वणी | आहेत |
| बोडे | बोर्डा (वऱ्हाडी उच्चार | वणी | आहेत |
| | बोड्डा, बोड्डुऽऽ), बोदडी ? | केळापूर | आहेत |
| बोदे | बोर्डा ? | वणी | आहेत |
| | बोदडी ? | केळापूर | आहेत |
| मांगुर्ले, मांगोर्ले | मांगुर्डा, मांगुर्ले | केळापूर | आहेत |
| येडसे | येडसी | केळापूर | अगोदर असावेत |

या यादीतील बोदे आणि यापूर्वी आलेले बदडी हे आडनाव एकच असावे. बोदे आणि बोडे हेही एकच असावे. बोदे या शब्दाचा कोलामीतील ' अंगण ' हा अर्थ लक्ष्यात घेऊन बोदे हे आडनाव तपासले तर ' अंगण ' किंवा ' अंगणातील देवी ' अशा कुलचिन्हाचे ते आडनाव ठरते. येडसे या आडनावाचे नाते येडसी ह्या गावाशी असेल; पण त्या गावात कोलाम नाहीत. येडसे व वेडदे ही आडनावे जवळची वाटतात.

बोचा व बोस्से ही आडनावे पूर्वी एकच असल्यास भोसा या गावाशी त्याचा संबंध आहे; पण बोचा आडनाव वेगळे असल्यास ' बोथचा ' ( बोथ येथील, बोथ या गावाचा ) अशी त्याची फोड होईल. बोथला कोलाम आहेत. बोचा आडनावाच्या काही लोकांनी त्याचे आता बोरकर केले आहे.

आस्वले आडनावाचे लोक अस्वल या कुलचिन्हाचे असू शकतील किंवा आसोला वा आसोली नावाच्या गावात आधी वसलेले असतील. या नावाचे कोलामवस्ती असलेले गाव मात्र आढळले नाही.

जुनघरे, मराठे, खडसे, धोटे, राऊत, घोरपडे, ढुमणे, ढोबरे, पाटोले, तलवारे, सापोडे, गुंजटे, घासाडे, लव्हाणे, झेडगे, लुंगसे, डेबरे ( ढेबरे ), नाईकवाडे, घरगडे, घेरडे, भोराडे, सोरांबले, बोरकुटे ( बुरुकटे ) या ' ए'कारान्त आडनावांची ठेवण

मराठी कुलनामांसारखी आहे. यातील काही कुलनामे कोलामांनी इतरांकडून उचलली असतील किंवा त्यांना आधीचे हेंगाडे वाटणारे नाव त्यांच्या दृष्टीने 'शुद्ध' करून घेतले असेल. जुनघरे हे आडनाव कुणब्यांत आढळते. ते 'जुनोनी' गावाशी दूरान्वयाने जोडता येऊ शकेल. मराठे हे आडनाव ब्राह्मणांत आहे. ते फार तर 'मराठवाकडी' गावाशी जोडले जाऊ शकेल. खडसे हे आडनाव महार, लेवा, माळी, कुणबी या जातींत आढळते. या आडनावामध्ये 'खडश्या वाघ' हे कुलचिन्ह प्रकटते, असे फार तर म्हणता येईल. धोटे हे आडनाव कुणबी, तेली यांसारख्या जातींत असून 'धोटा' (= बैलांना औषध पाजण्याचा लहान नळा) हे कुलचिन्ह त्यात प्रकटू शकेल. राऊत हे आडनाव गोंड, गोवारी, कुणबी अशा जातींत आढळते. 'राजदूत' या शब्दापासून व्युत्पादित झालेले हे आडनाव 'घोडेस्वार' या अर्थाने रूढ झाले. कोलामांतील एखादे घराणे गोंडांकडे अशा नोकरीत असणे शक्य आहे. स्वामीची आडनावे सेवकांनी घेतल्याची उदाहरणे इतिहासात आढळतात. (उदा. घोरपडे, दमढेरे). घोरपडे हेही मराठ्यातील नाव अशाच तऱ्हेचे आहे. 'घोरपड' हे कुलचिन्हही या कुळाच्या लोकांचे असेल. ढुमणे हे आडनाव माळ्यांत आढळते. ढोबरे हे मराठी आडनाव आहे. तलवारे या नावाचा संबंध पराक्रमाशी असेल किंवा 'तलवार' या कुलचिन्हाची ओळख देणारे असेल. पाटोले हे आडनाव 'पाटोळे' अशा रूपात मुंबईकडे उच्चवर्णीयांत आहे. पाटाळा (ता. वणी) या गावाशी या आडनावाचे नाते असू शकेल. सापोडे, गुंजटे, घासाडे, ल्व्हाणे ही आडनावे इतरांत क्वचितच आढळतील. साप, गुंज, घास, ल्व्ही या कुलचिन्हांची अनुक्रमे परिचायक ही नावे असल्यास नकळे! झेडगे या आडनावात कोलामी शब्द 'झिडंगा' हा असावासा वाटतो. झिडंगा म्हणजे घंटा हे या आडनावाच्या लोकांचे कुलचिन्ह असावे. लुंगसे हे आडनाव खास कोलामी आहे. 'लिंगीचे' अशी तर या आडनावाची फोड नाही ना? लिंगी गावी कोलाम आहेत. कोलामी भाषेत 'लुग्से' (= उचकी) असा जो शब्द आहे, त्याच्याशी या आडनावाचा संबंध कदाचित असू शकेल. उचकी येण्याची सवय असलेल्या एखाद्या माणसाची ओळख तशीच पडून मग ते कुलनाम झाले असेल. लुंगसे आडनावाच्या काही कोलामांनी आता 'मसराम'सारखी गोंड-प्रधानांतील अडनावे उचलली आहेत. डेबरे किंवा ढेबरे हे आडनाव कोलामांमध्ये मूळात 'डेब्बूर' असे होते व आहे. नाईकवाडे हे आडनाव मराठी खरे; पण कोलामांच्या न्यायप्रमुखास नाईक म्हणतात व कोलामांनाही नाईक म्हणण्याची प्रथा आहे. नाईकांचा वाडा किंवा नाईकांचे वाडे असलेल्या कोलामवस्तीचे कोलाम नाईक-वाडे म्हणविले गेले असतील. वाडा या कोलामांच्या आडनावाबाबतही हेच म्हणता येईल. वाडा असलेल्या कोलामवस्तीचे कोलाम वाडा या आडनावाचे ठरले असतील. घरगडे व घेरडे ही दोन्ही आडनावे कोलामांत मूळची एकच आहेत. भोराडे या आड-नावाच्या कोलामांचे कुलचिन्ह सनकाडी किंवा अंबाडीचे झाड हे असावे. कारण

'भोराटी'चा अर्थ कोलामीत 'सनकाडी' असा आहे. सोरांबले आडनाव कोलामांतच आढळते. बुरुकुटे अशा उच्चाराचे कोलामी आडनाव बोरकुटे या मराठी आडनावा-सारखे वाटते म्हणून काही कोलामांनी ते तसे केले.

वरील मराठीसदृश्य आडनावांचे अर्थ कोलामी भाषा व संस्कृती यांच्या माध्यमातून उकलण्याची धडपड यशस्वी झाली तर यांतील बरीच आडनावे मराठी-ऐवजी कोलामी ठरू शकतील.

रामगडे, देवगडे, जहागड, च्यागेड (शागेड) ही आडनावे किल्ल्यांशी संबंधित वाटतात. जहागड, च्यागेड व शागेड ही तिन्ही आडनावे एकच आहेत. गुजाराम, किरीट, मुरारी ही आडनावे साध्या नावांप्रमाणे पण कोलामांच्या वेगळेपणाची निदर्शक दिसतात. येगरी (येघरी), ताबड्ड, गजरा, मानगी, काण्णी, कांबी (कुंभ्याचे?) आमझोर, सिरेबंदी (शिरबंदी), पाडसी, पाडसीनेकुन, एलके वा एलकी, मितेलाक, केलेगुंडी, राड्डी ही आडनावे खास कोलामी आहेत. पाडसीचे नाईक ते पाडसीनेकुन. (कोलामी भाषेत 'नेकुन' हा शब्द 'नाईका'साठी आहे). ससेवाला या अर्थाचा 'मितेलाक' हा कोलामी शब्द आहे. त्यावरून सशाशी कुलचिन्हाचा संबंध असेल किंवा ससे धरणारा वा पाळणारा म्हणून कुलनाम रूढ झाले असेल. कोलामी भाषेच्या दृष्टीने काण्णी आडनावाचा संबंध 'डोळे' या अर्थाशी येऊ शकेल. 'एलका' या शब्दाचा उंदीर हा अर्थ ध्यानी घेतल्यास उंदीर हे कुलचिन्ह या संबंधात जोडले जाऊ शकेल. कोल्हे हे नावही असेच असू शकेल किंवा कोल्हापूर (ता. वर्धा) या गावाशी संबंध असेल.

कसार, राड्डी, कोमटी ही आडनावे जातिनामे दर्शवितात. काच–बांगड्या विकणारा वर्ग वऱ्हाडात कसार या नावाने ओळखला जातो. कोलामांतील असा एखादा धंदेवाईक या नावाने पुढे परिचित झाला असेल किंवा कसारखेड (ता. किनवट) येथील कोलाम कसार या आडनावाचे झाले असावेत व तेच संयुक्तिक आहे. राड्डी या शब्दाला समान वाटणारा रेड्डी हा शब्द तेलगूत मुख्य माणूस किंवा जात या अर्थाने प्रचारात आहे. कोलामातील राड्डी आडनाव ग्रामप्रमुख या अर्थाने प्रचारिले गेले असेल. कोलामी भाषा द्राविडी असून तेलगूशी तिचे जवळचे नाते आहे. शिवाय तेलगूभाषी व मराठी-भाषी या दोन समाजालाच कोलाम जवळचे आहेत. कोमटी ही जात आहे, हे सर्वविदित आहेच. कोमटी लोक आंध्रात व यवतमाळ भागात आहे. त्यांच्या धंदा केल्यावरून एखाद्या कोलामाचे ते आडनाव पडून पुढे रूढ झाले असावे.

चिचगामा (शीतगामा), केलगामा, कारेगामा अशा नावांतही गावेच आहेत असे दिसते. चिचगाव, केळगाव (केळापूर?), कारेगाव या गावांचे कोलाम अनुक्रमे चिचगामा, केलगामा, कारेगामा या आडनावांचे झाले असावेत. केळापूर व कारेगाव (यवतमाळ, वणी, केळापूर या तालुक्यांतील गावे) येथे कोलाम आहेत. मारेगाव (केळापूर तालुका), विहीरगाव (ता. केळापूर) येथील कोलाम मारेगामा व वीरगामा झाले! तेथे कोलाम आहेत. पीडीगामा पीळगावचे (?) व पोलेगाम पोळेगावचे (?)

असतील काय ? की या नावांचे दुसरे अर्थ संभवतात ? या नावांची गावे कोठे आहेत की काय ह्याची माहिती मिळाली नाही.

सुरपाम हे आडनाव आदिवासींमधील ' म'कारान्त पद्धतीचे, विशेषतः गोंडांसारखे आहे. कोलामी भाषेत सुरा म्हणजे गोल व पाम म्हणजे साप. गोल किंवा वेटोळी घातलेला साप ज्यांचे कुलदैवत वा कुलचिन्ह आहे ते सुरपाम, असा अर्थ फलित होऊ शकतो. मसराम हे आडनाव कोलामांनी गोंडप्रधानांपासून घेतलेले आहे. मडावी, अत्राम ही कोलामांतील आडनावे गोंडांमध्ये आढळतात. गोंडी भाषेत मडा या शब्दाचा अर्थ झाड असा असून मडावी घराण्याच्या लोकांचे झाड हे कुलचिन्ह आडनावात प्रकटले आहे. तेक या शब्दाचा कोलामी अर्थ सागवानी लाकूड असा आहे. द्राविडी भाषांतही हाच अर्थ आहे. तैकाम वा टेकाम हे आडनाव सागवृक्ष हे कुलचिन्ह प्रकटविते. गोंडांमध्ये या आडनावाचे काही लोक सागवृक्षपूजक असून बैतूलकडे त्या कुळाचे लोक सागाचे झाड तोडीत नाहीत.[1] कुंबरे आडनाव गोंडांतही आहे व त्याचा संबंध भाजीच्या एका झाडाशी आहे. विल्लारी हे कोलामांतील आडनाव गोंडांतील उल्लारी या आडनावाशी साधर्म्य ठेवीत असून उल्लारी नावाची एक जात दक्षिण भारतात आहे.

आडनावे सांगणे वा त्या पद्धतीने माणूस ओळखणे ही सुशिक्षित पद्धत इतर ग्रामीणांप्रमाणेच कोलामांत कमी आहे. हळूहळू त्या धर्तीचे बदल होत आहेत. म्हणून त्यांची आडनावेही सुधारू लागली आहेत. एरवी त्यांच्या बऱ्याच आडनावांवरून त्यांच्या मूळ वसतिग्रामाचा शोध लागून तेच आडनाव त्या गावाच्या कोलामसमूहाने घेतले असे दिसते. काही आडनावे इतरांकडून घेतलेली आढळतात; तर बऱ्याच आड-नावांवरून झाडे, पशू, प्रतिमा, प्राणी यांच्या पूजेचे त्या त्या कुळाचे रिवाज वा कुलचिन्ह त्या त्या आडनावांच्या कोलामसमूहाचे प्रकटते, हे वरील विवेचनावरून लक्ष्यात येईल.

## गोत्र आणि आडनावे

संपूर्ण कोलामसमूह चार कुलगटांमध्ये विभागला गेला आहे. ( त्या गटांना गोत्र म्हणावे ! ) चारदेवे, पाचदेवे, सहादेवे व सातदेवे असे ते चार गट होत. चार देवतांना पूजणारा तो चारदेवे ! अशा तऱ्हेनेच इतरही गोत्रांचे समजावे. सगोत्र विवाह कोलामांत होत नाहीत. चारदेवे गोत्रांची मांगुळे, मडावी, पाटोले, टेकाम ही आडनावे आहेत. पाचदेव्यांमध्ये लोणसावळी, भिवईकर, येलके ह्या आडनावांचे कोलाम येतात. कसार, देवनारे, धोटे, बोरकर ( बोचा ) हे सहादेवे असून सातदेवे लुंगसे, मादनी, मानगी, रामगडे इ. कुळांचे कोलाम आहेत. ( गोत्रांसंबंधीची माहिती विस्ताराने ४ थ्या क्रमांकाच्या ' विवाह ' नामक प्रकरणात पुढे आलेली आहे. )

卐 卐 卐

---

१. Stephen Fuchs : The Gond and Bhumia of Eastern Mandla ( १९६० ), पृ. १४४

१ : :

## ' पहिला पाळणा '

उपवर विवाहितेला लवकर मूलबाळ न झाल्यास घरातील, शेजारातील आणि नात्यातील लोकांना एकप्रकारचे दुःख होते. घरात लवकर पहिला पाळणा हलावा, ही वडीलधाऱ्या लोकांची मनोमन धारणा असते. खुद्द नवविवाहिता बाळासाठी हरिखलेली असते आणि या गोष्टीला खुद्द पतीचाही अपवाद नसतो.

### पुत्रप्राप्तीसाठी नवस

मुले नवसासायासानेच होतात, ही प्रगाढ श्रद्धा कोलाम लोकांमध्ये नित्यासाठी वास करीत आली आहे. त्यामुळे, लग्न होऊन काही महिने लोटत नाहीत तोच नवपरिणत कोलाम दांपत्य त्यांच्यातील ' भगता'कडे जाते. ' भगता'च्या अंगात ' देव ' येतो. ' अंगात आलेला देव ' बहुधा ' भिवसनदेव ' असतो. काही ' भगतां'च्या अंगात ' आईमाय ' येते. या ' देवा'कडे जसे नवविवाहित पुत्रेच्छू पतिपत्नी येतात; तद्वतच ज्यांना लवकर मुले होत नाहीत, असेही स्त्री-पुरुष येतात. त्यातल्या त्यात ' **मुलगा** होत नाही ' म्हणून ' देवा'कडे नवस घेऊन येणारे अधिक असतात.

नवस करण्यासाठी ' भगत ' वा ' देव ' या केंद्राकडे पतिपत्नीस जोड्याने यावे लागते. उभयता त्या ' देवा'ला नमस्कार करून ' आम्हाला लवकर पोर होऊ दे ' अशी करुणा भाकतात. " मूल झाल्यास देवाच्या नावाने सेरणी ( प्रसाद ) वाटू किंवा

गूळ देऊ; देवाच्या अंगणात नवीन झेंडा चढवू; देवाच्या नावाने बैल वा जानी ( छोटी गाय ) दान देऊ; पंगत जेवू घालू " अशासारखा एखादा संकल्प मुलाची इच्छा करणारी जोडपी या ' देवा'जवळ करतात. नवस केला की तो फेडलाच पाहिजे, असा मानसिक दाब स्वभावतः त्या जोडप्यांवर असतो !

पुत्रफळ मागणारी जोडपी अवतीभवती बसलेली असतात. ' भगता'च्या अंगात ' आईमाय ' वा ' भिवसनदेव ' प्रविष्ट होतो ! जांभया व अंगमोड्या देऊन आणि हातवारे करून तोंडाने कसलीशी पुटपुट करीत घुमतघुमत ' देवाच्या मागण्या व कौल ' भगत ' सांगू लागतो. ' देव अंगात आलेला ' तो ' भगत ' पांढरा कोरा शेला पुत्रेच्छू पतिपत्नीस धरावयास सांगतो. त्या शेल्यात दगडाचा एक लहानसा देव स्वतः ' भगत ' घालतो व त्या जोडप्यास तो शेला पाळण्यासारखा हालवायला सुचवितो. ते दोघे तो शेला हालवू लागतात. अशा तऱ्हेने पाच वेळा करण्यात येते. अर्थ हा की, पाच झोके त्या पाळण्यातील दगडाला मिळावेत ! तो शेला म्हणजे पाळणा व शेल्यातील दगडरूपी देव म्हणजे बाळ, असा त्या वेळी समज करूनच साऱ्या कृती करावयाच्या असतात.

पाच झोके संपले की, ' भगत ' त्या दोघांना म्हणतो, " जा तुम्ही. तुम्हाला मूल दिलं ! " या कृतिद्वारा ' तुमच्याही घरी असाच पाळणा हलणार ' असे ' भगत ' त्या जोडप्यास सुचवीत असतो.

नवस फळतातच अशी त्या जोडप्याची श्रद्धा असते. प्रबल इच्छा व श्रद्धा यांच्या भरीव पाठबळामुळे बरेचदा त्या जोडप्यास मूल झाले असल्याचा प्रत्यय आल्याची उदाहरणे आहेत ! अर्थात तो योगायोग असला तरी अडाणी कोलामांना तो नवसाचाच परिणाम वाटत असतो ! आपला नवस फळल्याबद्दल त्यांना अत्यानंद होतो.

## गर्भधारणा

कोलामांचे घर एका खोलीचे असते. त्या लहानशा खोलीत घरातील सगळेजण झोपतात. त्यामुळे पतिपत्नीमधील संभोगप्रक्रिया घरात घडणे अडचणीचे जाते. म्हणून त्यांची ही प्रक्रिया कित्येकदा रानावनात ( मिळून कामावर गेल्यास ) एकांत भागी, जंगलात वा झाडबनात होते. अर्थात हा नियम नव्हे. सोयीचा भाग पाहिला जातो, एवढेच !

कोलामांमध्ये विटाळशी स्त्री दहा दिवसपर्यंत अलग बसते. या अवधीत ती ग्रामसीमेबाहेरील एका झोपडीत राहते. स्त्रीचा विटाळ दहा दिवस पाळण्याची प्रथा आता कमीकमी होत जाऊन या दिवसांची संख्या कमीत कमी तीन व जास्तीत जास्त पाच दिवसांवर आली आहे. तसेच ग्रामसीमेबाहेर राहण्याचा दंडकही आता शिथिल झाला आहे. विटाळ संपला की, ती स्त्री विटाळाचे स्नान गावाबाहेर करते.

आता हीही प्रथा कमी झालेली दिसते. वस्तीतही विटाळशी स्त्री आंघोळ करू लागली आहे. ती स्त्री स्नान करून सर्व कपडे भिजवते. नंतर ती घरात येऊ शकते. विटाळाच्या अवधीत ती स्त्री बाहेरची, शेतीची, मजुरीची अशी कामे करते. अलग बसण्याचा विश्रांतीचा हेतू परिस्थितीने सफल होत नाही व हा हेतू यामागे आहे ह्याचीही जाणीव त्या लोकांना नसते. घरातील सडासारवण, स्वयंपाकपाणी ह्या कामांपासून मात्र तिला अनायासे सुटका मिळते व तेवढाच आराम मिळतो.

- ज्या महिन्यात विवाहिता अलग बसत नाही, त्या महिन्यात तिला गर्भ असल्याचे लक्ष्यात येते. बायाबापड्यांच्या माध्यमाद्वारा ही वार्ता लवकरच वस्तीत व नातेवाईकांत पसरते. पुरुषांपेक्षा स्त्रियांमध्ये ही गोष्ट हमखास माहीत होतेच !

## नऊ महिन्यांचा काळ

गर्भ राहिल्यानंतरचे नऊ महिने काहीसे कौतुकाचे असले व त्या स्त्रीला इतर स्त्रिया जपत असल्या तरी डोहाळजेवण, विश्रांती वगैरे भानगडी या जमातीत नसतात. खरे म्हणजे, कोणत्याही श्रमजीवी समाजात गर्भवतीचे दिखाऊ कौतुक होत नाही किंवा त्यासाठी समारंभाचे पसारे मांडले जात नाहीत. बाळंतपणाच्या घडीपर्यंत ती गर्भवती जीवनातील दैनंदिन कामे व बाहेरील शेतीवाडीची, मजुरीची, कष्टाची कामे करीतच असते. त्यामुळे तिच्यातील स्वकष्टाचा सकसपणा मुलातही पर्यायाने उतरतो आणि आडमाप धसमुसळेपणा मुलाच्या वाट्याला येतो. नवव्या महिन्यापर्यंत, नव्हे बाळंतपणाच्या दिवसापर्यंत गर्भार स्त्री आपली कामे सोडीत नाही, असा अनुभव आहे.

## बाळंतपण

बाईच्या पोटात दुखू लागले की, बाळंतपणाची वेळ जवळ आल्याचे अडाणी लोक समजून चुकतात. कोलाम बायकांचे बाळंतपण त्यांच्या राहत्या खोपटातच होते. त्यांचे घर एकाच खोलीचे असल्यामुळे बाळंतपणाच्या घडीला पुरुष घराबाहेर जाऊन बसतात किंवा कामाधंद्याला जातात. स्त्रिया तेवढ्या घरात राहू शकतात. बाळंतपण बहुधा सुरक्षित होते.

कोलाम स्त्रियांचे बाळंतपण सुरक्षित होण्यासाठी त्यांच्याच जमातीमधील एक सुईण मदत करते. खेड्यापाड्यात हे काम मांगीण करते; तर कोलामांमधील ही सुईण कोलामांमध्ये ' माटेरताद ' किंवा ' माटेमुरताल ' या नावाने ओळखली जाते. ही सुईण वयाने म्हातारी असल्यास तिला 'माटेमुरताल' ( सुईणबुढी ) असे म्हणतात. अन्यथा तिला 'माटेरताद' म्हणून संबोधतात. ही सुईण सामाजिक जबाबदारी म्हणूनच सुईणपणाचे कार्य आत्मीयतेने करते. प्रत्येक कोलामवस्तीत एकतरी अशी कोलाम सुईण असते.

## बाळ आणि बाळंतीण

मुलाच्या जन्मानंतर बाळंतिणीचा विटाळ पहिल्या पाच दिवसांसाठी पाळला जातो. साधारणतः पाचव्या दिवशी मुलाचा नाळ गळून पडतो. त्यानंतर बाळंतिणीचा विटाळ संपला, असे समजले जाते. मूल जन्मल्यानंतर नाळ कापण्याचे काम सुईण करते.

बाळंतिणीची न्हाणी तिच्या राहत्या झोपडीतच, जेथे बाळंतपण झाले तेथेच असते. तेथे तात्पुरता खड्डा म्हणून ही न्हाणी तयार केलेली असते. पाच दिवसपर्यंत बाळबाळंतिणीचे स्नानादि विधी तेथेच उरकले जातात. फार तर, आडोसा म्हणून एखादे गोणपाट, तरट वा फडके आडवे बांधतात.

बाळंतिणी वाहणा वापरीत नाहीत. ६ व्या किंवा ७ व्याच दिवशी त्या घराबाहेर पडतात आणि कामालाही जातात. घरात फक्त पाचच दिवस राहण्याचा दंडक या जमातीत आहे; बाकी पुढे दंडक म्हणून नाही. काही वेळा ही मुदत फार तर पंधरा दिवसांपर्यंत लांबते. परंतु बाळंतपणापासून पंधरा दिवसांनंतर एकही बाळंतीण घरात बसून आयत्या अन्नावर जगत नाही. ती कष्टासाठी बाहेर पडतेच. बाळंतपणाच्या दिवसापर्यंत कोलाम स्त्रिया काम करतात व बाळंतपणानंतर बहुधा एकाच आठवड्याने त्या पुन्हा कष्टाच्या रामरगाड्याला जुंपल्या जातात; इतक्या त्या धडधाकट असतात आणि दारिद्र्यामुळे त्याशिवाय दुसरा पर्याय नसतो.

बाळंतिणीस एखादा रोग आढळून आल्यास कोलाम लोक त्यांना माहीत असलेल्या असंख्य औषधी-वनस्पतींपैकी काही वनस्पती आणून तिला खायला देतात. बहुधा त्या जंगली औषधाने ती बरी होते ! त्याबरोबरच, 'भगता'च्या अंगात येणाऱ्या 'देवा'जवळ जाऊन रोग बरा करण्याचे प्रयत्न प्रामुख्याने सुरूच असतात !

मूल जन्मल्यानंतर दुसऱ्या दिवशी आनंद व्यक्त करण्याच्या दृष्टीने बाळाच्या घरचे लोक कोलामवस्तीत तीळगूळ व खोबरे वाटतात. या निमित्ताने बाळाच्या जन्माची माहिती वस्तीत राहणाऱ्या सर्व लोकांना अनायासे होऊन जाते.

## नाव ठेवणे

काही भागातील कोलामांत बाराव्या दिवशी बारसे होते. पण या बाराव्या दिवशीच्या बारशाची प्रथा अगदीच कमी आढळते. उलट बहुतेक भागातील कोलामांमध्ये आपल्या मुलाचे नाव ठेवण्याचा विधी पाचव्याच दिवशी होतो. त्याला 'पाचवी' असे सर्वसाधारण नाव आहे. या दिवशी 'पाचवी'चा उत्सव आजूबाजूच्या बायांसह बाळंतिणीच्या घरी पार पडतो. शेजारणींना बाळंतिणीच्या घरी जेवायला बोलावले जाते. जेवणापूर्वी सर्व बायका गाणी म्हणतात व बाळाचे नाव ठेवतात.

मुलांची नावे कोणत्याही पंचांगादि साधनांनी वा ज्योतिष्याच्या सांगण्यावरून ठेवली जात नाहीत. मुलांच्या पत्रिकांचे, जन्मतारखेची नोंद ठेवण्याचे व तत्सम बाबींचे

ज्ञान जेथे खेड्यापाड्यातील अनेक अशिक्षित जातींना नसते, तेथे कोलामांबद्दल तो विचारच करणे शक्य नाही ! मुलामुलींची नावे ठेवतांना कोलाम स्त्रिया आपसात विचार करतात. पुरुषही विचार करतात; परंतु बायांनाच अशा गोष्टींत अधिक रस असतो !

कित्येकदा मूल जन्मल्याची माहिती कळताच गावाचा कोतवाल येतो व त्या मुलाची माहिती नेतो. कोलाम त्यावेळी सुचेल ते नाव त्या पोराला देतो व तेच कोतवाल पाटलांकडे पोचवितो. त्यामुळे त्या नावात सुसंगती असतेच असे नाही.

कोलामांच्या नावांत व खेड्यापाड्यात राहणाऱ्या इतर लोकांच्या नावांत आता फारसा फरक नसतो. जन्मदिनावरून वा जन्माच्या काळावरून काही नावे ठेवली जातात. काही नावे कोलामांच्या व इतरांच्या देवांची असतात. ज्या देवाच्या उत्सवाच्या संधानात मुलगा जन्मेल, त्या देवाचे नाव त्या मुलास लाभेल. उदा. हनुमानजयंतीच्या दरम्यान जन्मलेला मुलगा ' मारुती ' किंवा ' हनुमंत ' होईल. आषाढीकार्तिकीचा मुहूर्त साधून जन्मलेली मुले ' विठ्ठल'चे नाव धारण करतील; तर महाशिवरात्रीच्या दरम्यान जन्मलेल्या मुलांची नावे महादेवाशी संबंधित असतील ! आवड म्हणूनही देवाची वा देवभक्तांची नावे ठेवली जातात. काही वेळा, ज्या देवाच्या नवसाने मूल झाले, त्या देवाचे नाव मुलास देण्यात येते. मुले वाचत नसल्यास ओबडधोबड नावे देण्याची रीत यांच्यातही आहे. कित्येकदा मृत आजोबाचे नाव पहिल्या नातवाला देण्याची आवड दिसून येते. काही नावे परंपरेने चालत आलेली असतात व तीच मुलांना देण्याबद्दल आग्रह असतो. जुन्या म्हाताऱ्यांची नावे बरीचशी कोलामी पद्धतीची व जुन्या धर्तीची आढळतात.

मात्र, कोलामांमधील जुनी वैशिष्ट्यपूर्ण नावे अलीकडे नष्ट होत चालली आहेत. नवीनांचा कल चांगली नावे निवडण्याकडे असतो. नवीनांचा संपर्क इतरेजनांशी येत आहे; शाळांचाही प्रसार होत आहे; अशा स्थितीत शाळेत नाव टाकतांना व इतरांना सांगतांना आपल्या मुलाचे नाव चांगले वाटावे, असा एक मानसिक धागा इतरांत मिसळू लागलेल्या कोलामांच्या मनात असणे साहजिकच आहे. ' आपले नाव बेटे असेच आहे ' ही भावना पुढिलांची नावे चांगली ठेवण्याच्या मूळाशी असते.

## मुलांची नावे

कोलाम मुलांना साधारणतः पुढीलप्रमाणे नावे ठेवलेली आढळली. नमुन्याच्या या यादीवरून त्यांच्या नावांची धर्ती लक्ष्यात येईल. काही नावांच्या अर्थाची उकल कंसात दिली आहे.

### ( अ ) देव-देवभक्त यांच्या संदर्भातील पुरुषनामे

रामा, रामजी, रामराव, राजाराम, राजेराम, जयराम, सखाराम, सीताराम, गंगाराम, तुळशीराम, काशीराम, मनीराम, परसराम, रामचंद्र, रामकृष्ण, रामसा,

इसाराम ( इच्छा?राम ), रघुनाथ, रघू, रामदास, तुकाराम, नामदेव, नामा, मारुती, हनुमंत, हनुवता, लखमा, लक्ष्या, लक्ष्मण, लक्षीमन, शंकर, संबा, संभा, संभू, महादू, महादेव, विश्वनाथ, इसीनाथ, सदू, सदाशिव, काशा, काशीनाथ, शिवराम, शिवा, गणपत, गणू, गणा, गंपा ( गणबा ), विठोबा, इटोबा, विठू, विठ्या, इटू, इट्या, विठ्ठल, इट्टल, पांडू, पांड्या, पांडुरंग, कृष्णा, किसना, किसन, बाळकृष्ण, बाळकिस्ना, हरिभाऊ, हरी, हऱ्या, माधव, माधो, माध्या, यादव, यादो, गोविंदा, गोइंदा, गोंद्या, कान्हो, केशव, केशा, गिरधर, गिरिधर, शामराव, शामा, शाम्या, बळीराम, जानार्दन, जनू, जगन्नाथ, जगन, जगनू, नारायण, नाऱ्या, सूर्यभान, सुरेभान, उदेभान, सुरबा ( सूर्यभान ? ), देवाजी, यमाजी, चंद्रभान, चंद्या, चंद्रू, तुळशा, धर्मा, अर्जुन, अर्जुना, जानू, जान्या, जानबा ( ज्ञानबा ! ), खंडू, खंड्या, नागो, नागोराव, भीमा, भीमराव, भीमारामा, अंबू, अंबादास, श्रावण, सरावन, अंत्या ( अनंता ! )

( आ ) सण, वार, तिथ्या यांच्या संदर्भातील पुरुषनामे

सोमा, सोम्या ( सोमवारी जन्मलेला ), मंगऱ्या, मंगळ्या, मंगल ( मंगळवारी जन्मलेला ), बुध्या, बुधा ( बुधवारी जन्मलेला ), सुकऱ्या ( शुक्रवारी जन्मलेला ), सकऱ्या ( संक्रातीला जन्मलेला ), बिजू, बिजा, बिज्या ( बिजेला = द्वितीयेस जन्मलेला ), पुना, पुनाजी, पुनबा ( पुनवेला म्हणजे पौर्णिमेला जन्मलेला ), पारन्या, पारनू ( पारण्याला जन्मलेला ), दसरू ( दसऱ्यास जन्मलेला किंवा दशरथ ), आवशा, अवशा ( अवशीला म्हणजे अमावास्येला जन्मलेला )

( इ ) मुस्लीम संस्कृतीपासून घेतलेली पुरुषनामे

हुसेन ( मोहरम सण इतरांप्रमाणेच कोलामांत अपवादात्मक स्वरूपात आला व मोहरमातील हुसेनही आला. ' हसन-हुसेन'च्या नवसाच्या बोलीने हे नाव बहुधा ठेवले जाते. ), फऱ्या ( फरीद ? )

( ई ) सर्वसाधारण नावे

खेड्यापाड्यात बहुधा आढळणारी पुढील पुरुषनामे कोलामांतही आहेत.

अजाब ( अजब ! ), अभिमान, चंपत, चंफत, पंजाब, रंगराव, रंग्या, बापूराव, बापू, बापुन्या, बापुना, बाजीराव, दवलत, दौलत, मोतीराम, मोती, रतन ( रत्न ! ), नानू, नाना, दादा, दादाराव, रमेश, वसंत, वसंता, यशवंत, लाला, लालू, लालबा, नत्थू ( नाक टोचून नथ घालता येईल असा मुलगा; नाक टोचलेला ), राघो ( राघूसारखा बोलणारा ! ), आनंदा, गुलाब, सोनबा ( सोने ! ), कवडू, कवड्या ( कवडी ! ), दमडू, दमड्या ( दमडी ! ), चिमणा ( लहानसा !; चिमणा पक्षी ! ),

तानबा, तान्या, तानू ( तान्हा ! ), पैकू ( पाईक ? ), छोटू, छोट्या, भाऊराव, रावजी, रावबा, आप्पाजी, आन्या, आन्याजी ( अण्णा ! ), उकंडा, उकंड्या ( उकिरड्यावर जन्मलेला ! ), कारू, काळू ( काळा ! ), डोमा ( डोंबडा = काळा ! ), गोमा, लायनू, लहानू ( लहान ! ), बहिरू, बेहरू, बहेरू ( बहिरा ! ), वाळलू, वारलू, वाळल्या, वारल्या ( वाळका ! ), बारकू, बारक्या ( बारीक; वाळका ! ), भुरू, भुऱ्या, भुरा ( भुरा = गोरा ! ), धोंड्या, धांडू, झिपऱ्या ( डोकीचे केस वाढलेला )

( उ ) साधारणतः इतरत्र कमी आढळणारी किंवा इतरत्र मुळीच न आढळणारी, पण कोलामांत असणारी पुरुषनामे :—

जैतुर, जयतुर, जयतू ( कोलामांचा एक देव ), भुतू, भुत्या ( भूत !; भुताई देवतेच्या नवसाचा ), दावलू, दवलू, दावजू, ताती, मागू, मलकू, वाघू, वाघ्या ( वाघ ! ), वागलू ( वाघ ? ), पोलू, पोलबा ( पोळ्यास जन्मलेला ?; पोल्या = नेभळट ? ), पारणू ( पारण्याला जन्मलेला ? ), इसाराम ( इच्छाराम ?; विश्वराम ? ) बापुन्या, बापुना, बाबलू ( बाबू ? ), भीमारामा, गिरमा, धुमा, गुजी, पोतू, लेतू ( कोलामी: लेता = लहान मूल ), भोनू, भोना ( मूर्ख ? ), चेंडकू, चेनकू ( टेंगणा ? ), भवानी, भोवानी, भवान्या ( पुरुषांतही ही तीन नावे आढळतात. ), नेऱ्या, वेऱ्या ( वेळेवरचा ? वेळ = पायवाटेचे द्वार ), मेऱ्या ( मेळेवरचा ? मेळ = सीमा ), राणू ( राणोजी ? राणा ? ), बोधलू ( बोध्या ? लठ्ठ ? ), बोधरू, पोचू, दुर्योधन, हिरबा, सट्टू ( छोटू ), आया ( अय्या ?; आया = देवी; अय्याक = देव ), सुरबा ( सूर्यभान ? ), अणू, फरद्या ( कागदाची फरदी ? की मुसलमानांतील फरीद ? ), दिवाण्या ( दिवाणा = वेडा ? ), फुला ( फुलासारखा ! ), भिल्या ( भिल्ल ! ), मेरू ( मेरू पर्वत !; मेरेवरचा = सीमेवरचा ? ), फुशा ( खोटारडा ? )

वरील नामावलीपैकी २-३ नावे दोनदोनदा पुनरावृत्त झालेली आहेत. उदा. पारणू. हे नाव इतर जातींत कमी आढळते. बापुना-बापुन्या हे नाव गोंडांत आढळते. सुरबा हेही नाव इतरत्र कमी दिसते.

‘ उ ’ यादीतील नावे प्रामुख्याने कोलामांमधील स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण वाटतात.

## मुलींची नावे

कोलामांमधील स्त्रियांच्या नावांचा अंदाज पुढील यादीवरून येऊ शकेल. कंसात शक्य तेथे अर्थाची उकल केली आहे.

( क ) पुढील नावे साधारणतः नद्या, देवी, देवता, तीर्थे, पौराणिक स्त्रिया इत्यादिकांना धरून आहेत.

भिवरा, भीमा, भीमी, गंगू, गंगी, भागीरथी, भागिर्ती, सरस्वती, सर्वसती, दुर्गा, पार्वती, गिरजा ( गिरिजा ), गिरजी, रेणुका, अनुसया ( अनसूया ), सावित्री,

अंजनी, अंजी, लक्ष्मी, लक्षीमी, महादी, गया, काशी, सीता, जानकी, राधा, राधी, किसनी ( कृष्णी ), रखमा, रुखमा, रुखमी, रखमी, विठी, इठी, रामी, धर्मी, शामी, नागी, मिरी ( मीराबाई ), सुभद्रा, सुबी, वत्सला, वच्छी, गोपी, चंडकी ( चंडिका ? ), येसुदी ( यशोदा ), जेनी ( जनाबाई ).

( ख ) खेड्यापाड्यात आढळणारी स्त्रीनामे :—

मंजी ( मंजुळा !; मंजिरी ! ), शेवंती, सुमन, कमला, कमळजी, आनंदी, कवडी, दमडी, गुणाबाई ( गुणवान ! ), गुजाबाई ( गोजी ? ), बैना (बहिणाबाई, बहीण ), बया (बाई ), रंगी, रंगू, उकंडी ( उकिरड्यावर जन्मलेली ! ), सोनाबाई, सोनी, तुळजाबाई, धोंडी, विमल, इमल, भुरी ( गोरी ! ), मनी, वारली ( वाळकी ! ), सखू ( सखी, मैत्रीण ), चिमणाबाई ( चिमणी !; लहान !), हावशी ( हौस असलेली ! ), झित्री ( चिमुकली ! ), झिपी, झिपरी ( झिपऱ्या असलेली ! ), चंद्री, वाघी ( वाघीण ! ), लायनी ( लहान ! )

( ग ) मुस्लीम संस्कृतीने दिलेली नावे :--

हुसेन ( हे नाव पुरुषांप्रमाणेच स्त्रियांचेही असते. मोहरमात ‘ हसन-हुसेन’च्या नवसाने होणाऱ्या मुलांची नावे अशी ठेवण्यात येतात. )

( घ ) इतरत्र न आढळणारी किंवा कमी आढळणारी, पण कोलामांत असलेली निराळी अशी नावे :—

रमी ( रमणारी ! ), लयजी ( हे नाव आदिवासींत अधिक आढळते. ), रायजी, रायजा ( आदिवासींमध्ये अधिक आढळणारे नाव ), दिवाणी ( वेडी ! ), समदुरी ( समुद्री ! ), भोनी ( मूर्ख, पुल्लिंग–भोनू, भोना ), लेंबडाबाई ( वेंधळी ? ), झिमाई, बाया ( ‘ बया’चे कोलामी रूप ? ), पैकी ( ‘ पैकू’चे स्त्रीलिंग ), चंडकी ( चंडिका ?; ठेंगणी ? )

( च ) काही अंशी नव्या युगमानाप्रमाणे मुलींची काव्यात्म नावे कोलामांत आढळतात, असे पुढील नावांवरून वाटेल. परंतु जुन्या पिढीतील स्त्रियांचीही काही नावे अशीच आढळली. तेव्हा, नावे ठेवण्याच्या पद्धतीवरून कोलामांना रसिक ठरविता येण्यास वाव आहे ! परंपरेने वा अभावितपणे अशी नावे ठेवली जात असावीत, असे वाटते व तेच अधिक संयुक्तिक आहे. पुढील नावे पाहा:–

माणिक, सुंदर, सुंदरी, फुला ( फुलासारखी ! ), फुलमंती, रमी ( रमणारी ! ), सीमा ( कोलामी भाषेत या शब्दाचा अर्थ ‘ मुंगी ’ असा आहे. ), कलावती, पूर्णा ( पूर्णा नदीवरून हे नाव ठेवले नसावे. कोलामांच्या वसतिस्थानांपासून पूर्णा नदी दूर आहे. कोलामांना ही नदी माहिती पण नाही. ), रेशमी ( रेशमासारखी ! )

वरील स्त्रीनामांच्या यादीत एकदोनदा पुनरावृत्ती झाली असून ती सहेतुक आहे.

आतापर्यंत पुरुषांची व स्त्रियांची जी नावे दिली, त्यावरून कोलामांमधील नावांची कल्पना साकल्याने येऊ शकेल.

काही पुरुषनामे व स्त्रीनामे यांचा जो अर्थ कंसात वर उकलून दाखविलेला आहे, तो अर्थ ध्यानी धरूनच कोलाम लोक मुलामुलींची नावे ठेवतात, असे मात्र मुळीच नाही ! वाचकांना त्या नावाशी संबंधित अर्थाची कल्पना यावी, एवढाच हेतू अर्थाची उकल देण्याचा आहे. घोटी ( ता. यवतमाळ ) नामक खेड्यात एका मुलाचे नाव गणबा व त्याच्या बापाचे नाव गणपत असे आढळले. कोलामांची नावे अर्थ ध्यानी धरून फारशी ठेवली जात नाहीत, हाच याचा अर्थ !

## नवसाची फेड व मुलाचे पहिले वर्ष

तान्हे मूल वर्षाचे होण्यापूर्वीच त्याला ' देवा'ला नेण्याची प्रथा कोलामांत आहे. ज्या देवाचा नवस असेल त्या देवाकडे किंवा तो ' देव अंगात येणाऱ्या ' ' भगता'कडे बाळाला नेलेच पाहिजे, असा दंडक कोलाम लोकांनी आपणहून आपल्यावर लावून घेतलेला आहे. वर्षाच्या आत आपल्या मुलाला घेऊन पतिपत्नी नवस केलेल्या देवाकडे किंवा ' भगता'कडे जातात आणि नवस फेडतात. मूल होण्यापूर्वी देवाला जे काही कबूल केले असेल ते न चुकता दिले जाते. नवस फेडण्याचे बरेच प्रकार असतात. कुणी पंगतीचा खर्च देतात. कुणी बैल, गाय किंवा वासरू देवाला सोडतात. कुणी स्वतःचा स्वयंपाक देवाजवळ करतात. कुणी 'भगता'ला जेवण, कपडा वगैरे वस्तू देऊन सन्मानित करतात व प्रसाद देतात.

देवाला सोडलेली जनावरे त्या देवस्थानाची मानली जातात. हे देवस्थान म्हणजे ' भगता'च्या देवाची एका खोलीची लहानशी झोपडी असते. नवस फेडणाऱ्यांनी देवाला दिलेली जनावरे व्यक्तिगत मालकीची नसल्यामुळे ' भगत' ती विकू शकत नाही. ही जनावरे विकली तर येणाऱ्या रकमेतून त्या देवस्थानाचा, देवाचा, देवीचा किंवा त्या देवतेच्या उत्सवादिकांचा खर्च चालविण्यास मदत घेण्यात येते. ही रक्कम व्यक्तिगत खर्चासाठी वापरली जात नाही.

## बाळपण आणि प्रतिपाळ

बाळास कोमट-गरम पाण्याने एकदोन दिवसांआड आंघोळ घालतात. स्नानापूर्वी एरंडेलाने किंवा जवसाच्या तेलाने बाळाच्या अंगाचे मर्दन करतात. काजळ डोळ्यांतच नव्हे, तर गाल, छाती, पोट, दंड, पाय इ. अवयवांनाही लावून त्याला दृष्ट लागू नये याची सोय करतात ! मुलाला दृष्ट लागते या समजुतीने रात्रीच्या वेळी केर, मीठ, मोहोऱ्या, मिरच्या इ. पदार्थ एकत्र करून दृष्ट काढली जाते. ते पदार्थ मुलावरून ओवाळून विस्तवात टाकतात. जळक्या मिरच्यांनी ठसके न लागल्यास दृष्ट खरोखरीच लागली, असे समजले जाते. घराच्या आढ्याला असलेल्या एकाच मोठ्या आडव्या

लाकडाला आंबाडतागाचा दोर बांधून पाळणा करतात व त्यात बाळाला झोपवतात. झोके देऊन गाणी म्हणतात. पूर्वी, मुलाने झोपून राहावे, त्रास देऊ नये, बाईला कामाला जाता यावे म्हणून त्यास थोडीथोडी अफू नियमाने देत असत. आता ती देण्यात येत नाही. घरात बाळाची थोडी मोठी बहीण वा थोडा मोठा भाऊ असला तर त्याच्या भरवशावर बाळाला सोडून आई कामास जाते. कामावर इतरांपेक्षा अधिक काम करून ती तिसऱ्या प्रहरी मुलाला पाजायला घरी येते. नंतर ती कामाला जात नाही. पुढेपुढे मूल खातेसवरते झाल्यावर त्याच्यासाठी वरणभाकरीचं जेवण झाकून ठेवून, थोड्या मोठ्या मुलांच्या भरवशावर किंवा शेजारीण घरी राहत असल्यास तिच्याकडे त्यास सोडून ती कामावर जाते. परंतु मूल पाहायला कुणीच नसले तर त्याला पाठीवर झोळीत घालून कामावर जायलाही ती तयार असते. घरात म्हातारी असली तरी ती बहुधा घरी राहत नाही. कारण तीही कामाला जाते.

## खाऊ आणि खेळणी

लहान मुलांना खाऊनिमित्त पैसे, बिस्किटे, पेपरमिंट, चॉकलेट अशा महागड्या चिजा देणे कोलामांना शक्य नसते. कोलाम स्त्रियांची 'दूध नाही' अशी तक्रार नसल्यामुळे त्यांची मुले अंगावर बरेच दिवस दूध पिऊ शकतात. मुलांना चहा किंवा दुधाच्या सवयी लागत नाहीत. कारण घरात दूध वा चहा करण्याची सवय फारशी नसते. मुले दातांनी चावायला शिकली की त्यांना भाकरीचा तुकडा पापुद्रा काढून, तेलमीठ लावून देतात. अशा तऱ्हेने मुलांना अन्न खायची सवय लागते. पुढेपुढे ही मुले वरण व तिखट पदार्थ खाऊ लागतात आणि त्यानंतर त्यांचे जेवण चांगलेच वाढते. कोलाम लोक बाजाराच्या दिवशी चुरमुरे-फुटाणे विकत घेतात व तोच खाऊ त्यांच्या मुलांना मिळतो. 'भातके' वा खाऊ म्हणजे चुरमुरे–फुटाणे एवढेच कोलाम मुलांना माहीत असते. कधीकधी भजी, चिवडा, शेव असले पदार्थ बाजारातून या 'भातक्या'त येतात, एवढेच !

मुलांना खेळणीही मिळत नाहीत. एखाद्या वेळी यात्रेला गेल्यास कागदी ऐनका ( चश्मे ), डफडी अशा स्वस्त वस्तू मुलांसाठी यायच्या; एरवी दगड, माती, काड्या-कुड्या यांचाच खेळ मुले बैल, गाय, शेळी वगैरे समजून खेळतात.

लहान मुलांना रिझविण्यासाठी, किंवा मुलांच्या खेळण्यात पुढील गीत म्हटले जाते. हे गीत मोठ्या मुली व मुले म्हणतात. कधी मोठी माणसे व स्त्रियाही म्हणतात.

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| आम्माय आम्बान<br>आंगाडी सेद्देन | १. | आमची आई, आमचे बाबा<br>बाजारात गेले ! | १. |

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| आमे एल्लाता | | आमच्या घरावरचा | |
| सिकुंडी पूयतिन | २. | वाल फुलोरला ! | २. |
| आटाने-फुटाने | | फुटाणे-बिटाणे ! | |
| तुमकी खुटाने | ३. | टेंभुरणीचा खुंटा !! | ३. |
| सित्ता ताटून | | चिंचेच्या झाडाखाली | |
| वुर्रील वात्तेव | ४. | घोडे आले ! | ४. |
| तुले तुले पापी | | जाते-जाते-वरण उतू जाते ! | |
| पेसार पाप्प पोंग तुळा | | मुगाचे वरण उतू जाते ! | |
| तुले तुले पापी | ५. | जाते-जाते-वरण उतू जाते ! | ५. |

## बालमृत्यू व रोग

मूल अडीचतीन वर्षांचे होईपर्यंत त्यास सटवी, खरूज यांसारखे काही संसर्ग-जन्य, तर ग्रामीण भागात नेहमी आढळणारे काही रोग होतात. त्यांवर दवाखान्याची औषधे न देता हे लोक ' देव अंगात येणाऱ्या ' ' भगतां'कडे त्यास घेऊन जातात. योग्य उपचार होत नाहीत. त्यामुळे बालमृत्यू अधिक होतात.

**बालमृत्यूचे प्रमाण दर्शविणारा तक्ता**

| गाव | एकूण कुटुंबे | जन्मलेली मुले | जन्मलेली मुली | एकूण | मरण पावलेली मुले | मरण पावलेली मुली | एकूण | बालमृत्यूचे शेकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ महारथड (भिसनी) | ४६ | ५० | ६९ | ११९ | १४ | २० | ३४ | २८·६ |
| २ घोटी | २७ | ५५ | ४४ | ९९ | १४ | २३ | ३७ | ३७·३ |
| एकूण | ७३ | १०५ | ११३ | २१८ | २८ | ४३ | ७१ | ३२·६ |

| | |
|---|---|
| मुलांच्या बालमृत्यूचे शेकडा प्रमाण | २६·७ |
| मुलींच्या बालमृत्यूचे शेकडा प्रमाण | ३८·१ |
| एकूण बालमृत्यूचे शेकडा प्रमाण | ३२·६ |

महाराष्ट्र राज्यात १९६१ च्या शिरगणतीनुसार ० ते १४ या वयाची कोलाम मुले शे. ४१·२६ आहेत..

## कुटुंबातील मुलांची संख्या

प्रत्येक कुटुंबात मुले साधारणतः किती असतात त्याची कल्पना पुढील तक्त्या-वरून येईल. हे आकडे महारथड, भिसनी व घोटी या गावांतील आहेत.

### प्रत्येक कुटुंबातील ( जिवंत ) मुलांची संख्या

| प्रत्येक कुटुंबातील मुले | कुटुंबांची संख्या | शे. प्रमाण |
|---|---|---|
| ० | १४ | १७·५० |
| १ | १८ | २२·५० |
| २ | १७ | २१·२५ |
| ३ | १६ | २०·०० |
| ४ | १० | १२·५० |
| ५ | ४ | ५·०० |
| ६ | १ | १·२५ |
| ७ व ७ च्या वर | ० | ०·०० |
| एकूण... | ८० | |

८० कुटुंबांतील एकूण मुले १६६

प्रत्येक कुटुंबात ( जिवंत ) मुलांचे प्रमाण २·१

हेच प्रमाण जननाच्या दृष्टीने कसे पडते, ते जन्मलेल्या मुलांच्या आकड्यांवरून पडताळून पाहता येईल. एकूण ७३ कुटुंबे पाहणीत घेतलेली असून ही कुटुंबे महारथड व घोटी ( ता. जि. यवतमाळ ) या दोन गावांतील आहेत.

### प्रत्येक कुटुंबात जन्मलेल्या मुलांची संख्या

| प्रत्येक कुटुंबातील मुले | कुटुंबांची संख्या | शे. प्रमाण |
|---|---|---|
| ० | ११ | १५·० |
| १ | १० | १३·७ |
| २ | ९ | १२·४ |
| ३ | १३ | १७·८ |
| ४ | १३ | १७·८ |
| ५ | ५ | ६·९ |
| ६ | १० | १३·७ |
| ७ | २ | २·७ |
| ७ च्या वर | ० | ०·० |

एकूण मुले २१८ एकूण कुटुंबे ७३

प्रत्येक कुटुंबात मुले जन्मण्याचे प्रमाण ३

**‘ कासइपा ’**

कोलामांमध्ये मुंजीसारखा एक विनोदी पण अर्थपूर्ण प्रकार आहे. साधारणतः मूल तीनचार वर्षांचे झाले की, त्याची ही ‘ मुंज ’ ( ! ) उरकण्यात येते. हा कार्यक्रम नागपंचमीच्या दिवशी करण्यात येतो.

ज्या घरातील मूल तीनचार वर्षांचे झाले असेल, त्या घरातील म्हातारा आजोबा व तो ३-४ वर्षांचा मुलगा यांचे गमतीचे लग्न लावावयाचे असते. घरात म्हातारा नसल्यास दुसऱ्या घरातील वा नातेवाईक म्हाताऱ्यास ही भूमिका पार पाडावी लागते.

नागपंचमीच्या आधल्या दिवशी म्हातारा व नातू यांच्या हाताला ‘ काकणे ’ ( लग्नात हातास बांधावयाच्या पिवळ्या पट्ट्या ) बांधली जातात. ही ‘ काकणे ’ इतरांनी बांधावयाची नसून आजाने नातवाला व नातवाने आजाला, अशा पद्धतीने एकमेकांना बांधावयाची असतात.

नागपंचमीच्या दिवशी वारुळाचे व नागोबाचे पूजन आटोपल्यावर म्हाताऱ्याच्या पोटाला हळद लावतात. अशा तऱ्हेने हा म्हातारा ‘ नवरदेव ’ होतो. तीनचार वर्षांच्या त्या लहान मुलास लहानशी आंगोशी ( छोटे धोतर ) नेसवितात व त्याच्या अंगात छोटीशी चोळीही घालतात. अशा तऱ्हेने मूल ‘ नवरी ’ होते. म्हाताऱ्यास धोतराचे कोरे पान नेसविण्यात येते. नवरदेव-नवरी समजूनच त्या दोघांना सजविले जाते.

दुपारनंतर वा सायंकाळच्या सुमारास त्या दोघांनाही कोलामांच्या भिवसनदेवा-कडे घेऊन जातात. तेथ देवासाठी काही मांस व धान्य नेण्यात येते. ते देवाला अर्पण करण्यात येते. भिवसनदेवाजवळ झाडाखाली बसून दोघेही जेवण करतात. जेवणात मांस पण असते. ‘ काकणे ’ सोडण्याचा विधी होतो व नंतर ते सर्वजण घरी येतात.

यावेळी देवाजवळ पूजा करतांना किंवा इतर वेळी गंमत म्हणून नवरी झालेल्या त्या लहान मुलाचा कासोटा पुन्हापुन्हा सोडण्याचा प्रयत्न करण्यात येतो. मोठ्यांच्या या विनोदाने तो मुलगा रडतो, चिडतो व लाजतो. त्या मुलाने धोतर आजवर नेसलेले नसते. त्यामुळे त्याचे नेसलेले धोतर ढिले असते. बडी मंडळी धोतराचा काचा नीट मारायला सांगतात. तो मुलगा तसा प्रयत्न करतो.

या प्रकाराला कोलामी भाषेत ‘ कासइपा ’ ( कासा = कासोटा ) असे म्हणतात. वऱ्हाडी लोकांना या उत्सवाचे नाव कोलाम लोक ‘ काष्टाफेडी ’ असे सांगतात.

धोतर वगैरे नेसवून जीवनात येण्याचे शिक्षण, विनोदी प्रकारातून का होईना, या उत्सवप्रसंगी मुलास मिळते. ज्या मुलावर असे हे सोपस्कार ‘ कासइपा ’ या उत्सवात होऊन जातात, तो मुलगा त्या घडीपासून जातिसमाजाच्या पंचायतीला हजर

राहू शकतो. एरवी त्याला त्या सभेत वडील माणसांबरोबरसुद्धा जाण्याचा अधिकार नसतो. इतर महत्त्वाच्या कार्यक्रमांतही त्याला ' कासइपा ' होण्यापूर्वी भाग घेता येत नाही. चांगले समजू न लागलेली मुले महत्त्वाच्या सभांमध्ये रडूनभेकून त्रास देण्या-पेक्षा कोलामांचा हा नियम बरा वाटतो !

या उत्सवाचा इत्यर्थ हा की, त्या दिवसापासून तो मुलगा लोकांमध्ये येतो, ' सज्ञान ' होतो किंवा मुंजीनंतरची अवस्था त्याला प्राप्त होते.

## मुलांचा साजशृंगार

अगदी लहान मुलाला ' बाला ' ( बाळ, मुलगा ) किंवा ' कोवे ' ( पिलू ) असे कोलामी भाषेत म्हणतात. कोलामांमध्ये सातव्या वर्षानंतर लग्न होईपर्यंतच्या वयाच्या मुलास ' लेता ' व मुलीस ' लेती ' असे म्हणतात.

लहान मुले कपडे घालीत नाहीत. दारिद्र्यामुळे कपडे शिवणे शक्य होत नसल्यामुळे तसा प्रघात चालू राहिला. कित्येकदा मुले सातसात वर्षांची होईपर्यंत उघडी-नागडीच राहतात. या वयाच्या आगेमागे असलेली मुले एकदम आंगोशी ( = लहान धोतर ) नेसू लागतात. धोतर ' पचांग घालून ' ( कमरेस विशिष्ट गाठ मारून ) नेसण्याची रीत कोलामांत आणि ग्रामीणांत आहे. हा मुलगा अंगात ' आंगडे ' ( सदरा ) व डोक्यात टोपी घालतो.

मुलीही पाचसहा वर्षांच्या होऊ लागल्यानंतरच कपडे घालू लागतात. कपडे घालण्याची मुलींची सुरुवातमुद्धा एकदम नऊवारी लुगड्यावरून होते. निदान, लहान लुगडे असले तरी ही पोर आपल्या आईसारखेच नेसते.

मुलीचे कुंकू मोठे टपोरे असते. नाकात एक तांब्याचा वाळा ती नथ म्हणून एवढ्यातच वापरू लागते. मुलीचे नाककान वयाच्या ५ ते ७ या वर्षांच्या अवधीत टोचले जातात. मुलाचेही कान टोचतात. कधीकधी नवसाच्या व हौसेच्या मुलाचे नाक टोचून त्याचे नाव नत्थू ( नथ घालू शकणारा ) असे ठेवतात. हा मुलगा बहुधा बराच मोठा होईपर्यंत, किंवा नवस फेडून होईपावेतो मुलीप्रमाणे नाकात नथ घालतो !

मुलामुलींचे नाककान टोचणारा धंदेवाईक माणूस वस्तीत भटकत भटकत आला, तेव्हा वस्तीतील ५ ते ७ या वर्षांच्या दरम्यानची मुले गोळा करून नाककान टोचवून घेतले जातात. नाककान टोचण्याचे काम बहुधा ' भराडी ' या नावाने ओळखले जाणारे किनरीवाले करतात.

## नीती आणि श्रम यांचे सक्रिय शिक्षण

घरात मुलगा वाढत असतांना त्याला नीती व धर्म कोलाम आपल्या पद्धतीने शिकवीत असतात. मूल चुकल्यास त्याला मारतात. मोठ्यांना आदर द्यावा, नाईक-

महाजनांपुढे मुलांनी उभे राहू नये अशा तऱ्हेचे जीवनशिक्षण मुले ग्रहण करीत जातात. खोटे बोलणे, लहानशी चोरी करणे अशा गोष्टी मुलाकडून घडल्यास त्याला चांगलाच मार बसतो. इतकेच नव्हे तर, त्या मुलास दोराने बांधून टांगून ठेवतात व खाली तव्यात अग्नीचे निखारे ठेवून त्यांवर मिरची टाकतात. त्या धुनीने मुलगा बेजार होतो व अशा चुका पुन्हा होऊ नये म्हणून पुढे जपतो.

सामुदायिक सणोत्सवांमध्ये मुले नाचू लागतात. नृत्ये, गीते आणि वादन ही मुले पाहूनपाहूनच शिकतात व तसल्या कार्यक्रमांत भाग घेऊन चांगली सरावतात. ७ वर्षांनंतरची मुले आईबापांबरोबर शेती व जंगले यांच्या कामांवर जातात. शिकता-शिकताच त्यांना काम येऊ लागली की, त्यांची मजुरी सुरू होते. आई 'निंदायला' ( = पिकातील गवत काढायला ) गेली व तिने दोन 'तास' ( = पिकांची ओळ ) घेतले तर मुलगा वा मुलगी एक 'तास' 'निंदायला' घेते. मुले थकल्यास आई मदत करते. या मुलांना अर्धी मजुरी मिळते. मोठी माणसे शिकारीला निघाली की मुलेही उत्साहाने जातात. शिकार पाहतात आणि पाहतापाहता शिकतात. आवश्यकते-प्रमाणे शिकारीच्या वेळी हुल्लड करण्यासाठी अशी मुले वेळप्रसंगी उपयोगी पडतात. निर्भयता व शिकाऱ्याचे गुण या पद्धतीने ह्या मुलांमध्ये बाणत जातात. नंतर मुलगा एकटासुद्धा जंगलखोऱ्यात भटकतो व भोऱ्या, बाटरे यांसारखे लहानमोठे पक्षी घरट्यां-मधून शोधून किंवा गुलेरीने मारून आणतो. घरातील लोकांना त्याची अशी मदत होऊ लागते. सातव्या वर्षापासून मुले चांगलीच कामी पडतात. मुलास स्वतंत्रपणे गायी-म्हशी-शेळ्या वळणे, गवत कापणे हीसुद्धा कामे देण्यात येतात. शेतीची कामे असल्यास ही लहान मुले औताची 'आगुल'[1] हाकलण्यासाठी उपयोगी पडतात.

मुली घरकामाबरोबरच बाहेरच्या मजुरीच्या कामाला आईसोबत जातात. मुलां-पेक्षाही मुलींचा उपयोग अर्थार्जनाला आणि घरकामाला अधिक होतो. दहा वर्षे वयाची मुले व मुली स्त्रीपुरुषांप्रमाणे पूर्णपणे कामाला लागतात आणि स्त्रीपुरुषांबरोबर कष्टाची कामे करताकरता ती तरबेज होतात.

## खेळ

कोलामांची मुले आणि तरुण लोक यांचे खेळ विशेष नाहीत. कारण जीवन-निर्वाहार्थ कष्ट करण्यात त्यांचा वेळ अधिक जातो. शिवाय मनोरंजनासाठी नृत्ये, गीते व वाद्ये त्यांना अधिक प्रिय आहेत. तरीही, कामांतून वेळ मिळेल तेव्हा, सायंकाळी किंवा चांदण्यात त्यांच्या सवडीने व हौशीने हुतुतू, खो-खो, आट्यापाट्या असे खेळ

---

१. औताला दोन बैलांपेक्षा जास्त बैल लागले तर सर्वांत शेवटची जोडी हाकणे सोपे असते. या शेवटच्या जोडीस वऱ्हाडात 'आगुल' असे म्हणतात.

ते खेळतात. हे खेळ त्यांनी इतरांपासूनच घेतलेले आहेत. या खेळांचा प्रचारही कोलामांमध्ये अलीकडच्या काळात झालेला आहे. मात्र दंडारीतील नृत्यक्रीडांचे प्रकार यांच्या जमातीत वैशिष्ट्यपूर्ण होतात व ते रंगतातही ! कुस्त्यांचे आपसातील कार्यक्रम यांच्या जमातीत कधीमधी होतात. त्यामुळे मुलांना कुस्त्या खेळण्याचे एकप्रकारे शिक्षणच मिळते. यांचे स्वतंत्र आखाडे नसतात. तो यांचा स्वतःचा विशेष नव्हे ! शेतीमातीत, मैदानात, गोठाणावर, गवतात, अंगणात कुठेही यांना कुस्ती खेळता येते !

खेड्यापाड्यात आढळणारा सामान्य असा अत्तीपत्तीचा खेळ कोलामांची लहान मुले खेळतात. एका गटाने सांगितलेल्या झाडाचे पान दुसऱ्या गटाने आणावे; पहिल्या गटाने लपावे, तर दुसऱ्याने त्यास शोधावे, असा हा खेळ आहे. ' कोंबडा ' जिंकण्याचा खेळही असाच आहे. ' कोंबडा ' झालेला मुलगा लपून ' कुकूचकू ' असा ओरडतो व त्या आवाजावरून दुसऱ्या गड्यास त्या कोंबड्याला हुडकून काढावयाचे असते. तो ' कोंबडा ' सापडल्यावर दुसऱ्या गटाच्या मालकीचा होतो. याप्रमाणेच गोट्या, विटी-दांडू, घोडाघोडी हेही खेळ ही मुले अधूनमधून खेळतात.

कोतेमोहोळ, मोहो व चिंचा यांचे मेण करून कमच्यांच्या लहान धनुष्यांना लावावे आणि छोट्या तीरांनी दुसऱ्यांची जमिनीवरली लहान धनुष्ये पाडावी; पाडल्यास मेणाच्या गोळ्या जिंकाव्या असा ' तीरकामठां'चा खेळ वऱ्हाडातील ग्रामीण भागात सर्वच जातींत आहे. कोलामांची मुले हाही खेळ खेळतांना आढळतात.

मुली फुगड्या, चिंध्याचिरकुटांच्या बाहुल्या वगैरेंचे सर्वसाधारण खेळ खेळतात.

एकंदरीत, कोलामांमध्ये नृत्यवाद्यांपेक्षा खेळांना महत्त्व नाही व त्यांची स्वतःची वैशिष्टये प्रतिबिंबित होणारे खेळही त्यांच्यात आढळत नाहीत.

२ : :

## दत्तक व सवतीची मुले

एखाद्या कोलामास मूलबाळ नसले तर तो आपल्या नात्यातील दुसऱ्या एखाद्याच्या मुलास दत्तक घेतो. दत्तक घेण्याचा विशिष्ट असा एखादा विधी वा कार्यक्रम होत नाही. फक्त दत्तक घ्यावयाचा मुलगा घरी बोलावून ठेवून घेण्यात येतो. अर्थात ही गोष्ट मुलाच्या आईबापाच्या संमतीने होते.

दत्तक मुलाला स्वतःच्या मुलाइतकीच चांगली वागणूक देण्यात येते. दत्तक मुलगाही तेथ चांगला वागतो.

तसेच सवतीची मुले असली तर त्यांनाही चांगली वागणूक देण्यात येते. एखाद्या स्त्रीने सवतीच्या मुलांना चांगली वागणूक न दिल्यास नवरा आपल्याला रागावून सोडून देईल अशी तिला भीती असते. पहिल्या पत्नीच्या मुलांनाही, ती नसली तरी (मरण पावली, सोडून दिले या कारणांनी), चांगली वागणूक वरील कारणामुळे प्रामुख्याने मिळते.

## मुलामुलींचे हक्क

पित्याच्या मृत्यूनंतर मुले ही असलेल्या संपत्तीची वारसदार ठरतात. मुलगा नसल्यास मुलीला संपत्ती मिळते.

卐 卐 卐



तारुण्याच्या उंबरठ्यावर येऊ घातलेली
कोलाम मुलगी व तिचा लहान भाऊ

९ : :

# लग्नासाठी जात तेवढी एक !

कोलामांमध्ये पोटजाती नाहीत, ही एक विशेष बाब म्हटली पाहिजे. अन्यान्य जातींमध्ये पोटजातींचा जो गोंधळ असतो व त्यामुळे सामाजिक एकात्मतेला जे तडे जातात, तसे काही कोलाम जमातीत नाही. लग्न जुळवितांना कोलाम जात फक्त पाहिली जाते. लग्नासाठी स्वजात तेवढी एक, असे कोलामांमध्ये आहे. कोणत्याही भागातील कोलाम असला तरी तो केवळ दूरचा वा जवळचा म्हणून लग्नास त्याज्य ठरत नाही. लहान वा मोठा हा भेद या जमातीत मानला जात नाही.

अकुलीन संतती मात्र लग्नासाठी कमअस्सल समजली जाते. रखेलीची मुले किंवा विवाहबाह्य संबंधांतून जन्मलेली मुले ही इतर समाजांप्रमाणेच कोलामांतही लग्न-संबंधासाठी चांगली समजली जात नाहीत. एवढी गोष्ट वगळल्यास संपूर्ण कोलाम जमात लग्नसंबंधासाठी कोलामांना चालते. पोटजाती नसल्यामुळे हे शक्य होते.

**‘ गोत्र ’ आणि ‘ देवे ’प्रकरण**

कोलाम जातीच्या व्यक्तीशी सोयरसंबंध करण्यासाठी कोलाम मोकळे आहेत हे खरे; परंतु लग्न करतांना काही कुलसंच वगळावयाचा नियम कोलामांत पाळला जातो. ब्राह्मणांसारख्या जातींमध्ये लग्न जुळवितांना गोत्र पाहण्यात येते. प्रवरही पाहिले जातात. स्वतःचे गोत्र वगळून लग्न करावयाचे असते. काही लोकांमध्ये तीनतीन गोत्रांना वगळून व काही प्रवरांना ( बहुधा तीन किंवा पाच अशी ती संख्या असते )

सोडून इतर गोत्रियांशी ( व इतर प्रवरधारकांशी ) लग्न करावे लागते. एकंदरीने, सगोत्र विवाह होऊ नये, हे लग्नसंस्थेत काही जातींच्या संबंधी तरी नियमरूप झाले ! त्यातही क्वचिकताच अधिक राहिली. साधारणतः आईबापांकडच्या सात पिढ्या टाकाव्या, असे बंधन धर्मशास्त्रकारांनी घातले.

ब्राह्मणांसारख्या अगदी थोडया जाती वगळल्या तर लग्नसंदर्भात गोत्र पाहण्याची रीत बहुतेक अब्राह्मण जातींमध्ये नाही. परंतु कोलामांमध्ये गोत्रासारखेच बंधन पाळण्याची एक रीत आहे. त्यांच्यात घराण्यातील वा कुळातील देवतांच्या पूजनावरून चार कुल-गट पडले आहेत. ज्या घराण्यात किंवा ज्या कुळांच्या कोलामांत चार कुलदेवतांना पूजण्याची रीत चालत आलेली असेल त्या कुळांच्या कोलामांना 'चारदेवे' असे म्हणतात. याप्रमाणेच पाच देवांना पूजणारे ते 'पाचदेवे', सहा देवांना पूजणारे ते 'सहादेवे' व सात देवांना पूजणारे ते 'सातदेवे' ठरले! या चार कुलगटांमध्ये सर्व कोलाम आणि त्यांची कुळे समाविष्ट होतात. कोलामांमध्ये चारदेवे, पाच-देवे, सहादेवे व सातदेवे अशी चार गोत्रे आहेत, असे यावरून म्हणता येते. कोलामां-मधील लग्ने जुळवितांना, एका कुलगटातील कोलाम स्वतःच्याच कुलगटाच्या कोलामांशी लग्न होऊ नये, हे पाहतात. उदा. सातदेवे कुळांच्या गटात येणारी व्यक्ती सातदेवे कुलगटातील व्यक्तीशी लग्नसंबंध जुळविणार नाही. ही वगळावयाची कुळे परंपरेने त्या त्या कुळांच्या लोकांना माहीत असतात. हिंदूंमधील बव्हंश जातींमध्ये वधूवराच्या माम्याचे आडनाव एक येऊ नये, याची काळजी घेतात. लग्नात गोत्र पाहण्यासारखाच हाही एक प्रकार आहे. उच्च वर्ग सोडले तर फक्त आदिवासींमध्येच गोत्रसदृश पद्धती आढळते व मधल्या जातींमध्ये आढळत नाही, ही गोष्ट चिंत्य आहे.

हे कुलसंच कोणत्या तऱ्हेने विवाह करू शकतात, त्याची कल्पना पुढील तक्त्या-वरून स्पष्टपणे येईल.

| कुलगट ( गोत्र) | कोणत्या कुलगटाशी लग्न होणार नाही ? | कोणत्या कुलगटाशी लग्न होईल ? |
|---|---|---|
| १. चारदेवे | चारदेवे | पाचदेवे, सहादेवे, सातदेवे |
| २. पाचदेवे | पाचदेवे | चारदेवे, सहादेवे, सातदेवे |
| ३. सहादेवे | सहादेवे | चारदेवे, पाचदेवे, सातदेवे |
| ४. सातदेवे | सातदेवे | चारदेवे, पाचदेवे, सहादेवे |

आपल्याच कुलसंचातील लोकांशी लग्न न करणाऱ्या कुळांतील कोलाम भाऊ-भाऊ मानले जातात. म्हणजे चारदेवे कुळांतील कोलाम चारदेवे कुळांच्या इतर कोलामांना भाऊ मानतात. इतरही 'देव्यां'चे असेच समजावे.

कोलामांमध्ये वरील चार कुलगटांशिवाय एक 'बारादेव्या' माणूस असतो त्याला 'टोल्या' असे म्हणतात. हा 'टोल्या' लग्नसंदर्भात कुठे येतो किंवा त्याची आणखी काही वैशिष्ट्ये असतात की काय यासंबंधी कोलामांमध्ये फारशी माहिती आढळत नाही.

कोलामांच्या चार गोत्रांमध्ये म्हणजे कुलगटांमध्ये समाविष्ट होणाऱ्या काही कुळांची वा आडनावांची माहिती पुढीलप्रमाणेः—

( १ ) **चारदेवे**—टेकाम, पाटोले, मडावी, मांगुर्ले.

( २ ) **पाचदेवे**—भिवईकर, येलके ( एलके ), लोणसावळी.

( ३ ) **सहादेवे**—आत्राम, कसार, कुंभेकार, देवनारे, धोटे, बोचा, बोरकर, वाटोडा ( वाटोडे ).

( ४ ) **सातदेवे**—किनारे, जांभे, जांभूळकर, पाडसीनेकुन, मसराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे.

वर दिलेल्या कुळांचे कोलाम कोणकोणत्या कुळांच्या कोलामांशी विवाह करू शकतात किंवा करू शकत नाहीत, त्याची कल्पना पुढील आराखड्यावरून येईलः —

| कुलगट ( गोत्र ) व कुळे | कोणत्या कुळांशी विवाह करू शकत नाहीत ? | कोणत्या कुळांशी विवाह होऊ शकतात ? |
|---|---|---|
| ( १ ) **चारदेवे**<br>टेकाम,<br>पाटोले,<br>मडावी,<br>मांगुर्ले. | **चारदेवे**<br>टेकाम,<br>पाटोले,<br>मडावी<br>मांगुर्ले. | **पाचदेवेः**—भिवईकर, येलके (एलके), लोणसावळी.<br>**सहादेवेः**—आत्राम, कसार, कुंभेकार, देवनारे, धोटे, बोच्चा, बोरकर, वाटोडा ( वाटोडे ).<br>**सातदेवेः**—किनारे, जांभे, जांभूळकर, पाडसीनेकुन, मसराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे. |
| ( २ ) **पाचदेवे**<br>भिवईकर,<br>येलके ( एलके ),<br>लोणसावळी. | **पाचदेवे**<br>भिवईकर,<br>येलके ( एलके ),<br>लोणसावळी. | **चारदेवेः**—टेकाम, पाटोले, मडावी, मांगुर्ले.<br>**सहादेवेः**—आत्राम, कसार, कुंभेकार, देवनारे, धोटे, बोच्चा, बोरकर, वाटोडा ( वाटोडे ). |

| कुलगट (गोत्र) व कुळे | कोणत्या कुळांशी विवाह करू शकत नाहीत ? | कोणत्या कुळांशी विवाह होऊ शकतात ? |
|---|---|---|
| | | **सातदेवेः**—किनारे, जांभे, जांभूळकर, पाडसीनेकुन, मसराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे. |
| (३) **सहादेव** आत्राम, कसार, कुंभेकार, देवेनारे, धोटे, बोच्चा, बोरकर, वाटोडा (वाटोडे). | **सहादेवे** आत्राम, कसार, कुंभेकार, देवनारे, धोटे, बोच्चा, बोरकर, वाटोडा (वाटोडे). | **चारदेवेः**—टेकाम, पाटोले, मडावी, मांगुर्ले. **पाचदेवेः**—भिवईकर, येलके (एलके), लोणसावळी. **सातदेवेः**—किनारे, जांभे, जाभूळकर, पाडसीनेकुन, मसाराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे. |
| (४) **सातदेवे** किनारे, जांभे, जांभूळकर, पाडसीनेकुन, मसराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे. | **सातदेवे** किनारे, जांभे, जांभूळकर, पाडसीनेकुन, मसराम, मादनी, मानगी, मोवरे, रामगडे, लुंगसे, सकरापुरे. | **चारदेवेः**—टेकाम, पाटोले, मडावी, मांगुर्ले. **पाचदेवेः**—भिवईकर, येलके (एलके), लोणसावळी. **सहादेवेः**—आत्राम, कसार, कुंभेकार, देवनारे, धोटे, बोच्चा, बोरकर, वाटोडा (वाटोडे). |

आधुनिकतेच्या जवळ येऊ लागलेली क्वचित काही कोलामकुटुंबे लग्न जुळवितांना फक्त आपल्या आडनावाचे कूळ वगळतात. तसेच मामकूळ एक येऊ नये एवढे पाहतात. 'देवे'प्रकरणाकडे ते लक्ष देत नाहीत. 'फक्त आईत आणि आईच्या दुधात फरक पडावा' असे त्यांना वाटते.

## कोलामांची प्राचीन विवाहरीत

श्रीकृष्ण हा गवळी होता. गोवारी ही आदिवासी जमात श्रीकृष्णाचा जन्मोत्सव साजरा करते. कान्होबाची स्थापना करून मोठ्या उत्साहाने व थाटाने या जन्मोत्सवात गोवारी लोक रस घेतात. श्रीकृष्ण हा अनार्य वा आदिवासी असावा. कारण, आर्यांना कृष्णवर्णी कृष्णलोकांशी लढा द्यावा लागला, असे म्हटले जाते.

दूरान्वयाने कृष्ण व कोलामांचा संबंध जोडण्याचे काही कारण नाही. तरीपण, कोलामांच्या विवाहाची एक जुनी रीत कृष्णचरित्रातील रुक्मिणीला पळविण्याच्या

प्रसंगाशी अगदीच मिळतीजुळती आहे. मुलगी पळवून नेऊन विवाह करण्याची पद्धती राक्षसविवाह या नावाने ओळखली जाते. मुलीला पळवून नेऊन लग्न उरकण्याची ही प्रथा म्हणजे पतीच्या पराक्रमाचे प्रदर्शन करण्याचा एक मार्गच ! कोलामांची लग्ने पूर्वी ज्या पद्धतीने होत असत, ती पद्धती काहीशी अशीच आहे व तीच कोलामांची खरी विवाहरीत आहे.

एखाद्या कोलाम तरुणास लग्न करावयाचे असल्यास तो आपल्या काही मित्रांसह शेताच्या किंवा रानाच्या एखाद्या भागात, आडवळणाच्या जागी लपून बसत असे. साधारणपणे, कोलाम स्त्रिया जेथे कामाला जात तीच जागा लपण्यासाठी निवडली जाई. घरातील कामेधामे आटोपून कोलाम स्त्रिया तरुण मुलींसह निरनिराळ्या भागात जाऊन शेतकामाला किंवा जंगलातील कामाला लागत. लपून बसलेल्या युवकांच्या जवळपास बायकांचा जो जत्था काम करीत असेल, त्याच्यावर संधी साधून तो तरुण युवक आपल्या सहकाऱ्यांसह झडप घालीत असे. ज्या मुलीला पसंत करावयाचे असेल, तिच्यावर बहुधा ही धाड असे. इतर सहकारी तरुणापेक्षा विवाहासाठी उमेदवार असलेला तरुणच या झटापटीत मुख्य भाग घेत असे. आधीच एखादी मुलगी ठरली नसेल तर त्या जत्थ्यातील एखादी साजरी मुलगी पाहून तिच्यावर हमला करण्याचा त्या युवकाचा रोख असे.

कामाला जमलेल्या स्त्रिया आणि तरुणी ह्यासुद्धा काही कमी नसत ! त्या सुखासुखी आपल्या मैत्रिणीचे ' हरण ' थोडेच होऊ देणार ? पकडली गेलेली तरुणी व तिच्या पाठीराख्या महिला हमला करणाऱ्या युवकांवर अक्षरशः तुटून पडत असत. त्या सर्व जणी नखे, हस्त, मुष्टी व लत्ता यांचा भरपूर प्रसाद पकडणाऱ्या पुरुषांना देऊन त्यांना पिटाळून लावण्याचा प्रयत्न करीत असत. या प्रयत्नात ती तरुणी व तिच्या सख्यासोबतिणी यशस्वी झाल्या आणि पुरुषमंडळींना दाद न देता सुटका करून घेऊन परतल्या तर पकडणारा तरुण, म्हणजे नियोजित वर हारला असे मानले जाई. हारल्या-बद्दलचा दंड म्हणून नियोजित वराचा पिता त्या मुलीच्या बापाला पाचदहा रुपये नेऊन देई. त्या मुलीचे लग्न मात्र त्या मुलाशी होत नसे. कारण त्या मुलीचे ' हरण ' करण्यात वरपक्षाकडील मंडळी असमर्थ ठरणे हे वरपक्षाच्या दृष्टीने नामुष्कीचे समजून अशा शौर्यविहीनाशी लग्नसंबंध जुळविण्याचे मुलगी व तिचा पालक टाळत असे. मुलगा आणि मुलाकडचे लोक शूरवीर असावेत, अशा अपेक्षेतून ही प्रथा कार्यान्वित होत असे. जर का तो तरुण व त्याचे सहकारी मुलीस पकडून नेऊ शकले तर ते यशस्वी 'वधूहरण' तो मुलगा व ती मुलगी यांच्या विवाहात परिणत होत असे. मुलाचा विजय ' वधू-हरणा'च्या बाबतीत होणे हा गौरवाचा विषय मानून त्या मुलाला आपली पळविलेली मुलगी देण्यास मुलीचा बाप आनंदाने तयार होत असे.

ही ' युद्धप्रथा ' पुढेपुढे कमी होत गेली. पुढे या प्रथेप्रमाणे युवक स्वतः मुलगी पकडायला न जाता त्याचा बाप जाऊ लागला. साहजिकच बापासह मोठे लोक सहकारी

म्हणून जाऊ लागले. बापाचा पराजय झाला तर लग्न न होता मुलाच्या बापाकडून मुलीच्या बापाला दंड द्यावा लागे. विजयी झालेला बाप पकडून आणलेल्या मुलीचे लग्न आपल्या मुलाशी लावीत असे. मुलीचा बाप त्या गोष्टीसाठी सहर्ष तयार होई.

नंतर या प्रथेला आणखी वेगळे वळण मिळाले. एखाद्या तरुणाला वस्तीतील जी तरुणी पसंत असे, तिचा हात धरून तो तरुण तिला वस्तीतील गावबांधणीची[१] जी हद्द असेल, तेथवर नेत असे. त्या वेळी वस्तीतील स्त्रिया मुलीच्या बाजूने होऊन त्या तरुणास मारीत असत. तरुणाने घाबरून किंवा कमी पडून तरुणीचा हात सोडला तर सोयरीक तुटली असे समजण्यात येई. जर तो तरुण त्या तरुणीचा हात न सोडता तिला घेऊन वस्तीच्या हद्दीपर्यंत वा हद्दीबाहेर जाऊ शकला तर मात्र ती सोयरीक पक्की होत असे.

आजकाल हीही प्रथा बंद पडली आहे. तरीपण ही प्रथा एक विधी म्हणून पाळण्याची चाल कोलामांमध्ये आहे. ज्या मुलीशी लग्न ठरते, त्या मुलीला पकडून पळविण्याचा नाममात्र विधी कोलाम लोक आता करतात. अर्थात एक हास्यविनोदाचा व गमतीचा प्रकार म्हणूनच ही गोष्ट आजकाल केवळ मौजेने केली जाते.

## दुसरी पूर्वरीत

पूर्वी कोलामांमध्ये आणखी एक प्रथा लग्नसंबंधात रूढ होती. साधारणतः ज्यांची लग्ने लवकर होत नव्हती अशा स्त्रियांच्या बाबतीत ही प्रथा अधिक अस्तित्वात होती. एखाद्या स्त्रीला एखादा पुरुष पसंत असला की, तो शेतात वा रानात काम करीत असतांना त्याच्यावर ती स्त्री झडप घालीत असे. या झटापटीत तिच्या मदतीस आणखी काही सोबतिणी असत. जर, हव्या त्या पुरुषास विवाहेच्छू स्त्री पकडून ताब्यात ठेवू शकली, तर ती त्यास पुन्हा सोडीत नसे. त्यास ताब्यात ठेवून ती त्याच्याशी लग्न लावून टाकीत असे. तो पुरुषसुद्धा आपली हार मानून तिच्या अंकित राही व तिच्याशी लग्न लावून संसार करी.

हीही प्रथा आता उरलेली नाही. आता अशा प्रथांची 'सोंगे' विवाहात काढली जातात आणि पूर्वीच्या 'विवाहयुद्धा'चा आनंद सामूहिकरीत्या उपभोगायला मिळतो, इतकेच !

## बालविवाह की प्रौढविवाह ?

बालविवाहाची रीत हिंदू समाजात आज फारशी उरलेली नाही. तरीही ग्रामीण भागातील अज्ञ लोकांमध्ये बालविवाह काही प्रमाणात होतातच ! कोलामांमध्ये मात्र बालविवाह त्याज्य नसले तरी ते सर्रास सुरूही नाहीत. परंतु, काही वर्षांपूर्वी इतर

---

१. गावबांधणीची सविस्तर माहिती पाचव्या प्रकरणात पाहावी.

अडाणी समाजांत २-३ वर्षांच्या मुलामुलींची लग्ने उरकण्याची हौस होती, तसे कोलामां-मध्ये आढळत नाही. इतर समाजांच्या संपर्कामुळे मधल्या काळात कोलामांमध्ये थोड्या-फार प्रमाणात बालविवाह होत असत. परंतु अगदीच लहान मुलींची व मुलांची लग्ने जशी कोलामेतरांत होत, तशी ती कोलामांत होत नव्हती, ही वस्तुस्थिती आहे. मुलींची लग्ने १० ते १३ या वर्षांच्या वयात व त्यानंतर आटोपण्याकडे कोलामांचा कल होता.

तसे पाहिले तर आदिवासींमध्ये प्राचीन काळी बालविवाह रूढ नव्हते. नंतरच्याही काळात प्रौढविवाह आदिवासींमध्येच अधिक होत राहिले. कोलामांमध्ये बालविवाहांपेक्षा प्रौढविवाहच रूढ होते, अशी खात्री, वर ज्या पूर्वीच्या या जमातीच्या विवाहरीती सांगितल्या आहेत, त्यावरून होऊ लागते. झटापट करू शकणारी, पुरुषाशी भांडू शकणारी मुलगी लहान असण्याची शक्यता एकंदरीत कमीच ! त्या रीतीमध्ये मुलीची प्रौढताच अभिप्रेत आहे, असे वाटते. दुसरी रीत तर लग्न न होण्यामुळे वाढलेल्या मुलांच्याच संदर्भातील आहे. तेव्हा, कोलामांमध्ये बालविवाह रूढ नसावेत, असे या पूर्वरीतींवरून वाटते.

स्त्रीच्या कामधंद्याचा उपयोग घरसंसाराला व्हावा अशी कोलाम लोकांची अपेक्षा असते. हा कल पाहता, बालविवाहांचे प्रमाण कोलामांमध्ये कमी असावे, असे माना-वयास हरकत नाही. लग्न करून मुलगी परक्या घरी पाठवून देण्यापेक्षा शक्य तर घरीच तिच्या श्रमाचा उपयोग घेण्याची प्रवृत्ती कोलाम पित्यांमध्ये आहे व त्याच हेतूने घरजावई पण ठेवण्याची अनेक वधूपिते इच्छा करतात.

आज हयात असलेल्या कोलामांमधील काही पुरुषांच्या व काही स्त्रियांच्या लग्नाची वय-वर्षे पुढे दिली आहेत. हे आकडे १९६४ मधील पाहणीचे आहेत. त्यावरून बालविवाह-प्रौढविवाह यांचा प्रचार चालू पिढीत व चालू पिढीच्या मागच्या पिढीत कितपत आढळतो, त्याचा अंदाज बांधता येईल.

पुढील तक्त्यात सायखेड, रासा, कोपरा व नरसापूर (ता. यवतमाळ ) या खेड्यांतील कोलामांमधील ४१ पुरुष व ३८ स्त्रिया यांच्या लग्नाची वर्षे दिली आहेत. त्यांत स्त्रियांच्या लग्नाची वये काहीशी कमी आहेत व ती तशी असणे व्यवहारास धरून आहे. मात्र त्यांतूनही प्रौढविवाहाचीच प्रवृत्ती कोलामांत अधिक असल्याचे दिसून येते.

याउलट, मांगली ( ता. वरोरा, जि. चांदा ) या खेड्यातील कोलामांमध्ये बहुतेकजण बालविवाहित आहेत, असे दिसून आले व ते उदाहरण वेगळे वाटले !

## लग्नाचे वय दर्शविणारा तक्ता

| लग्न कोणत्या वर्षी झाले ? | किती पुरुषांचे ? | किती स्त्रियांचे ? | एकूण |
|---|---|---|---|
| १० वर्षांच्या आत | ० | ० | ० |
| १० व्या वर्षी | ० | ८ | ८ |
| ११ व्या वर्षी | ० | १ | १ |
| १२ व्या वर्षी | ० | ९ | ९ |
| १३ व्या वर्षी | ० | १ | १ |
| १४ व्या वर्षी | १ | ४ | ५ |
| १५ व्या वर्षी | २ | ४ | ६ |
| १६ व्या वर्षी | १ | ३ | ४ |
| १७ व्या वर्षी | २ | ३ | ५ |
| १८ व्या वर्षी | ७ | २ | ९ |
| १९ व्या वर्षी | १ | ० | १ |
| २० व्या वर्षी | २० | २ | २२ |
| २१ व्या वर्षी | २ | ० | २ |
| २२ व्या वर्षी | २ | १ | ३ |
| २३ व्या वर्षी | ० | ० | ० |
| २४ व्या वर्षी | ० | ० | ० |
| २५ व्या वर्षी | ३ | ० | ३ |
| २५ वर्षानंतर | ० | ० | ० |
| | ४१ | ३८ | ७९ |

### शिरगणतीचे काही आकडे [1]

१९६१ च्या शिरगणतीत कोलामांच्या विवाहाविषयी काही आकडे आलेले आहेत. ० ते १४ या वयाची शे. ४१·२६ मुले कोलामांत असून त्यांच्यापैकी फक्त शे. ०·६९ मुलांची व शे. २·९४ मुलींची लग्ने झालेली आहेत. यावरून कोलामांमधील विवाह बालवयात फारच कमी होतात, हे स्पष्ट दिसून येते.

१९६१ च्या शिरगणतीत कोलामांसंबंधी विवाहविषयक जी माहिती दिली आहे ती पुढील तक्त्यात पाहावी.

---

१. Census of India ( 1961 ), Vol. X, Part V-A; Maharashtra : S. Castes and S. Tribes in Maharashtra [ Edited by—B A. Kulkarni, 1964 ]

## ( १ ) विवाहविषयक शेकडेवारी

| | अविवाहित | विवाहित | विधुर वा विधवा | घटस्फोटित |
|---|---|---|---|---|
| कोलाम पुरुष ( शे. ) | ४९·६३ | ४६·४१ | ३·०६ | ०·९० |
| कोलाम स्त्रिया ( शे. ) | ४१·८३ | ४६·९२ | १०·११ | १·१४ |

अविवाहितांत मुलांचे प्रमाण जास्त आहे, हे यावरून दिसते. विवाहितांमध्ये स्त्रिया काहीशा जास्त आहेत. विधवाही अधिक आहेत. स्त्रियांपेक्षा पुरुष पुनर्विवाह ( 'पाट' ) करून घेतात, म्हणून त्यांचे प्रमाण कमी आढळते. घटस्फोटित पुरुष स्त्रियांपेक्षा कमी दिसतात.

## ( २ ) विवाहविषयक माहिती दर्शविणारे आकडे

| | ० ते १४ वर्षे | १५ ते ४४ वर्षे | ४५ व ४५ च्या वर | वय माहीत नसलेले | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| अविवाहित पु. | ८,८२७ | १,७९१ | १२ | ३ | १०,६३३ |
| अविवाहित स्त्रि. | ८,८६२ | ४६० | ६ | १६ | ९,३४४ |
| विवाहित पु. | ६१ | ७,०८२ | २,७९८ | — | ९,९४१ |
| विवाहित स्त्रि. | २६९ | ८,६६३ | १,५४९ | — | १०,४८१ |
| विधुर | ० | २०७ | ४४९ | — | ६५६ |
| विधवा | ९ | ५२६ | १,७२४ | — | २,२५९ |
| घटस्फोटित पु. | ० | १५६ | ३६ | — | १९२ |
| घटस्फोटिता | १३ | २०८ | ३३ | — | २५४ |
| माहिती नसलेले पु. | ९ | ३ | २ | — | १४ |
| माहिती नसलेल्या स्त्रि. | १० | ३ | १ | — | १४ |
| एकूण पु. | ८,८९७ | ९,२३९ | ३,२९७ | ३ | २१,४३६ |
| स्त्रि. | ९,१६३ | ९,८६० | ३,३१३ | १६ | २२,३५२ |
| एकंदर | १८,०६० | १९,०९९ | ६,६१० | १९ | ४३,७८८ |

### पतीपेक्षा काही वेळा पत्नी मोठी !

लग्नसंबंधासाठी मुलापेक्षा मुलगी मोठी असणे हे साधारणतः गैर मानले जात असले तरी कोलामांमध्ये पतीपेक्षा पत्नी मोठी असल्याची उदाहरणे बरीच सापडतात. कामांसाठी अशा मुलींचा जास्त उपयोग होतो, ही वडीलधाऱ्या लोकांची भावना अशी

लग्ने जुळविण्यामागे असते. मोठी मुलगी चुकून केली जाणे हे वेगळे आणि मोठी मुलगी मुद्दाम स्वीकारणे, हे वेगळे ! कोलामांमध्ये काही वेळा मोठी मुलगी स्वीकारली जाते याचे दुसरेही एक कारण आहे. जवळपासच्या गावी लग्नसंबंध जुळविण्याकडे पूर्वी ग्रामजीवनातील बहुतेकांचा कल असे. सोयी व ओळखी यांमुळे योग्य अशी लहान वयाची मुलगी जवळपासच्या गावी मिळाली नाही व जवळपासची मुलाहून मोठी अशी एखादी मुलगी योग्य वाटली तर ती स्वीकारण्याकडे कोलामांचा कल झुकणे यात वावगे काही नाही. व्यावहारिक अनुभव अशा उदाहरणांमध्ये असतो. दूर जाण्याची आणि हिंडण्याची सवयच या जातीच्या लोकांमध्ये नाही. फार काय, जवळच्याही गावांची नावे त्यांना नीट माहिती नसतात. अशा स्थितीत योग्य व लहान वयाच्या मुलींचा तुटवडा जवळपासच्या भागात भासला, तर त्यात नवल नाही !

## बहुपत्नीत्व आहे; बहुपतित्व नाही !

कामासाठी मोठी मुलगी करण्याची चाल होती; तशीच कारणे बहुपत्नीत्वासाठी आहेत. परवापरवापर्यंत बहुपत्नीत्वाची चाल ग्रामीण समाजातील बहुतेक जातींत होती. कोलामांमध्येही ती फार प्रमाणात होती. आज साधारणतः मोठ्या गावांजवळचे कोलाम एकपत्नीत्वाचा नियम कायद्यामुळे पाळू लागले असले तरी आतल्या जंगली खेड्यांत बहुपत्नीत्वाची रीत आजही कुठेकुठे आढळते ! कोलामांमध्ये जुन्या काळीं तर ही रीत होतीच ! १०-१२ घरांच्या कोलामवस्तीत चारपाच तरी अशी उदाहरणे हमखास मिळत ! दोनदोन बायकांना वागविणाऱ्या कोलामांची अनेक उदाहरणे आजही आढळतात. नांझा ( ता. यवतमाळ ) येथे तर तीनतीन बायका करून त्या नांदविल्या जात असल्याची उदाहरणे आहेत. सुभानहेटी ( ता. केळापूर ) या खेड्यातील २१ कुटुंबांमध्ये दोनदोन बायका करणारे तीन पुरुष आढळले. अशा तऱ्हेने अनेक बायका केल्याने त्यांचा कामांसाठी व पर्यायाने जीवननिर्वाहासाठी उपयोग होतो, या जाणीवेतून ही लग्ने होतात, असे आढळून आले आहे. कोलाम स्त्रिया पुरुषांपेक्षाही कष्टाळू असतात, या वास्तव प्रसिद्धीप्रमाणेच दोन्ही बायकांना मानाने वागविण्याबाबतही कोलाम जमातीचा लौकिक आहे. आधल्या बायकोला मूलबाळ नसल्याकारणाने काही कोलाम दुसरे लग्न करीत. परंतु हे कारण एकंदरीत कमीच ! एकंदरीत, बहुपत्नीत्व या समाजास मान्य होते; काही अंशी आजही मान्य आहे; पण कायद्यांची बंधने त्याच्याही कानांपर्यंत जाऊन पोहचू लागली आहेत.

याउलट, बहुपतित्वाची प्रथा मात्र कोलामांत अजिबात नाही. विदर्भाच्या कोणत्याच भागात ही प्रथा आढळत नाही. एरवीसुद्धा, बहुपत्नीत्वाची चाल कुठेही आढळते; परंतु बहुपतित्वाची चाल बहुधा आढळत नाही. एकेकाळी भारतातील काही भागात बहुपतित्व रूढ होते. आज भारताच्या एखाद्या भागात किंवा परदेशातील एखाद्या जातीजमातीत ही रूढी अपवादात्मक स्वरूपात दिसते.

## घरजावई

कोलामांमध्ये वरापेक्षा काही वेळा वधू मोठी असण्याची जी कारणे आहेत किंवा बहुपत्नीत्वास ज्या कारणांनी मान्यता आहे, तीच कारणे घरजावई ठेवण्यामागेही आहेत. कोलामांमध्ये घरजावई ठेवण्याची प्रथा सर्रास नसली तरी, बऱ्याच प्रमाणात आहे. निदान, इतर समाजांपेक्षा ती अधिक आहे. घरजावई ठेवण्यात किंवा घरजावई राहण्यात कोलामांमध्ये गैर मानले जात नाही. एक तरुण माणूस कामाला मिळतो, या भावनेने घरजावई ठेवण्यात येतो. मुलगी दूर जाऊ नये व तिचाही कामाच्या दृष्टीने आपल्याला उपयोग व्हावा असे मुलीच्या आईबापास वाटते आणि त्यामुळेही घरजावई ठेवला जातो. लग्न झाल्यावर घरजावई आणून ठेवण्याची इतरत्र प्रथा आहे. कोलामांमध्ये जातीचा एखादा तरुण लग्नापूर्वीच घरी आणून ठेवतात. नंतर ५–६ वर्षांनी किंवा मुलगी वयात आल्यावर तो तरुण व आपली मुलगी या दोघांचे लग्न लावून दिले जाते. लग्नापूर्वी व लग्नानंतरही तो तरुण घरजावई या नात्याने सासऱ्याकडे राहतो. आपल्या खेड्याचा परिसर व बाजारहाटाचे गाव हेच कोलामांचे विश्व असल्यामुळे मुलगी दूर जाऊ नये असे त्यांना वाटल्यास नवल नाही. तरुण लोक घरजावई गेल्यामुळे गावे ओस पडली असे कोलाम म्हणतात. ही अतिशयोक्ती निश्चितच आहे. तरीही त्या जमातीत असलेल्या प्रथेचा परिचय तीतून मिळतो.

नांझा ( ता. यवतमाळ ) या खेड्यातील चार कोलामपोडांवर ( कोलामपोड = कोलामवस्ती ) पुढीलप्रमाणे घरजावई आढळले:—

| वस्तीचे नाव | वस्तीतील कोलामांची एकूण घरे | किती घरजावई आढळले ? | मुलीचे वय | मुलाचे वय |
|---|---|---|---|---|
| १. गोसावी पोड | २८ | २ | ( १ ) १३ | १९ |
| | | | ( लग्न झालेले नाही ) | |
| | | | ( २ ) १६ | २० |
| २. मोठा गणेशपोड | १४ | १ | १५ | २१ |
| ३. लहान गणेशपोड | २४ | २ | ( १ ) १२ | २० |
| | | | ( लग्न व्हावयाचे आहे ) | |
| | | | ( २ ) १४ | १८ |
| ४. गव्हाणकडी पोड | ४ | १ | १२ | १८ |
| एकूण | ७० | ६ | | |

कोलामांमध्येही घरजावई विनोदी वस्तू आहे, याची जाणीव असल्याचे दिसते 'घरजावई' या शब्दासाठी कोलामी भाषेत 'इल्टाम' किंवा 'इल्ताम' असा

शब्द आहे. नुकत्याच लग्न झालेल्या तरुणांनाही कोलाम लोक विनोदाने ' इल्टाम ' किंवा ' इल्ताम ' म्हणूनच हाक मारतात. ' इल्ताम'चा अर्थ काही भागात केवळ ' जावई ' असाच केला जातो, त्यातलेही मर्म हेच आहे.

### जवळपासच्या सोयरिकी

मुलगी फारशी दूर जाऊ नये या दृष्टीने तर जवळपास सोयरिकी जुळविण्याकडे कोलामांचा कल आहेच; परंतु दारिद्र्य, प्रवासांच्या साधनांचा अभाव व दूरस्थ भागाचा परिचय नसणे यांमुळेही सोयरिकी जवळपासच्या खेड्यांतच जुळतात. बहुतेक डोंगरी खेड्यांतील कोलामांची शेकडा ९५ लग्ने ५-६ मैलांच्या आत असलेल्या खेड्यापाड्यांतच झालेली आढळली. उरलेल्या सोयरिकीही दूरच्या म्हणता येणार नाहीत. कारण त्याही तहसिलीबाहेरच्या बहुतेक नाहीत. आजकाल प्रवासांची साधने वाढल्यामुळे व ओळखी होण्याची साधने वाढत गेल्यामुळे काही वेळा थोड्या दूरच्या सोयरिकी जुळून येऊ लागल्या आहेत. परंतु असे उदाहरण ९-१० खेड्यांतून एखादेच आढळते.

## २ : :

## लग्न जुळविणे आणि देणेघेणे

आजकाल कोलामांचे विवाह जुन्या रीती वगळून होऊ लागले आहेत. कोलाम मुलामुलींची लग्ने आता आईबाप जुळवितात. मुलामुलींनी स्वतःच आपले जोडीदार पसंत करून लग्न केल्याचे एकही उदाहरण या समाजात आज आढळत नाही. किंबहुना, वरवधूंनी विवाहापूर्वी एकमेकांना पाहिलेले नसते. लग्नापूर्वी वरवधू एकाच गावात राहणारे असतील तर तो भाग वेगळा !

लग्न जुळविण्यासाठी मुलाचे वडील पुढाकार घेत नाहीत. मुलाचा बाप निरनिराळ्या गावी जातो व लग्नाची मुलगी असल्यास तिची चौकशी करतो. ज्या गावात अशी मुलगी असेल त्या गावातील कोलामांचे मुख्य पंच त्यांच्या चावडीत एकत्र येतात. त्या बैठकीत मुलाचा बाप आपली व मुलाची माहिती देतो आणि मुलीबद्दलची माहिती मिळवून आपल्या मुलासाठी लग्नाची मागणी घालतो. माहिती वगैरे मिळवून उभयपक्षी समाधानकारक गोष्टी झाल्या, तर तेथेच लग्न पक्के होते. या संबंधात दुसऱ्या बैठकीची गरज कोलाम उरूच देत नाहीत. बैठकींचा घोळ घालीत बसण्यापेक्षा ' एक घाव दोन

तुकडे' या न्यायाने एकदम तडकाफडकी निर्णय घेतला जातो. 'शालमुंदी' आणि साखरपुडा म्हणजे मुलामुलींच्या 'साक्षगंधा'चे दिवसही याच वेळी ठरविण्यात येतात. या बैठकीत ठरलेले लग्न पक्के असतेच! मागाहून निर्णय मागे घेतल्याचे उदाहरण बहुधा घडत नाही! परंतु लग्न मोडणारा एखादा निघालाच तर त्याच्याकडून ५-१० रुपये दंड जातपंचायत घेते. दंडासोबत पूर्वी दारू घेतली जाई.

हुंड्याची रक्कम देण्याघेण्याची रीत या समाजात नाही. आपापला खर्च आपापल्या परीने करावा एवढेच या व्यवहारात अपेक्षित असते. दोन्ही पक्ष परस्परांना जीववेऊ अटी सांगत नाहीत. बंधनात टाकून अडवणूक करण्याच्या अपप्रथा यांच्या लग्नात दिसत नाहीत. देण्याघेण्याचे प्रकार नीतिमत्तेला बाधक आहेत, असे मत त्यांच्यात रूढ आहे. त्यामुळे लग्नात कुठलीच अडचण फारशी उभी होत नाही. त्यामुळेच उणीदुणी, रुसणीफुगणी, भांडाभांडी इ. भानगडी यांच्या विवाहसमारंभातून आढळत नाहीत. उलट, त्यामुळेच त्यांच्या लग्नसोहोळ्यात आनंदाला उधाण येते!

स्वखुशीने आंदण देणेघेणे किंवा अहेर देणेघेणे ह्या गोष्टी अलीकडे अंशतः चालतात. पण आत्यंतिक दारिद्र्यात राहणाऱ्या या समाजाचे देणेघेणे असे कितीसे मोठे असणार? येथे एक गोष्ट मात्र उल्लेखायला हवी. बहुतेक ग्रामीण जातींमध्ये लग्नखर्चासाठी वधूपक्षाला पैसा देण्याची प्रथा परवापरवापर्यंत होती; काही जागी आजही आहे. ही रीत कोलामांतही आढळते. मुलीच्या वडिलाच्या अडचणी कमी करण्यासाठी मदत करावी हा या प्रथेमागचा हेतू आहे. अर्थात ही रक्कम कोलामांमध्ये ३०-३५ रुपयांच्या वर आजसुद्धा नसते! तेव्हा, या पद्धतीला परंपरेशिवाय व मदतीच्या भावनेशिवाय अन्य हेतू चिकटविता येईलसे वाटत नाही. फार तर, मुलींची किंमत त्यांच्या कष्टिक वृत्तीमुळे वाढते, म्हणून मुलीस पैसा देण्याकडे कोलाम झुकतात, असे म्हणता येईल.

मुलाकडून मुलीच्या आईसाठी बहुधा गुलाली रंगाचे एक साधे लुगडे घ्यावे लागते. त्यास कोलामी भाषेत 'आम्मापाट' असे म्हणतात. मुलीच्या बापासाठी 'वरघडी' (वराकडून घ्यावयाचे धोतर) घ्यावी लागते. मुलीसाठी फक्त काळ्या मण्यांची पोत मंगळसूत्र म्हणून आवश्यक मानली जाते. वराने मुलीला एवढे दिले तरी चालते. परंतु रीतिरिवाजाप्रमाणे व हौस म्हणून वधूसाठी वराकडून चांदीची सरी, साखळी, बाहुट्या, कोपरकड्या, कुड्या, पाटल्या, जोडवी अशासारखे व यांपैकी जास्तीत जास्त दागिने केले जातात. ऐपतीप्रमाणे यांतून काही गळतात. हे दागिने घेतलेच पाहिजेत, असा आग्रह नसतो. सोन्याचा दागिना यांच्या लग्नात एकही नसतो.

कोलामांच्या जीवनातील बऱ्याच गोष्टी समूहभावनेने व सहकारी तत्त्वाने आपतः होतात. त्यांची जीवनपद्धतीच तशी आहे. लग्नसमारंभ कोणत्याही कोलामांच्या घरातील

असो, तो आपल्याच घरातील समजून वस्तीचे सारे कोलाम मिळूनच तो समारंभ पार पाडतात. इतकेच नव्हे तर, कमीअधिक आर्थिक मदत देऊन अडचणी निवारण्याचे काम जातभाई करतात. लग्नासारखी व्यक्तिगत बाब सामूहिक समजून पैशांचे प्रश्नसुद्धा त्या धोरणाने सोडविले जातात, हा एक आगळा विशेष यांच्या लग्नपद्धतीमध्ये असल्याचे दिसून येते.

## मामाची मुलगी

बऱ्याच जातींमध्ये लग्नासाठी मामाची मुलगी चालते. 'आत्याघरी भाची' असे बोलण्याचा प्रघात या बाबतीत आहे. कोलामांमध्येही मामाची मुलगी पत्नी म्हणून स्वीकारणे अयोग्य मानले जात नाही. त्या दृष्टीने कोलामांच्या भाषेतील 'कायांगेकाद' हा शब्द विचारास चालना देणारा आहे. 'कायांग' म्हणजे हसणे आणि 'कायांगेकाद' म्हणजे 'हसण्याची क्रिया'. 'मामाची मुलगी' असाही 'कायांगेकाद' या शब्दाचा अर्थ आहे. हसावयास हरकत नसलेली म्हणजे विनोद करण्यास हरकत नसलेली मुलगी, असा त्याचा सरळ अर्थ आहे. मामाच्या मुलीचा विनोद करण्यास हरकत नाही, कारण ती बायको होऊ शकते, असा अर्थ यातून फलित होतो.

डॉ. इरावती कर्वे यांनी कोलामांबाबत लिहितांना "आतेच्या व मामाच्या मुलीशी लग्न होते[१]" अशी माहिती दिली आहे. परंतु आतेच्या मुलीशी लग्न होते, ही बाब खरी नाही. क्वचित अपवाद असू शकतो.

## 'शालमुंदी' व साखरपुडा

लग्नापूर्वी मुलाकडे 'शालमुंदी' (वऱ्हाडातील रूढ शब्द) हा कार्यक्रम आणि मुलीच्या घरी साखरपुडा केला जातो. दोन्हीकडील कार्यक्रमांस 'साक्षगंध' असे सामान्य नाव प्रचारात आहे. मुलाच्या वडिलाने दुसऱ्या गावी जाऊन लग्न जुळवून आणले, त्याच दिवशी 'शालमुंदी'चे आमंत्रण दिलेले असते. आपल्या वस्तीतील सर्व कोलामांनाही मुलाचा बाप आमंत्रण देऊन बोलावतो. मुलीच्या पक्षाकडून मुलाला एखादे उपरणे देऊन गंध लावले जाते.

असाच कार्यक्रम एखादा दिवस ठरवून मुलीकडे होतो. 'शालमुंदी' व साखरपुडा हे दोन्ही कार्यक्रम लग्नाप्रमाणेच 'जोरदार' होतात.

मुलीच्या साखपुड्यासाठी मुलाकडील चारसहाजण बैलगाड्यांत बसून येतात. त्यांत मुलाचे आईवडील, मुलाच्या गावाचे पंच लोक व इतरही काही लोक असतात. दमणी किंवा रेंघी यांच्याऐवजी अशा लग्नसमारंभात बैलगाडेच कोलाम लोक वापरतात. या गाड्यांमध्ये एकाच वेळीं अनेक स्त्रीपुरुष बसू शकतात. हे गाडे उघडे असतात.

---

१. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. ११०

साखरपुड्याची वेळ ठीक सायंकाळची असते. सूर्य बुडण्याची गोरजवेळाच त्यासाठी निवडली जाते. मुलाकडचे लोक पोचताच वधूपिता सामोरा जाऊन त्यांचे स्वागत करतो. ' रामराम, ' आदरसत्कार, ' भेटभलाई ' इ. गोष्टी होतात.

मुलीला हळद लावण्यात येते. तिच्या सोबतिणी तिला अंगणात पाटावर आणून बसवितात. त्यावेळी मुलीचे सासूसासरे क्रमशः त्या मुलीचे हातपाय धुतात व तिला अक्षता लावतात. त्याच वेळीं तिला नेसावयाला नवे लुगडे देतात. अलीकडे शाल व चोळीखण देऊ लागले आहेत. याच वेळीं सासूसासरे मुलीला खुऱ्याचे ( = निकृष्ट चांदीचे ) काही दागिने देतात. त्यांत अंगठी वा ' मुंदी ' चांदीचीच असते. ही अंगठी देणे बंधनकारक असतेच असे नाही.

त्यानंतर पाच कुमारिका त्या वधूवरून अक्षता ओवाळून टाकतात. यावेळी डफ-पावे वाजविण्याचे काम कोलामांतील काही हौशी बजवय्ये करीत असतात. ते त्या वाद्यांचा गजर तालात व जोरात करतात. अंगणात आजूबाजूस बसलेले निमंत्रित पाहुणे पानसुपारी घेतात. शक्य असल्यास चहापाणी देण्याचीही व्यवस्था अलीकडे करण्यात येते. त्याच वेळीं मुलगी पाटावरून उठते व आत जाते.

रात्री ८-९ वाजता ' गोड जेवण ' होते. ' गोड जेवणा'चा अर्थ वऱ्हाडात 'पुरण-पोळीचे जेवण ' असा होतो. पण कोलामांचे गोड जेवण निराळे असते. मांसविरहित जेवणाला कोलाम लोक ' गोड जेवण ' असे म्हणतात. ज्वारीच्या कण्या, भाकरी तुरीच्या डाळीचे वरण हेच यांचे मुख्य ' गोड जेवण ' होय ! शक्य तर गव्हाच्या पोळ्या व तांदळाचा भात या ' गोड जेवणा'त केला जातो. पण असे फार कमी वेळा होते.

जेवणानंतर पानसुपारी होते. तडव वा गोना ( =सुती तरट ) पसरून पाहुण्यांच्या झोपण्याची सोय केली जाते. विश्रांतीसाठी अंगणातच काही पाहुणे अंग टाकतात. पण विश्रांतीपेक्षा रात्रभर चालणाऱ्या नृत्यगीतांच्या कार्यक्रमात सारे कोलाम रंगून जातात. गंमत-मौज करणारे शौकीन व हौशी कोलाम त्या रात्री डफ-पावे वाजवितात. काहीजण लुगडी नेसून नाचतात व काहीजण सोंग काढून गाणी गातगात नाचात सामील होतात. वस्तीचे सारे कोलाम आणि पाहुणे या कार्यक्रमास प्रेक्षक म्हणून हजर असतात. त्यांतील काहीजण स्फूर्ती येताच नृत्यातही सामील होत जातात. रात्रभर गाणी, नृत्ये व वाद्यवादन यांचा धूमधडाका चालू असतो. सकाळी हा कार्यक्रम संपतो.

सकाळी पाहुण्यांना असला तर चहा देण्यात येतो व पानसुपारी होते. दुपारची जेवणे आटोपल्यावर मुलाचे वडील व त्यांच्यासोबत आलेले पाहुणे आपल्या गावी परत जातात. जाण्यापूर्वी लग्नतिथी ठरवून घेण्यात येते. मुलाकडील ' शालमुंदी'चा वा

साक्षगंधा'चा कार्यक्रम झाला नसल्यास त्याचाही दिवस ठरवून टाकतात. मुलाकडील त्या कार्यक्रमाचे स्वरूप वरील कार्यक्रमाहून फारसे भिन्न नसते.

## लग्नासाठी मुहूर्त

कार्तिक एकादशीनंतर (तुळशीचे लग्न लागल्यानंतर!) कोलाम जातीतील विवाह सुरू होतात. पौषाचे दिवस लग्नासाठी अशुभ मानले जातात. कारण तो महिना सामुदायिक श्राद्धाच्या स्वरूपात कोलाम लोक पाळतात. त्या महिन्यात लग्नाची बोलणी-सुद्धा करीत नाहीत. उन्हाळा संपेपर्यंत या जमातीतील लग्ने चालू असतात. मात्र ज्या वस्तीतील गावबांधणी (कोलामांचा वार्षिक स्नेहसोहोळा) आटोपते, त्या वस्तीत गावबांधणी झाल्यावर लग्ने होत नाहीत. गावबांधणी वैशाख ते ज्येष्ठ या महिन्यात सोयीप्रमाणे केव्हाही करण्यात येते.

विशिष्ट मुहूर्तासाठी कोलामांची लग्ने अडत नाहीत. तिथी वगैरे काढण्यासाठी भटजी नसतो. तरीपण, कोलाम जातीतील 'वेताळक' नामक व्यक्ती यासंबंधी कोलामांना सल्ला देते. हा 'वेताळक' काही ठोकताळे जुळवून लग्नाची तिथी सांगतो. उदा. 'अवस' (अमावस्या) टाळावी, सोमवारी लग्ने नको, असे तो बघतो. सोमवार कोणत्याही कामासाठी कोलामांत अशुभ समजला जातो. कोलामांच्या लग्नासाठी शनिवार व बुधवार अधिक शुभ समजले जातात. 'वेताळक' हा कोलामांचा एक-प्रकारचा 'भटजी' असतो, असे म्हणावयास हरकत नाही. कोलामांच्या जीवनाची माहिती सांगणारा वा 'इतिहास' कथन करणारा माणूस म्हणून त्याचा लौकिक असतो.

## कुणब्यांची पद्धती ?

आधुनिक काळात कोलामांची लग्ने कुणब्यांसारखीच होत असल्याचा 'ज्ञानकोशा'चा[१] आणि रसेल-हिरालाल[२] यांचा निर्वाळा बव्हंश चुकीचा आहे. अलीकडे कुणब्यांच्या काही पद्धती कोलामांनी स्वीकारल्या असल्या तरी त्या अगदीच कमी आहेत. त्यांचे विवाह बऱ्याच बाबतीत निराळ्या धर्तीने होतात.

## लग्नतयारी

लग्नाची तिथी ठरल्यावर निवडक नातेवाईक व मित्र यांना तोंडी निरोप देऊन परगावी निमंत्रणे धाडण्यात येतात. स्वतःच्या वस्तीतील कोलामांपैकी सर्वांनाच लग्नाचे आमंत्रण देण्यात येते. दोन्ही पक्षांकडे ऐपतीनुसार लग्नाची तयारी सुरू होते.

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

२. Russell, Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, ( London, 1916 ), पृ. ५२३

## पाच दिवसांचा सोहोळा

पूर्वी कोलामांचा विवाहसमारंभ पाचपाच दिवस चालत असे. आता परिस्थिती आणि बदलता काळ यांमुळे हे बंधन काहीसे शिथिल होऊन यांची लग्ने तीनचार दिवसांवर आली आहेत. लग्नसमारंभात कोलामांचा उत्साह अगदी उधाणून येतो.

## नवरीचे ‘ पर्णू ’ जाणे

लग्नासाठी वराच्या आणि वधूच्या घरी मांडव टाकतात. ऐन लग्नाच्या दिवशी मुलाला हळद लागते. वधूच्या घरी वराने जाण्याची साधारणतः रीत आहे. परंतु कोलामांमध्ये वधूच वराच्या घरी जाते. वराच्या किंवा वधूच्या या जाण्याला ‘ पर्णू ’ जाणे ( पर्णू = परिणयू ? परिणयार्थ ? ) असे वऱ्हाडात म्हणतात. हळद लागलेली वधू ‘ पर्णू ’ जायला निघे तेव्हा तिच्यासह काही कोलाम बायका गाणी म्हणत असतात. वधू व वधूकडील लहान मुले यांच्यासाठी एखादा बैलगाडा असतो. बाकीचे स्त्रीपुरुष पायीच निघतात. त्यांत वस्तीचे बहुतेक सर्व कोलाम असतात. नवरीच्या गाड्यामागून स्त्रिया वेगाने चालतात, नवरीला सोबत करतात व सामुदायिक रीत्या गाणीही म्हणतात. डफ व पावे वाजविणारे कोलाम वाजवीत वाजवीत गाड्याच्या पुढेपुढे चालतात. त्या तालावर गाणी गाऊन कोलाम स्त्रिया स्वतःचे, नवरीचे व पांथस्थांचे मनोरंजन करतात. गाव सोडतांना नवरी स्वतःच्या वस्तीतील देवीचे दर्शन घेऊन निघते.

नवरदेवाचे गाव आले की, नवरी ही गावाबाहेर ‘ आई ’ ( कोलामी शब्द— आया ) या देवतेसमोर बसवून ठेवली जाते. ‘ आई ’ ही बहुतेक गावाबाहेर, गावात शिरण्याच्या वाटेवरच मांडलेली असते. तेथे नवरी उतरल्यावर सोबतच्या स्त्रिया त्या ‘ आई ’ची पूजा करतात. बाहेरून आल्यामुळे नवरीला ‘ बाहेरचे ’ म्हणजे बाहेरच्या देवतेचे किंवा भूतबाधेचे काही झाले असेल अशा समजुतीने ‘ आई ’ची पूजा करून तिला प्रसन्न करण्याचा हा प्रयत्न असतो ! नवरी ‘ आई ’ला नमस्कार करते व तेथेच स्वतःच्या हाताने कोंबडीचे एक पिलू कापते. त्यामुळे त्या नवऱ्या मुलीला ‘ बाहेरचे काही लागत नाही ’ असे कोलामांना वाटते !

## ‘ मंगलाष्टके ’ व ‘ शाबेदान ’

इकडे सायंकाळच्या आधीच नवरदेव सजलेला असतो. त्याला सजविल्यानंतर गृहदेवतेसमोर बसविण्यात येते. त्याच वेळी नवरी मुलगी वस्तीबाहेर देवीच्या ‘ देवताळा ’त ( देवताळ = देवाचे ठाणे वा स्थान ) बसलेली असते. यावेळी नवरदेवाकडील पाच सुवासिनी गृहदेवतेपासून तर वस्तीबाहेरच्या ‘ आईमायच्या देवताळा ’-पर्यंत पाच वेढे घालतात. वेढे घालतांना आरत्या घेऊन त्या गाणी गातात. त्यांचे पाच वेढे पूर्ण होईपावेतो नवरी मुलगी वस्तीत यायला निघत नाही. सुवासिनींजवळ असलेल्या आरत्यांमध्ये मोठा व जाडा काकडा पेटत असतो. या जमातीचे हे एक वैशिष्ट्य आहे.

दरम्यान, वधूकडील मंडळीस नवरदेवाकडील पाचदहा मुख्य लोक सामोरे जातात. त्यांच्याजवळ पाण्याने भरलेली एक घागर असते. वऱ्हाडात त्या घागरीला 'सगुण-घागर' (शुभ-शकुन-घागर!) असे म्हणतात. मध्ये दोन्हीकडील लोकांची 'भेटभलाई' होते. त्यानंतर नवरदेवाकडील लोक परततात. मुहूर्त हा अंदाजानेच साधावयाचा असतो. कोलामांची लग्ने गोरजमुहूर्तावरच होतात. मात्र हा गोरजमुहूर्त घड्याळांनी न ठरता गायी घरी येण्याची वेळ किंवा सूर्य बुडण्याची वेळ पाहून अंदाजाने ठरतो.

वधू व वधूकडील लोक वरमंडपाकडे यायला निघतात. डफ व पावे यांच्या निनादात हे लोक हळूहळू वरमंडपाजवळ येऊन पोचतात. वरमंडपाजवळ येऊन वधू थांबते व तिला नवरदेव मांडव सोडून सामोरा जातो. नंतर दोघेही मांडवात येऊन बोहोल्यावर बसतात. बोहोल्यामागे सालईचे झाड रोवलेले असते. त्याला वऱ्हाडात 'मुंडा' असे म्हणतात. या मुंड्याच्या तळाशी दोन मडकी बसविलेली असतात. त्यांना 'डेळमाथन' असे नाव वऱ्हाडी लोकांत रूढ आहे

वरवधूच्या मध्ये अंतरपाट धरण्यात येतो. एक कोरा शेला वरवधूमध्ये आडवा धरल्यानंतर लग्न लावण्याच्या विधीला सुरुवात होते. लग्न लागतांना वटरक्षक म्हणून 'घस्या' नामक व्यक्तीचा मान असतो. कोलामांचा 'नाईक' हा सर्व समारंभाचा कर्ताधर्ता असला तरी भटजीचे काम कोलामांमधील 'सोंगाड्या' वा 'वेताळक' ही व्यक्ती करते. तो लग्नात मंत्र व मंगलाष्टके म्हणतो. हे मंत्र आणि मंगलाष्टके एकच असतात व तीही अगदी साधी! ही मंगलके कशी असतात? तर, लग्न लागण्याचा दिवस वगळून पुढचा वार मोजायचा! क्रमशः पाच वार झाले की, शेवटचा सहावा वार जोर देऊन उच्चारायचा! त्यावेळी तांदूळ वा ज्वारीच्या अक्षता वधूवरांवर फेकून 'शावेदान' (सावधान) असे 'सोंगाड्या'ने म्हणावयाचे! उदाहरणार्थ, हे मंगलाष्टक कोलामी भाषेत पुढीप्रमाणे म्हटले जाऊ शकेल–

**बुधाराम, बेसी, सुका, सेवनाराम, आयताराम**
**सोम्माऽराम**
**शाऽऽवेदान**

मंगळवारी लग्न असल्यास वरील मंगलाष्टक म्हटले जाईल. कारण वरील वारांमध्ये क्रमशः बुधवार, गुरुवार, शुक्रवार, शनिवार व रविवार हे पाच वार आल्यावर शेवटी सहावा सोमवार आलेला आहे. कोलामी भाषेत मंगळवारला 'आंग्राराम' असे म्हणतात.

लग्न लावतेवेळी किंवा तेवढ्यातच नवरदेव-नवरी यांच्या अंगावरील कपड्यांच्या गाठी मारतात. सुटू नये म्हणून हव्या तर दोनदा माराव्या! पण गाठ जन्माचीच पडली पाहिजे!!

लग्न लागल्यावर नवरदेव हा वधूच्या गळ्यात काळ्या मण्यांची पोत बांधतो. हेच ते मंगळसूत्र होय ! त्यानंतर, प्रथम वधू ही वराच्या हाताला ' कंकण ' बांधते व ते झाल्यावर वर हा वधूच्या हाताला ' कंकण ' बांधतो. ' कंकण ' म्हणजे हळद-अक्षतांची गाठ मारलेली पिवळी पट्टी ! हे ' कंकण ' नवरदेव, नवरी आणि वरवधूचे आईबाप यांच्या हाताला लग्नात बांधावे लागते.

वरवधूचे ' कंकण ' बांधून झाले की, वधूला मांडीवर घेऊन वर बोहोल्यावर बसतो. नंतर सर्व कोलाम स्त्रीपुरुष क्रमाक्रमाने वरवधूजवळ जातात, तांदळाच्या वा ज्वारीच्या अक्षता घेतात, वरवधूच्या पायांस, गुडघ्यांस आणि कपाळास स्पर्श करून ओवाळतात आणि त्या अक्षता आपल्याच पाठीवर फेकतात. हेतू हा की दुर्दैव मागे टाकले जावे; फेकले जावे !

नवरदेव व नवरी यांच्यासाठी जोडे व चपला लग्नात मुळीच नसतात. मांडवात चपला-जोडे कोठेच, कोणाचेच दिसत नाहीत. शुभतेत व पावित्र्यात जोडा येणे म्हणजे विटाळ होणे, असा संकेत बहुतेक आदिवासींमध्ये आहे. डफ वगळले तर कोलामांच्या लग्नात कातडी वस्तू मुळीच नसतात.

## लग्न लागल्यानंतरचे जेवण

लग्न लागल्यानंतर रात्री ८–९ वाजता जेवणाचा कार्यक्रम होतो. सकाळी झालेले जेवण साधे व भाकरी–वरणाचे असते; तर हे रात्रीचे भोजन ज्वारीच्या कण्या व वरण यांचे असते. कधीकधी ज्वारीच्या कण्या व भाकरीबरोबर बकऱ्याच्या मांसाची भाजी असते. पोळी व भात हे पदार्थ कोलामांच्या लग्नप्रसंगी जेवणात आढळत नाहीत. याचे कारण या लोकांचे दारिद्र्य ! दारिद्र्यामुळेच साधे जेवण प्रथेने राहिले आहे. रात्रीच्या ह्या कण्यावरणाच्या जेवणास कोलाम लोक ' गोड जेवण ' असे म्हणतात. मांस असले तर मात्र ' गोड जेवण ' म्हणत नाहीत. अतिशय गरिबी असूनही ग्रामीण जीवनात भोजनसंस्था महत्त्वाची असल्यामुळे ती कमी होऊ शकत नाही.

## ' काकण्या सासो ! '

लग्न लागल्यानंतर वर हा वधूला ' कंकण ' बांधतो तेव्हा ती मुलगी, ते 'कंकण' सोडावे, या अर्थाची विनंती नात्यातील माणसांना उद्देशून करते. ही विनंती गाण्यात असते. एकेका नातेवाईकाचे नाव घेऊन हे गीत लांबतच जाते. २–४ तास तरी ते चालते. जेवणाचा कार्यक्रम संपेपावेतो हे गीत चालतेच. " आम्ही 'कंकणा'मुळे बंधनात पडलो; कसे करावे ? कुणीतरी आम्हाला सोडवा ! "––हा आर्त भाव त्या गीतात असतो. ते गीत पुढीलप्रमाणे आहे :—

| कोलामी | मराठीकरण · |
|---|---|
| दादा, आम दादा ओलातुन | आम्ही दादास पाहतो |
| काकण्या सासो | त्याने आमचे ' काकण ' सोडावे ! |
| दोई, आम दोई ओलातुन | आम्ही आमच्या आजीकडे आशेने |
| काकण्या सासो | पाहतो ! तिने आमचे ' काकण ' सोडावे |
| | व आम्हाला बंधनमुक्त करावे ! |

त्यानंतर रात्री होणाऱ्या नाचगाण्यांतही नकली लग्न लावले जाते व त्यात नवरदेव-नवरीच्या या ' कंकणा'वर विनोद होतो. अशा प्रकारचे एक गीत—

| कोलामी | मराठीकरण |
|---|---|
| उमुरका पोराका | आवळीचा पाला-- |
| आम बाबू पाराकान | आमचा बाबू पोटावर ( घासत ) चाले ! |
| आम बाबू ओलाने | आमचा बाबू ( नवरदेव ) पाहतो ( व म्हणतो- ) |
| काकण्या सास्यु रे | " हाताची काकणं सोडा हो ! " |

### लग्नतिथीची रात्र

लग्नाच्या दिवशी रात्रभर लग्नमंडपात नृत्ये आणि गाणी यांचा कार्यक्रम चालतो. काहीजण आळीपाळीने डफ-पावे वाजवितात व इतर कोलाम ( दारूबंदी नसल्यास— ) दारू घेऊन नृत्यात सामील होतात. आता दारू कमी झाली असली तरी पूर्वी मनसोक्त दारू पिणे हा लग्नाच्या पहिल्या दिवशीच्या रात्रीचा एक विशेष भाग असे.

या रात्री वरवधूंनी जागले पाहिजे अशी सर्वांचीच इच्छा असल्यामुळे त्यांना रात्रभर जागे ठेवले जाते. इतर लोक त्यांना झोपूच देत नाहीत. त्यांनी हवे तर दिवसा मनसोक्त झोप घेत जावी, पण लग्नात सर्वच रात्री त्यांनी जागून काढाव्या व नृत्यांचे हे कार्यक्रम अवलोकन करावे अशी सर्वांचीच अपेक्षा असते. वरवधू झोपले तर चिंधीचा काकडा पेटवून त्यांच्या हातापायास चटका देतात आणि त्या तऱ्हेने त्यांना जागवतात. चिंधीचा टपोरा आणि जाडा काकडा लग्नात, आरतीत व इतर वेळा वापरणे हे तर कोलाम जमातीचे वैशिष्ट्यच आहे ! वरवधूच्या दिमतीला पाच कुमारिका असतात. त्याही त्या दोघांना झोपू देत नाहीत. मध्येमध्ये दोघांनाही उखाण्यात ' नावे घ्यावी ' लागतात. कोलामी भाषेत उखाण्याला ' सिटा ' असे म्हणतात. नवरदेवाच्या चीजवस्तू लांबविण्याचे आणि लपविण्याचे प्रकार होतात. त्या वस्तू एकदा गेल्या की दंड दिल्याशिवाय परत मिळत नाहीत. थट्टामस्करी होते, ती वेगळी !

त्यामुळे नवरदेव लाजतो ! हा प्रकार टाळण्यासाठी तरी नवरदेव जागे राहण्याचा प्रयत्न करतो. अशी वस्तू लपवली गेली तर नवरदेवाला दंड भरावा लागतोच; पण वधूच्या वस्तू चोरीला गेल्या तरीही दंड हा वरालाच भरावा लागतो. वधूच्याही वस्तू चोरीला जातात ! अर्थात वस्तू चोरण्याचा हा खेळ गंमत म्हणून मुद्दाम केला जातो. झोपल्यानंतरच नव्हे, तर इतर वेळी गाफिलपणातसुद्धा ह्या वस्तू चोरल्या जातात आणि तसे झाले तरी त्यांचा दंड वस्तू परत घेतांना नवऱ्या मुलासच भरावा लागतो.

ती सारी रात्र नकला, गाणी, नृत्ये इ. कार्यक्रमांमध्ये जाते. लुगडी नेसून काही पुरुष नाचतात. काही वेळा स्त्रियाही नाचतात. नाचतानाचता गाणी म्हटली जातात. त्यांपैकी बरीचशी गाणी कृतिपर व प्रहसनवजा असतात. अशा संवादात्मक गीतांमध्ये अधिक मौज येते.

## ‘ इतिहास ’

लग्नतिथीच्या रात्री जी गाणी, नृत्ये व संवाद होतात, त्यांमधून कोलामजीवनाची माहिती देण्यात येते. हे काम ‘ सोंगाड्या ’ किंवा ‘ वेताळक ’ करतो. कोलाम लोकांमध्ये ‘ इतिहास ’ या नावाने हा ‘ परिचय ’ परिचित आहे. कोलामांच्या नव्या वस्तीपासून तर व्यवसायादिकांपर्यंत या ‘ इतिहासा’त माहिती असते.

या ‘ इतिहासा’त प्रथम नवीन वस्ती वसविण्यासंबंधीची गीते होतात. कोलामांचा एक तांडा गावाच्या मुख्याकडे जातो आणि वस्ती व वाहितीसाठी जमीन मागतो. वस्तीची जागा धार्मिक विधी करून ठरविली जाते. मोरामदेवाची पूजा होते, देवी स्थापण्यात येते व नंतर वस्ती वसते. ( यासंबंधीचे वर्णन प्र. २ मध्ये पृ. ७६ ते ७८ वर आले आहे. ) हे वर्णन गाण्यांमध्ये गाऊन कृतिपर स्वरूपात सामुदायिक रीत्या दाखविले जाते. त्या गीतांमध्ये वस्ती वसल्यानंतर घरे कशी बांधली जातात, गवत आणण्याचा कार्यक्रम कसा होतो, लाकूडफाटा गोळा करून घरांची व्यवस्था कशी करण्यात येते, त्यासाठी बायामाणसे कशी राबतात व आनंदाने श्रम संपवितात इत्यादि भाग विस्ताराने येतो. कोलामांच्या या गीतरूप ‘ इतिहासा’त नंतर कोलामांच्या सर्व सणांची, देवांची व सणोत्सव साजरे करण्याची सोंगे येतात. कृतींसह कोलामांचे धार्मिक व सांस्कृतिक जीवन त्यावेळच्या गीतांमधून व नृत्यांमधून साकार होते. डोंगरातून जंगली वस्तू आणणे, त्या वस्तू आणतांना अडचणी येणे, तेथील डोंगरांना विविध नावे देणे, सुतार-लोहार यांच्याकडून आवश्यक ती कामे करवून घेणे इ. बाबीही या गाण्यांत असतात.

कोलामांच्या कृषिजीवनाचे संपूर्ण चित्र या गीतसंवादांमध्ये उभे करण्यात येते. नकला करून व गाणी गाऊन ते चित्रित केले जाते. शेतीची मशागत, पेरणी, गवत काढणे, पीक घेणे वगैरे साऱ्या कृषिवल-कृती त्यात रसभरित स्वरूपात रंगविण्यात येतात. कारुण्य, शांती व विनोद यांचा संगम या कृषिगीतांमध्ये होतो.

ही सर्व गीते कोलामी भाषेत असली तरी काही गीते गोंडी-कोलामी व काही गीते मराठी-कोलामी अशी संमिश्र स्वरूपाची असतात. मध्येमध्ये बरीचशी मराठी गीतेही येतात. एक नमुना पाहा--

हाती शिदोरी
डोईवर घागर
खांद्यावर कुऱ्हाड
कोण्या डोंगरी—
जाऊ वो बाय ?

लग्नाच्या या रात्री जी अनेक गीते गायली जातात, त्यांत बाजाराला जाण्याचे गाणे लांबलचक व रसभरित असे असते. बाजाराचे आकर्षण कोलामांना फार आहे. कारण यांची गावे डोंगरात असतात व बाजाराचे गाव यांना दूर पडते. त्या गावाच्या आठवडी बाजारातून यांना आठ दिवस पुरणारे जीवननिर्वाहाचे सामान आणावे लागते. बाजाराच्या या गीतात, बैलबंडी जुंपण्याच्या तयारीपासून तर सामान घेऊन परत घरी येण्यापर्यंतचे सारे व्यवहार संवादरूपाने वर्णिलेले असतात. बाजाराला जाणे, पानसुपारी खाणे, वस्तू घेणे अशा अनेक प्रक्रिया कृतिपर व गाण्यांसह होतात.

एकंदरीत, हे ' इतिहास 'प्रकरण मोठे आनंददायी असते. लग्नतिथीच्या रात्री होणाऱ्या गीतनृत्यांच्या कार्यक्रमांमध्ये कोलामजीवनातील महत्त्वाच्या अशा सर्वच घटनांची आठवण या निमित्ताने होऊन जाते. त्यामुळे स्वतःच्या जीवनपट साकार झाल्याचा आनंद कोलामांना होत असल्यास नवल नाही !

हा ' इतिहास ' लग्नप्रसंगी प्रामुख्याने होत असला तरी ' गावबांधणी ', ' मोहडोंबरी ' यांसारख्या कोलामांच्या सणांच्या वेळी रात्री गाणी व नृत्ये होतात, त्याही प्रसंगी ' इतिहास ' होतो. एवढेच की, लग्नाच्या रात्री तो पूर्णपणे, न सुटता होतो. इतर वेळी त्यातील काही भाग सुटतो. नृत्यगीताच्या रात्रीच्या कोणत्याही कार्यक्रमात हा ' इतिहास ' होतो व बरेचदा तीच ती गीते पुनरावृत्त होतात. तरीही नेहमीच असल्या कार्यक्रमांत रंग भरतो. कारण सोंग काढणारी माणसे अशा नेहमीच्या कार्यक्रमांसाठी तत्पर असतात व त्यांत ती तरबेज झालेली असतात.

## लग्नाचा दुसरा दिवस

कोलामांच्या लग्नात सामुदायिक स्नानांचा कार्यक्रम उत्साहाने पार पडतो. पाच गाडगी मांडून एक चौका तयार केला जातो. त्या गाडग्यांना सुताचे पाच वेढे मारतात. त्या सुताच्या आतल्या बाजूस ' पिढी ' टाकली जातात. वऱ्हाडात ह्या प्रकारास ' न्हाणुरा ' असा शब्द प्रचारात आहे. ' न्हाणुरा ' सकाळदुपारला केव्हाही बसतो. ह्या न्हाणुऱ्यात

सोयरेसोयरे जोडयाजोडयाने न्हाणले जातात. मुलामुलीकडील ' भाटवे ' ( = जावई ) असल्यास त्यांना या न्हाणुन्यात पहिला मान देऊन न्हायला बसवितात. न्हायला पतिपत्नीने जोडयानेच बसले पाहिजे, असा संकेत आहे. तसेच न्हाणाऱ्या लोकांनी हातास ' कंकण ' बांधले पाहिजे असा नियम आहे. एकाच वेळी वरवधूसह दोनदोन तीनतीन जोडया न्हाऊ शकतात! न्हातान्हाता ' नावे घेतली ' जातात. कपडे बदलवण्याच्या वेळी ' नाव घेतल्या'शिवाय धोतर वा लुगडे देतच नाहीत. नावे उखाण्यात घेण्याऐवजी बरेचदा फक्त पतीचे किंवा पत्नीचे नाव लाजून उच्चारले जाते.

सकाळी हा आंघोळीचा कार्यक्रम आटोपल्यानंतर लगेच जेवणाचा कार्यक्रम होतो. फराळपाण्यात वेळ न दवडता एकदम जेवण उरकणे या श्रमजीवी व कष्टकरी लोकांना सोयीचे वाटावे, यात नवल नाही. दुसऱ्या दिवशीचे हे जेवण ' गोड ' वा ' साधे ' नसते ! या जेवणात ' बकरा ' असतो. हे जेवण महत्त्वाचे मानले जाते.

लग्नाच्या या दुसऱ्या दिवशी अहेर देण्याघेण्याचे कार्यक्रम होतात. हे अहेर अगदी साधे व ऐपतीनुसार घेतलेले असतात. जाडेभरडे लुगडे, धोतर वा चोळीखण ह्याच वस्तू बहुतेक अहेरात आढळतात.

जेवणानंतर दुपारी पुन्हा डफ-पावे यांच्या नादावर नाचगाणे चालते व आनंद वाढविला जातो.

लग्नाच्या या दुसऱ्या दिवशी " चांगला स्वयंपाक ( मांसविरहित ) आम्ही करू. तुम्ही बकरा कापा " असे व्याहीव्याही आपसात बोलतात, तसेच ठरवितात आणि करतात. बकऱ्याचे जेवण रात्री करण्यात येते.

## ' तांबोळ '

दुसऱ्या दिवशी ' तांबोळ ' नावाचा महत्त्वाचा कार्यक्रम होतो. तांबोळ म्हणजे विडयांची पाने ठेवून वधू व तिच्या आईवडिलांना नवीन कपडे देणे ! हे कपडे वरपक्षाने द्यावयाचे असतात. वधूच्या आईला एक लुगडे ( ' आम्मापाट ' ) व बापाला धोतर ( ' वरघडी ' ) दिले जाते. धोतराच्या जोडीला एखादा पंचा वा पागोटे असते. वधूला लुगडे आणि खणचोळी देण्यात येते. खण देण्याची पद्धती अलीकडची आहे.

वधूला काही दागिने आधी साखरपुडयाच्या वेळी दिले जातात. ते त्यावेळी किंवा लग्न लागण्यापूर्वी दिले नसल्यास लग्नाच्या दुसऱ्या दिवशी तांबोळाच्या वेळी समारंभपूर्वक देण्यात येतात. वधूला दागिने घातलेच पाहिजेत असे बंधन नसले तरी ऐपतीप्रमाणे व रिवाज पाळण्याच्या हेतूने वरपक्षाचे लोक वधूसाठी पायांतील तोडे, जोडवी, हातांत पाटल्या, कोपरकडया व गळयात घालावयाची सरी इतके दागिने

करतात. अलीकडे कृत्रिम नथ दिसू लागली आहे. हे सर्व दागिने चांदीचेच असतात. सोने वापरतांना कोलाम दिसत नाहीत.

तांबोळाचे कपडे किंवा हे दागिने देण्यापूर्वी 'न्हाणुऱ्या'त बसवून वरवधू, तसेच वधूचे आईवडील यांना आंघोळ करण्यास भाग पाडतात. पतिपत्नीने जोडयाने आंघोळ केल्याशिवाय लग्नात आनंदच येत नाही, हा बध्यांचा समज! न्हायला बसणाऱ्या स्त्रीपुरुषांना हळद वगैरे लावली जाते. कोलाम बायका गीते गात असतात व बजवय्ये डफ-पावे वाजवितात.

सायंकाळी देण्यात येणारे 'बकऱ्याचे जेवण' हे तांबोळाचे जेवण मानले जाते. जेवणानंतर रात्री अत्यानंदाने बेहोश होऊन कोलाम लोक नाचगाण्यात व वाद्य-वादनात गर्क होतात. रात्रभर हा कार्यक्रम चालतो.

## लग्नाचा तिसरा व चौथा दिवस

लग्नाच्या तिसऱ्या दिवशी शक्यतेनुसार सकाळी चहापाणी व पानसुपारी होते; एरवी ते न होता एकदम दहा वाजण्याच्या सुमारास भोजनाचा कार्यक्रम होतो.

या दिवशी दुपारी (किंवा शक्यतेनुसार सकाळी) 'पोस्त' नावाचा एक कार्यक्रम होतो. या कार्यक्रमाच्या वेळीं नवरदेवाकडील लोक सर्वांना फुटाणे वाटतात. पूर्वी वधूवरांना यावेळी दारू पाजीत असत. आता दारूऐवजी गुळाचे पाणी पाजतात. वधू ही वराला व वर हा वधूला एकेक पैसा देतो. ते एकमेकांना म्हणतात—'एक रुपयाची दारू दे!'

एक पैशालाच एक रुपया म्हटले जाते. कारण तो एक खेळच असतो. वर-वधू-प्रमाणेच १०–१५ जण वरवधूला एकेक पैसा देऊन वरीलप्रमाणे दारूची मागणी करतात. त्या प्रत्येकाजवळून एकेक पैसा घेऊन वरवधू थोडे गुळाचे पाणी त्या लोकांना देतात किंवा देण्याची नक्कल करतात.

अशा तऱ्हेने हा 'पोस्त' कार्यक्रम संपल्यावर आधी वाटण्यात आलेले फुटाणे सर्व कोलाम लोक चघळू लागतात.

वर हा वधूला कडेवर घेऊन सायंकाळीं चारच्या सुमारास बोहोल्याभोवती पाच वेळा फेरे घालतो. त्यावेळी विनोदाने आजूबाजूचे लोक वरवधूच्या अंगावर पाणी व रंग, फार काय चिखलसुद्धा फेकतात. चिखल फेकणे आता काहीसे कमी झाले आहे. पाणी मात्र भरपूर व मनमाने फेकले जाते.

लग्नाचा चौथा दिवस साधारणतः पूर्वीच्या स्नानभोजनादि कार्यक्रमांनी आवृत्त होतो किंवा तिसऱ्या दिवशी लग्न उरकल्यास चौथा दिवस उरतच नाही. पूर्वी पाचपाच

दिवस लग्नात घालविण्याचा नियम कटाक्षाने पाळत असत. आता कुठेकुठे एकदोन दिवस कमी करण्यात येतात.

## पाचवा दिवस

लग्नाचा हा शेवटचा दिवस असतो. हाही दिवस धडाकेबाज पद्धतीनेच पार पडतो. जर लग्न तीन किंवा चार दिवसांत आटोपले तर या पाचव्या दिवशीचे कार्यक्रम त्या तीन किंवा चार दिवसांतच पार पाडले जातात. परंतु असे फार कमी वेळा होते. पाच दिवस लग्न साजरे करण्याच्या कोलामांच्या हौसेला कात्री लागल्याचे एकंदरीत कमीच आढळते. त्यामुळे पाचव्या दिवसाच्या रंगातही न्यूनता येत नाही.

कोलामांच्या लग्नात पाचव्या दिवशी ' महादेवाची काठी ' करतात. ' महादेवाची काठी ' म्हणजे एक लांब बासा वा कमी जाड असलेली उंच बल्ली ! तिला शेंदूर लावून त्याच रंगाचे फडके लपेटतात. खाली एकप्रकारे शंकरासारखी मूर्ती काठीसच तयार करतात किंवा कपड्यालाच एकप्रकारे तसा आकार आणतात. ही ' काठी ' आदिवासीं-पैकी गोवारी जमातीत दिवाळीच्या दिवसांत व महाशिवरात्रीला अतिशय पूज्य मानून मिरविली जाते. गोवाऱ्यांची ही ' काठी ' कोलामांच्या लग्नात आढळते; याउलट कोलाम हे गोवाऱ्यांच्या लग्नात डफ-पावे वाजविणारे बजवय्ये असतात. त्यावेळी त्या कोलामांना ' नाईक ' म्हणून संबोधतात. यांच्या वाद्यांशिवाय गोवाऱ्याची लग्ने लागत नाहीत ! कोलामांच्या लग्नाच्या शेवटच्या दिवशी ' महादेवाची काठी ' नदीवर किंवा विहिरीवर ठेवण्यात येते. तिला आणायला डफ-पावे वाजवीत वधूवरांसह कोलाम लोक जातात. काही कोलाम नाचतनाचत जातात व नाचतनाचत ' महादेवाची काठी ' घेऊन येतात. या ' महादेवाच्या काठी'वर कोलाम लोक एकएक पैसा फेकतात आणि ते पैसे, नाचणारे कोलाम नाचतानाचताच गोळा करतात. मांडवात परत आल्यावर नाचणारे आणखी एकदोन तास नाचत राहतात. बजवय्यांचे डफ आणि पावे वाजविण्याचे काम जोरात सुरू असते. हा कार्यक्रम संपल्यावर ' महादेवाची काठी ' परत नेऊन सोडून ठेवतात.

## पाठवणीचा प्रसंग

लग्नासाठी वधू ही वराकडे ' पर्णू ' गेलेली असते. पाच दिवसांनंतर वधूवर वधूच्या घरी येतात. येथील सोपस्कार कमीच असतात. जेवणखाण, आदरसत्कार इ. कार्यक्रम होतात.

लग्न जवळजवळ संपलेले असते. आता मुलीला पतीकडे नांदायला पाठवायचे असते. त्या निमित्ताने दुपारी एक कार्यक्रम होतो. वधूला गावाच्या बांधावर वा ' गाव-बांधणी'च्या हद्दीवर नेतात. तेथून ती पित्याच्या घरी परत येण्याची धडपड करते.

परंतु सवाष्णी तिला परत तिकडेच ढकलतात. त्यातून त्या सवाष्णी वधूला जणू हेच सांगतात, " आता तू आमच्या गावात राहण्याचा मोह कशाला करतेस? दिल्या घरी जा व सुखी राहा." परंतु माया मोठी विचित्र! ती मुलगी परतपरत बांधाच्या अलीकडे येऊ पाहते. थकेपावेतो ती आपले प्रयत्न सोडीत नाही. परंतु सवाष्णी तिला येऊ देत नाहीत. तिला त्या बाया बांधाच्या पल्याड पुनःपुनः पोचवितात. वधूला पाडण्याचा किंवा बांधावरून घसरविण्याचा त्या बायका बुद्धिपुरस्सर प्रयत्न करतात. पण नवरी मुलगी तोल सावरते; पडत नाही. जर ती पडली तर दंड म्हणून त्या बायकांना ती काही पैसे देते. जर ती पडली नाही, तर तिजकडून दंड घेण्याचा प्रश्नच उरत नाही. नवरीस दंड झाला तर दंडाची रक्कम मात्र प्रत्यक्ष वरालाच भरावी लागते.

साधारणतः कार्यक्रम संपत आल्यावर, वधू ऐकतच नाही असे पाहून आणि तिला पाडण्यात स्त्रिया यशस्वी होत नाहीत हे बघून नवरदेव तिचा हात धरतो व 'चल' म्हणतो. ती झटका देऊन नवरदेवाच्या हातातून आपला हात सोडविते. परंतु शेवटी नवरदेव तिला एका झटक्यात उचलतो व आपल्या कडेवर बसवितो आणि आपल्या गावाकडे निघालेल्या मंडळीमध्ये तिला नेऊन ठेवतो.

वरील कार्यक्रम संपतो. सुमारे अडीचतीन वाजतात किंवा तिसरा प्रहर होतो. मुलामुलीचे आईवडील वरवधूच्या अंगावरून अक्षता ओवाळून फेकतात. त्यावेळी मुलगी जोराने रडते. मुलीचे आईवडीलही रडतात. कारण मुलगी आता सासरी जायला निघते!

शेवटी नवरदेव हा वधूला कडेवर घेऊन वधूच्या आईबापाच्या घरातील मांडवा-मधल्या बोहोल्याला पाच वेढे घालतो व मांडवाबाहेर पडतो. तो जाऊ लागतो. निरोप दिले जातात. डोळे पाणावतात. मुलगी रडते. मुलीचे आईवडील रडतात व त्या गावाचे लोकही रडतात. मुलाकडील म्हातारे लोक झपाझप आपल्या गावाकडे चालू लागतात. मुलाकडील इतर लोक मागे जाऊ लागतात. त्या वाटचालीचा वेग वाढतो व मुलीकडील लोक पाणावलेल्या डोळ्यांना पदर वा दुपट्टा लावीत तोंडे परत वळवितात. मुलीचा मांडव अगदी सुनासुना होतो!

## लग्नानंतरचा पहिला बाजार

लग्न आटोपल्यानंतर येणारा पहिला बाजार नवविवाहित जोडप्यास मिळून करावयास लावतात. बाजाराच्या गावी (किंवा गावातच बाजार असल्यास तेथे) दोघांनाही मिळून पाठवितात. त्यांच्यासोबत दोन सुवासिनी पाठविण्याची व्यवस्था करतात. त्यांच्यात नवरा मुलगा वगळला तर पुरुष कुणीही नसतो. ते सर्वजण बाजारात गेल्यावर विकत घेतलेल्या वस्तूंचे पैसे नवरा मुलगा देतो. सोबतच्या सुवासिनी वस्तू विकत घेतात आणि नवरी मुलगी त्या वस्तू नवऱ्याच्या उपरण्यात बांधते.

अशा या कार्यक्रमामधून नवविवाहितांना एकप्रकारे जीवनशिक्षणच मिळते. बाजारातून भाजीपाला, गूळ, तेल, ज्वारी, मीठ, मिरची अशा आवश्यक वस्तूच या कार्यक्रमाच्या निमित्ताने खरेदी करून आणल्या जातात.

आजकाल हा कार्यक्रम काही कुटुंबांमध्ये खऱ्या रीतीने होतो; तर काही कुटुंबांमध्ये तो कृत्रिमरीत्या पार पडतो. लग्नाच्या शेवटच्या दिवसाला किंवा त्यानंतर लगेच मुलाच्या गावी एक छोटा बाजार गंमत म्हणून खेळाच्या स्वरूपात भरविला जातो. तो बाजार वर आणि वधू यांना नेऊन दाखवितात. खेळ आणि गंमत म्हणून वस्तू घेण्याचे व्यवहार वरवधूकडून करवून घेतात.

**आंदण**

मुलीचा बाप आपल्या मुलीच्या जीवनास उपयोगी पडण्यासाठी म्हणून लग्नानंतर पाचपंधरा दिवसांनी किंवा लवकरच सोयीप्रमाणे काही वस्तू भेटीदाखल आंदण म्हणून बहुधा देतो. मुलीच्या बापाकडे गाय असल्यास ती देण्यात येते. परंतु ती नसल्यास एखादी बकरी आंदणात देण्याची पद्धती आहे.

**‘ शांतिक ’**

‘ शांतिक ’ म्हणजे गर्भाधानसमारंभ ! नवरी उपवर झालेलीच असेल तर लग्नानंतर पाचपंधरा दिवसांनी ‘ शांतिक ’ होते. उपवर झालेली नसेल तर ती ऋतुस्नात झाल्यावर पहिल्याच महिन्यात हा विधी उरकण्यात येतो.

लग्नाप्रमाणेच पाच दिवसपर्यंत हाही विधी चालतो. पाच दिवस नाच, गाणी इ. कार्यक्रम धडाक्याने चालतात. ह्या पाच दिवसांत मुलीचे तोंड कुणालाच दिसू नये, याची व्यवस्था करतात. जवळजवळ त्या पाच दिवसांत ती नवरी मुलगी एकांतातच असते. नवरा मुलगा त्या पाच दिवसात तिच्याशी बोलत नाही. चिलीम आणि चुट्टा या जातीत अतिशय प्रिय असूनही त्या पाच दिवसांत नवऱ्या मुलाने चिलीम चुट्टा न ओढता व्रतस्थ राहावे, असा कटाक्ष असतो.

‘ शांतिका’चा कार्यक्रम लपवून ठेवला जात नाही. तो सर्वांना कळावा या हेतूनेच वस्तीत तीळगूळ व खोबरं यांची सेरणी ( प्रसाद ) वाटली जाते. आपल्या घरी ‘ शांतिक ’ होत आहे याचा बोलबाला वस्तीत व्हावा, या उद्देशानेच वस्तीतील जातभाईंना सेरणी वाटण्याबाबत एवढा उत्साह दाखविला जातो.

कमगर्जी कोलामांची शेज ती काय ? पांघरायला एखादे धोतर-लुगडे आणि अंथरायला फक्त तरटाची दोन पोती हेच अंथरूणपांघरूण या शेजेसाठी असते. नाहीतरी, कोलामांच्या एरवीच्या झोपण्यासाठीही हेच अंथरूण-पांघरूण असते. सरावाने थंडी, ऊन, वारा यांपासून संरक्षण करण्याची व ह्या गोष्टी सहन करण्याची सवय या लोकांना झालेली असते !

३ : :

## पुनर्विवाह ( पाट )

कोलामांमध्ये ' पाट ' होतो. ' पाट ' म्हणजे मोघमपणे पुनर्विवाह ! स्त्रीचा नवरा मेला व तिने दुसरा विवाह विशिष्ट पद्धतीने केला की तो ' पाट ' ठरतो ! यालाच ' गंधर्व-विवाह ' असे म्हणतात. ' लग्न ' हा शब्द मात्र ' पाटा 'स लावता येत नाही.

कोलाम विधवेला किंवा परित्यक्तेला ( किंवा जिने नवरा सोडला असेल तिलासुद्धा ) ' पाटा'चा अधिकार आहे. ती पुन्हा ' लग्न ' करू शकत नाही; पण ' पाट ' लावू शकते. स्त्रीची दोन लग्ने होतच नाहीत, हा कोलामांच्या लग्नसंदर्भातील नियम आहे. कोलाम स्त्रीचे पहिले लग्न रीतिरिवाजाप्रमाणे व्यवस्थित होते; परंतु तिचा नवरा मेला किंवा नवऱ्याने तिला टाकले म्हणजे ती घटस्फोटित असली तर ती दुसऱ्या पुरुषाशी ' पाट ' लावते व त्याची पत्नी म्हणून त्याच्या घरात नांदते. परंतु ह्यास ' लग्न ' म्हणत नाहीत. मुलीचे दुसऱ्यांदा लग्न होत नसले व तिचा ' पाट'च होऊ शकत असला तरी मुलाचे मात्र दुसऱ्यादा लग्नही होऊ शकते. म्हणजे, मुलाची पत्नी मेली किंवा त्याने आपली पत्नी सोडली तर त्याचे पुन्हा लग्न होऊ शकते व तेही कुमारिकेशी !

कोलाम विधवेला, परित्यक्तेला किंवा घटस्फोटितेला एखादा विधुर कोलाम पसंत पडला तर ती त्याच्या घरात पाण्याने भरलेली घागर घेऊन प्रवेश करते. डोईवर पाण्याची घागर घेतलेल्या ह्या स्त्रीला तो कोलाम बाहेर घालवू शकत नाही. दोघेही कोलाम-धर्माप्रमाणे पतिपत्नी म्हणून नांदू लागतात. अशा पुनर्विवाहास कोलामांची पूर्ण संमती असते ह्या प्रकाराची माहिती डॉ. इरावती कर्वे यांनी अशी दिली आहे:– ' विधवेने विधुराशीच लग्न केले पाहिजे असा दंडक आहे. एखाद्या बाईला एखादा पुरुष आवडला तर ती त्याच्या घरात शिरून बसते व त्याच्याबरोबर संसार करू लागते. हाच प्रकार एलविनने गोंडांबद्दल नमूद केलेला आहे. ( आपल्या मराठी वाङ्मयात " घरघुसी-शी " असा शब्द ज्ञानेश्वरांपासून सापडतो. तो असल्याच प्रघाताचा तर द्योतक नसेलना ?[१] ) "

पुनर्विवाहासाठी पुरुषाला साळी ( = मेव्हणी, बायकोची लहान बहीण ) चालत नाही. तिला वगळून इतर कोलाम–कुमारिका, परित्यक्ता, घटस्फोटिता वा विधवा

---

१. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. ११०

यांपैकी कुणाशीही तो पुनर्विवाह किंवा लग्न करू शकतो. (कुमारिकेशी लग्न आणि इतर स्त्रियांशी 'पाट.') अलीकडे मात्र साळीशी 'पाट' लावण्याची प्रथा पडू लागली असून विधवा स्त्रिया घरातील वयस्कर व्यक्तींच्या संमतीने 'पाट' लावतांना आढळतात.

## घटस्फोट (सोडमोकळीक)

बहुधा बायको ही नवऱ्याला आपणहून सोडत नाही. भारतात प्रायः ही प्रक्रिया पतीकडूनच घडते. अर्थात पती वेडा, बाहेरख्याली किंवा नपुंसक असला तर पत्नी स्वतःहून घटस्फोट घ्यायला तयार होते. कोलामांमध्येही असेच दिसून येते. पत्नीचा दोष कधीच नसतो, असे म्हणता येणार नाही. पण तिचा दोष असला तरी ती स्वतःहून फारकत घेत नाही.

साधारणतः मुलीस पतिगृही नांदविण्याच्या विरुद्ध तिचे आईवडील असले किंवा मातृगृहीचे नातेवाईकच त्या कलाचे असले तर ते तिला 'फंद' देतात. ह्या 'फंद' देण्यामुळे (= बदसल्ला देऊन तसे वागावयास उत्तेजन दिल्यामुळे) मुलगी नवऱ्याकडे नीट नांदत नाही. याचा राग पतीस येतो व तिला तो 'काडीमोड' देतो.

काही वेळा पतीला आपली पत्नी नकोशी होते. त्याला कारणेही असतात. ती त्याच्यापेक्षा मोठी असणे व तिचे 'मोठेपण' त्याला नको असणे, पत्नी बाहेरख्याली असणे, तिने घरात नीट न नांदणे ह्या कारणांबरोबरच पतीला स्वतःला बाहेरख्यालीपणा करण्यास वाव व मोकळीक मिळावी ह्यासाठीही पुरुष पत्नीला घटस्फोट देतो. प्रमुखतया अशीच कारणे कोलामांतही आढळतात. यावरून, या समाजाच्या माथी अनीतीचा किंवा असंस्कृतपणाचा शिक्का मारणे मात्र गैर होईल. कारण सर्वच समाजांमध्ये हे घडते. तसेच, सर्वत्र घटस्फोट फारच कमी होतात; आणि अपवादांना नियमांचे रूप कधीच येऊ शकत नाही; येऊ नये! बायको किंवा नवरा सोडणे हे कुठेच प्रतिष्ठेचे समजले जात नाही. प्राचीन काळापासून परंपरेने चालणाऱ्या पापभीरू कोलामांनासुद्धा घटस्फोट अप्रतिष्ठेचेच वाटतात!

पत्नीत्यागाच्या कारणांमध्ये बरेचदा पत्नीचे व्यभिचारी दुर्वर्तन, वांझपणा, विश्वासघात आणि भांडकुदळ स्वभाव ही वास्तव कारणे आढळतात.

कोलामांमध्ये नवऱ्याला आपली बायको सोडायची असेल तर तो तिला मारझोड करून घरात राहणे अशक्य करून सोडतो. नंतर, नीट नांदत नाही ह्या दिखाऊ कारणाचा आधार घेऊन तिला तिच्या आईबापाकडे पोचती करतो. कधीकधी तर अर्ध्या वाटेवरच तिला सोडून देतो व आपण घरी परत येतो.

पती न्यायला येईल या आशेवर कोलाम स्त्री सुमारे एक वर्षभर वाट पाहते. परंतु नंतरही तो येतच नाही असे दिसले तर ती 'पाट' लावते. तसे करण्यापूर्वी

तिचे आईवडील तिच्या पतीला बोलावणे धाडतात. तो आला तर त्याला "आमच्या मुलीला सोडमोकळीक दे" असे सांगतात. तो सरळ असला तर पटकन 'सोड-मोकळीक' देतो. ही 'फारकत' कोलामांच्या जातपंचांसमोर द्यावी लागते. परंतु, अशी जाहीर सोडचिठ्ठी दिल्यामुळे समाज आपल्याला नपुंसक ठरवील ह्या लोकलज्जेच्या भावनेस्तव भिऊन नवरा पंचायतीसमोर येतच नाही. तो न आल्यास पंचांच्या व इतरांच्या साक्षीने मुलीचा मार्ग आपोआपच मोकळा होतो व इच्छा असल्यास नंतर ती 'पाट' लावू शकते.

नवरा किंवा बायको यांना 'सोडमोकळीक' देण्याची एक गमतीदार पद्धती कोलामांमध्ये आहे. नवरा धीटपणे पंचायतीसमोर आला तरच हा कार्यक्रम होऊ शकतो. काडीमोड घ्यायला तयार झालेले जोडपे दारूचा भरलेला पेला घेऊन कोलामांच्या जातपंचायतीकडे येते. त्या पेल्यावर एक आडवी काडी ठेवलेली असते. त्या काडीची दोन टोके दोन बाजूंनी ते नवराबायको पंचांसमोर धरतात. काडी धरून बायको नवऱ्यास म्हणते, "आजपासून तू माझा भाऊ आहेस." तसेच नवरा बायकोला म्हणतो, "आजपासून तू माझी बहीण आहेस." एवढे शब्द उच्चारून झाले की दोघेही ती काडी सर्वांसमोर मोडतात! म्हणजे झाला 'काडीमोड'! 'काडीमोड' या शब्दाचा अक्षरशः इतका समर्पक असा अर्थ आढळेल काय? या पद्धतीमुळे उभय पक्षांत कटुता येत नाही.

या कार्यक्रमाच्या शेवटी पेल्यातील दारू पंचमंडळी फस्त करते. हल्ली दारू-बंदीच्या काळात दारूऐवजी गुळाच्या पाण्याने पेला भरून घटस्फोटाचा कार्यक्रम साजरा होतो.

ह्या कार्यक्रमानंतर घटस्फोटित पतिपत्नी दुसऱ्या विवाहास ( स्त्री फक्त 'पाटा'स) किंवा 'पाटा'स मोकळे असतात.

卐 卐 卐

१ : :

# धर्म

कोणताही कोलाम स्वतःचा धर्म हिंदू असल्याचे सांगतो. अर्थात कोलामांचा धर्म हिंदूच आहे, हे निर्विवाद ! परंपरेने चालत आलेल्या अनेक रूढ्या व चालीरीती यांच्याद्वारा कोलामांचा जो धर्म प्रकट होतो त्याचे स्वरूप हिंदू धर्मापेक्षा वेगळे नाही. कोलामांमधील रूढी, परंपरा, विधी, देवदेवता, सणवार, मूर्तिपूजा, लग्नपद्धती इ. अनेक बाबींमुळे कोलामांचा धर्म हिंदू असल्याचे स्पष्ट आहे. नाककान टोचणे ही हिंदूंमधील क्रिया कोलामांत प्रत्येकाच्या बाबतीत न चुकता केली जाते. हिंदू म्हणून ओळखण्याचे हे व्यवहारी रूप आहे, हे सर्वविदित आहेच !

'हिंदू' हा शब्द येथे मोघमपणे वापरला आहे. शंकराचार्यप्रणीत किंवा त्यांच्याही पूर्वीचा सनातन आर्य धर्म यांपैकी कोणताही एक विशिष्ट असा हिंदू धर्म असे येथे म्हणावयाचे नाही. आर्यांच्याही अगोदरचे एतद्देशीय असे आदिवासी ज्या तऱ्हेचा हिंदू धर्म आज आचारतात त्या तऱ्हेचा हिंदू धर्म कोलामांमध्ये प्रचलित आहे; आणि एवढ्याच मोघम अर्थाने कोलामांचा धर्म हिंदू असल्याचे वरील विधान करण्यात आले आहे.

' मोघम ' असे म्हणण्याचे प्रमुख असे कारण हे आहे की, हिंदू धर्मात न आढळणाऱ्या परंतु आदिवासींच्या संस्कृतीत आढळू शकणाऱ्या अनेक रूढी व परंपरा, तसेच देवदेवता कोलामांत आढळतात. प्रचलित हिंदू धर्माहून आदिकाळातील

आदिवासींच्या धर्माचे स्वरूप काहीसे आगळे आणि प्राचीन असणारच! कोलामही ह्याला अपवाद नाहीत.

## धर्मांतर

सनातन, रूढ व पारंपरिक स्वधर्म कोलामांनी जपून ठेवला आहे. त्यावर त्यांची अमाप निष्ठा आहे. स्वतःच्या देवदेवता व रूढी यांच्यावर कोलामांची अपार श्रद्धा आहे. त्यामुळेच कोलामांमध्ये धर्मांतर केल्याची वा करण्याची उदाहरणे नाहीत. गोंडांमध्ये जसे धर्मांतरित लोक आढळतात; तसे कोलामांमध्ये आढळत नाहीत. नवबौद्ध आणि मुसलमान यांच्या लाटेत कोलाम धर्मांतरित झाल्याची उदाहरणे नाहीत.

ख्रिस्ती धर्मप्रचारक आदिवासींपर्यंत पोहचले व त्यांनी अर्थसाह्य आणि दवापाणी यांच्यायोगे आदिवासींना आत्मसात करण्याचे प्रयत्न केले असले तरी कोलामांपैकी एखादाही माणूस धर्मांतर करून खिश्चन झाल्याचे पाहण्यात आले नाही. कोलामांच्या वस्तीत जाऊन ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी प्रचार केला व आमिषे दाखविली. परंतु कोलामांनी आपल्या जीवनाची रूढ चाकोरी धर्माच्या बाबतीत मुळीच सोडली नाही. कोलामांवर रूढ धर्माचा कमालीचा प्रभाव असल्यामुळे आपले जुने काहीही सोडायला त्यांचे मन सहसा तयार होत नाही.

कोलामांपैकी कुणीच धर्मांतर केले नाही, असे भेटलेल्या एकूणएक कोलामांनी सांगितले असले तरी यवतमाळ येथील ख्रिस्ती धर्मसंस्थेमध्ये ३०-३५ कोलाम धर्मांतरित असल्याचे एका ख्रिस्ती पदवीधराने सांगितले. हा आकडा खरा नसावा, असे प्रथमच वाटले. प्रत्यक्षात माहिती काढली तेव्हा तेथे १५-२० कोलाम ख्रिस्ती झाल्याची माहिती मिळाली. परंतु ही संख्या धर्मांतर करून झालेली नाही; तर वाममार्गाने जन्मलेल्या कोलाम मुलांना ख्रिस्ती धर्मसंस्थेने आश्रय दिल्यामुळे कोलाम-ख्रिस्त्यांची वरील संख्या तेथे तयार झाली आहे. आडमार्गाने जन्मलेल्या मुलांना कोलाम स्वजातीत घेत नाहीत आणि घेतले तरी त्यांची उपेक्षाच होते. ही स्थिती हिंदू धर्मातील सर्वच जातींत आहे. तेव्हा यवतमाळ येथील ख्रिस्ती धर्मसंस्थेमधील कोलाम प्रत्यक्ष धर्मांतर करून ख्रिस्ती झाले नसून परिस्थिती व लाचारी यांतून ही प्रक्रिया घडली आहे, हे स्पष्ट आहे. कोणत्याही धर्मांतरित ख्रिस्त्याने आपण पूर्वाश्रमीचे कोलाम असल्याचे सांगितले नाही.

कोलाम असलेल्या बहुतेक गावांच्या मुख्यांना 'धर्मांतर करणारे कुणी कोलाम आढळले काय?-' असा प्रश्न विचारण्यात आला तेव्हा एक वगळून बाकी सर्वांनी नकारार्थीच उत्तर दिले. फक्त घोडदरा येथील एका कोलामाकडून या बाबतीत निराळे उत्तर आले. परंतु तेही उत्तर निश्चयात्मक नाही. 'आमच्या येथे धर्मांतर करणारे कोलाम मिळू शकतील' असे ते उत्तर आहे. उमरी (ता. केळापूर) येथे ख्रिस्ती

मिशनऱ्यांनी चालविलेला फार मोठा दवाखाना आहे. मिशनऱ्यांचे कार्य त्या भागात चालू असते. त्या भागात आदिवासींची संख्या बरीच असून कोलामही अधिक आहेत. ' घोडदरा येथील कोणत्या कोलामाने आणि केव्हा धर्मांतर केले ? ' असा प्रश्न विचारला असता, त्याबद्दल निश्चित माहिती कोलामही देऊ शकले नाहीत. वामाचारातून जन्मलेली मुले खिश्चनांनी नेली, यालाच घोडदरा येथील कोलाम ' धर्मांतर ' म्हणतात असे दिसले.

या सर्व माहितीवरून असे साधार वाटते की, कोलामांनी धर्मांतर केल्याचे उदाहरण नाही. ते आपल्या सनातन रूढ धर्मरिवाजांना पक्केपणी चिकटून आहेत, हेच खरे !

१९६१ च्या शिरगणतीत धर्मांतरित अशा एकाही कोलामाची नोंद नाही.

**कोलाम स्त्रिया आणि धर्मांतर** ( ? )

क्वचित एखाद्या गावी एखादी कोलाम स्त्री मुसलमानाचे ' घर निघते ' व त्याची रखेली म्हणून राहते. तिची संतती अर्थातच कोलाम ठरत नाही. परंतु ह्या स्त्रीला धर्मांतरित ठरवावे काय, हा प्रश्न आहे. ती स्त्री स्वतःच्या दारिद्र्यातून निर्माण होणाऱ्या मोहाने बरेचदा त्या मुसलमानाकडे जाते, ही वास्तवता लक्ष्यात घेणे आवश्यक आहे.

हा ' घर निघण्याचा ' प्रकार फक्त मुसलमानांच्याच संदर्भात घडू शकतो. मुस्लीम संस्कृतीने हिंदुस्थानात जे मूळ धरले, त्यामुळे हिंदुमुसलमानांचे जवळचे संबंध निर्माण झाले व बऱ्याच धर्मरिवाजांची देवाणघेवाणही झाली. परिणामतः हिंदू धर्मामधील कितीतरी जातींतील स्त्रियांनी मुसलमानांचे रखेलीपण क्वचित का होईना पण पत्करले. कोलाम जातीतील स्त्रियांचाही अपवाद या संदर्भात राहिला नाही, एवढेच फार तर म्हणता येईल.

## २ : :

## देव

देवावर असीम श्रद्धा ठेवण्यात कोलाम लोक तिळमात्र कमी नाहीत. ' देवाशिवाय देह नाही आणि दुनियाही नाही ' हे कोलामांच्या जीवनात व मनात पक्के

बिंबलेले आहे. असे असतांना डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी ( हिरालाल व रसेल यांच्या आधारे–) 'ज्ञानकोशात'त दिलेल्या माहितीत 'हे लोक जगाचा उत्पादक व रक्षणकर्ता कोणी देव आहे असे मानीत नाहीत'[1] असे जे विधान केले आहे, ते बरोबर वाटत नाही. पूर्वोक्त माहितीत उपर्युक्त विधानाचा अधिक खुलासा नसल्यामुळे ह्या माहितीत अपूर्णता व अस्पष्टता राहिलेली आहे. तेथे नेमके काय म्हणावयाचे आहे, ते त्या वाक्यावरून स्पष्ट होत नाही. 'देवीला हे लोक मानतात, देवाला नाही, असे तर तेथे म्हणावयाचे नाही ना? वस्तुस्थिती वेगळीं असून कोलाम लोक देवीव्यतिरिक्त इतर देवतांनाही मानतात. त्या देवतांमध्ये देव आणि देवी या दोहोंचा समावेश आहे. कोलामी भाषेत 'देव' या शब्दासाठी 'दियाम' आणि 'अय्याक' असे शब्दही रूढ आहेत. केतकर, हिरालाल, रसेल यांच्या काळीं याबाबत पूर्ण माहिती मिळाली नसणे शक्य आहे. कोलामांमध्ये देवार्चन आणि देवपूजा यांविषयी ज्या नाना रीती आहेत, त्यांवरही वरील विधान आधारलेले असू शकते. झाडे, लाकडे व दगडधोंडे यांना पूजणारे कोलाम ईश्वराच्या अतर्क्य, निर्गुण, निराकार अशा स्वरूपास जाणत नाहीत, असा अर्थ गृहीत धरून तर ते विधान करण्यात आले नाही ना?

माझ्या मते, वरील विधानाचा शब्दशः अर्थ घेतल्यास ते अगदीच चुकीचे आहे. कोलामांना ईश्वरविषयक मोठे तत्त्वज्ञान बोलता येत नाही. ईश्वराच्या अनाकलनीय व्यापारांची चर्चा त्यांना करता येत नाही. त्यामुळे सृष्टीचा उत्पादक देव आहे व रक्षणकर्ताही तोच आहे, हे त्यांना वाणीने व्यक्त करता येणे शक्य नाही. पण म्हणून, जगाला देवाने निर्मिले नाही किंवा देव जगाला पोशीत नाही असे कोलामांना वाटते, असे मुळींच नाही. कोलामांची श्रद्धा अशीच आहे की, जगात सारे काही देवामुळेच घडते आणि देवानेच हे सारे काही घडविले आहे. तेव्हा, उक्त विधानास आधार नसून त्यात तथ्यही नाही.

याउलट, आपल्या देवदेवतांच्या पूजेअर्चेचे रूढ नियम पाळण्याच्या बाबतीत कोलाम अगदी कट्टर आहेत. देवांशी त्यांचे जीवन भावनेने, श्रद्धेने आणि निष्ठेने निगडित झालेले आहे. देवदेवतांचे रूढ नियम आणि देवदेवतांचे सणोत्सव पाळलेच पाहिजेत, या मताची संपूर्ण कोलाम जमात आहे.

केवळ आपल्या देवदेवतांचे वेगळे महात्म्य कायम टिकावे, त्यांचे पावित्र्य संरक्षावे व इतरांच्या देवदेवतांशी तडजोडीच्या स्वरूपात सरमिसळ होण्याचे टाळावे

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४; ही माहिती रसेल हिरालाल यांनी, कमिश्नर कर्नल मॅकेन्झी ह्यांनी यवतमाळ गॅझेटियरसाठी तयार केलेल्या टिपणांच्या आधारे दिली आहे. ( The Tribes and Castes of the Central Provinces of India—By Russel and Hira Lal, Vol. III, 1916 ). पृ. ५२३

या धोरणाने कोलामांच्या वस्तीची स्थाने गावांपासून अलग राहिली. गावांजवळ राहूनही गावांत मिसळण्याची कोलामांची तयारी नाही. त्यांना गावांत आणण्याचे प्रयत्न झाले. परंतु त्यांच्या वेगळ्या देवांसाठी, वेगळ्या देवपूजेसाठी व वेगळ्या देवोत्सवांसाठी ते गावांत न येता गावांबाहेरच राहिले !

**' भगत '**

देवासंबंधीचे सारे व्यवहार कोलाम लोक 'भक्ता'च्या माध्यमातून करतात. ' भक्त ' हा शब्द ग्रामीण भागात ' भगत ' असा उच्चारला जातो. परंतु ' भक्त ' या शब्दाचा मूलार्थ ' भगत ' या शब्दामध्ये विशिष्ट अर्थाचा होऊन बसला आहे. कोलामांच्या वस्तीत एक लहानशी झोपडी असते. या झोपडीत देवाचे ' ठाणे ' असते. या देवठाण्यात किंवा देवठाण्यापुढील अंगणात ' भगताच्या अंगात देव येतो. ' ' देव अंगात आल्या'वर जमलेल्या आयाबाया आणि माणसे यांना ' भगत ' बऱ्याच गोष्टी सांगतो. जमलेल्या लोकांमध्ये काही रोगी असतात, काहींची मुलेबाळे आजारी असतात आणि काही मूलबाळ होत नसल्यामुळे ते मागण्याच्या हेतूने आलेले असतात. ' भगत ' त्यांना ' देवाचा कौल ' सांगतो. हा ' भगत ' जे सांगतो त्यावर उपस्थितांची श्रद्धा असते. ' भगतामुळे प्रत्येक रोग जातो ' असे त्यांना मनोमन वाटते. म्हणून नवससायास, कोंबड्याबकऱ्यांचे बलिदान इ. गोष्टी 'भगता'च्या सांगण्यावरून होत असतात. ' दवाखाने आले म्हणून रोग वाढले ' असे म्हणणारे कितीतरी कोलाम आढळतात. याचा अर्थ, कोलामांना ' भगत ' हाच रोगहर्ता वाटतो. ' भगताने मंत्र टाकून, भारून ( = मंत्रप्रयोगाने बांधणी करून ) दिलेले गंडे, ताईत, दोरे व अंगारा यांनी गुण येतोच ' ही श्रद्धा लोकांमध्ये असते.

कोलामांना ' विघ्नहर्ता'ही 'भगत'च वाटतो. कारण तो भविष्यकाळातील संकटांच्या सूचना देतो व येऊ घातलेली गंडांतरे टाळतो, असे कोलाम समजतात. ' त्याच्या अंगात येणाऱ्या देवामुळे त्याला हे सामर्थ्य त्या वेळेपुरते प्राप्त होते ' असे समजले जाते. वस्तुस्थितीसुद्धा अशीच आहे की, ' अंगात देव आल्यावर ' ' भगत ' कोणालाही आवरत नाही व फाडफाड बोलतो. परंतु ' देव अंगातून निघून गेल्यावर म्हणजेच देव उतरल्यावर ' ' भगत ' हा अगदीच गरीब, बावळट व साधा माणूस दिसतो आणि अगदी साधा वागतो.

' भगता'कडे येणारे लोक कोलामच असतात असे नाही, तर इतर जातींचेही लोक प्रसिद्धी पावलेल्या -कोलाम-' भगता'कडे येतात. त्या देवठाण्यावर बरेचदा इतरांचीही गर्दी होते. गोंडांना तर कोलामांच्या या भक्तिविषयक गुप्त ज्ञानाविषयी, मंत्रतंत्रांविषयी व जादूटोण्याच्या विद्येतील प्रवीणतेविषयी जुन्या काळापासून आकर्षण वाटत आले आहे. गोंडांमधील बहुतेकांना कोलामांमधील ' भगता'विषयीचीही माहिती

असते व तिचा ते उपयोग करून घेतात. फार काय, प्रत्येक कोलाम मंत्रतंत्र टाकून पोटदुखीसारखे रोग ताबडतोब हटवतो, असा काही भागातील गोंडांमध्ये समज आहे. विशेषतः आदिलाबाद भागात हा समज दृढमूल असल्यामुळे गोंड लोक संपूर्ण कोलाम जातीला 'भगत' किंवा 'पुजारी' या नावानेच तिकडे संबोधतात.

'भगता'चा मान देवधर्माच्या क्षेत्रात असतो. कोलाम-वस्तीत त्याला वेगळ्या प्रकारचा असा हा मान मिळतो. कोलामांच्या धार्मिक आचारांशी व जीवनाशी 'भगता'-चा प्रत्यक्ष संबंध नेहमीसाठी निगडित झालेला असतो. कोलामांच्या सार्वजनिक उत्सवप्रसंगी 'भगत' धार्मिक शक्तिपुरुष म्हणून कार्य करतो. 'गावबांधणी' नामक सर्वश्रेष्ठ अशा कोलामांच्या सणात 'भगत' असतो व गाव 'बांधून काढण्या'च्या वेळी, तसेच रात्रीच्या आनंदोत्सवाच्या वेळीं त्याची गरज असते. त्याच्या मदतीला एक नकली 'भगत'ही असतो. पण तो करमणुकीसाठी असतो.

कोणत्याही सणोत्सवात, मृत्यूनंतर किंवा अशाच समारंभात 'भगत' आणि त्याचे 'अंगात देव येणे' ही गोष्ट असते, असे दिसून येते. विशेषतः 'आई' या देवतेची कोणतीही पूजा किंवा 'आई'चा कोणताही उत्सव 'भगता'वाचून होत. नाही. 'भगता'च्या अंगात येणारा देवही प्रामुख्याने 'आई' हाच असतो. काही वेळा तो 'भिवसन' किवा दुसरा कोणतातरी असतो.

कोलामांना नवीन वस्ती वसवावयची असेल तेव्हा 'भगता'लाच त्या जागेच्या शुभ-अशुभ भवितव्याविषयी विचारले जाते व त्याच्या कथनानुसार नवीन वस्ती वसविली जाते. 'भगत' काही वेळा भविष्य, नक्षत्रे, पावसांचे योग यांसारख्या गोष्टी सार्वजनिक सणोत्सवांमध्ये सांगत असतो.

'भगत' कोणालाही होता येत नाही. ज्याच्या अंगात 'देव' येईल, त्याला 'झाड' असे म्हणतात. 'झाड' होणारी व्यक्ती नकली असू नये, ती अस्सल असावी हा संकेत आहे. 'भगत' सर्वच कोलामवस्तींमध्ये असतो असे नाही. काही वस्तींमध्ये तो नसतोही ! अशा स्थितीत सार्वजनिक प्रसंगांसाठी दुसऱ्या वस्तीमधून 'भगत' आणावा लागतो.

'भगता'चे घराणे परंपरेने बरेचदा 'भगता'ची भूमिका पुढे चालविते. घरातील मोठा माणूस 'भगत' असला व तो मरण पावला वा जक्ख म्हातारा झाला की, त्याचा मुलगा अथवा नातू 'झाड' होतो. त्यानंतर 'देव' त्याच्या 'अंगात येतो.' साधरणतः 'भगता'चे स्थान कोलाम जमातीत दैवी चमत्कारांवर आधारलेले असून त्याचे स्वरूप या क्षेत्रापुरते तरी या जमातीत स्वयंपूर्ण व स्वतंत्र आहे.

'भगता'ला कोलामी भाषेत 'सुपारी' असे म्हणतात. 'भगतिणी'ला 'सुपारताद' म्हणतात आणि नकली 'भगता'ला 'घोट्टेसुपारी' असे संबोधतात.

## देवकरी वा पुजारी

उत्सवादिकांमध्ये पूजाअर्चा करण्यासाठी एक कोलाम नेमलेला असतो. त्याला देवकरी किंवा पुजारी असे म्हणण्यात येते.कोलामी भाषेत त्याला ‘ दियाला ’ असे म्हणतात. ‘ देवकरी ’ हा दरवर्षी वर्षप्रतिपदेच्या दिवशी नाईकादि पंचमंडळाच्या निवडीच्या वेळी कोलामांतर्फे नेमून दिला जातो. वर्षभर तो आपल्या पदावर राहतो व पुढील वर्षी जमातीची इच्छा असल्यास पुनः ते पद सांभाळतो. नव्याने त्याला काम देणे न देणे हे त्याच्या योग्यायोग्य कामांवर ठरविण्याकडे वस्तीतील कोलामांचा कल असतो.

‘ भगता’पेक्षा ‘ देवकरी ’ हा कोलामांच्या कमी आकर्षणाच्या टप्प्यात येतो. कारण ‘ भगता’कडे श्रद्धेने पाहिले जाते; उलट ‘ देवकऱ्या’कडे एक कार्यकर्ता म्हणून बघितले जाते. आदिलाबादेकडील गोंड मात्र ‘ भगत ’ व ‘ पुजारी ’ ही दोन्ही पदे एकत्र समजतात.

# ३ : :

## देवदेवतांचा तपशील

कोलामांच्या अनेक देवदेवता आहेत. त्यांपैकी पुढील देवदेवतांची यादी निरनिराळ्या कोलामांकडून मिळालेल्या माहितीच्या आधारे तयार केली आहे.

**स्त्रीलिंगी देवता ( देवी )**

| | | |
|---|---|---|
| ( १ ) देवी | ( २ ) आया | ( ३ ) बेक |
| ( ४ ) कारायमेराय | ( ५ ) माणकूबाई | ( ६ ) लाळाबाई |
| ( ७ ) भुताय | ( ८ ) वाघाय | ( ९ ) भोवानी |
| | ( १० ) सावारी | |

**पुल्लिंगी देवता ( देव )**

| | | |
|---|---|---|
| ( ११ ) भीमाय्याक | ( १२ ) सानसुर्याक | ( १३ ) पारध्याक |
| ( १४ ) जयतुर | ( १५ ) चाणखाण | ( १६ ) कलासुर |

## पुल्लिंगी देवता ( देव )

| | | |
|---|---|---|
| ( १७ ) चुराघाली | ( १८ ) दहीत | ( १९ ) बहीस |
| ( २० ) सकोबा | ( २१ ) म्हसोबा | ( २२ ) भयरूम |
| ( २३ ) मेटी दियाम | ( २४ ) पेद्दा दियाम | ( २५ ) साटवन |
| ( २६ ) मोराम | ( २७ ) महादेव | ( २८ ) मारुती |

### ( १ ) देवी

कोलामांच्या जीवनात देवीला सर्वात अधिक प्राधान्य आहे. देवी हे त्यांचे मुख्य दैवत आहे. हिला सर्वच कोलाम मोठ्या भक्तिभावाने भजतात. जातील तेथे हे लोक देवीची पूजा न चुकता करतात.

कोलामांच्या या देवीचे मुख्य ठाणे माहूर येथे गडावर आहे. ज्या भागात कोलामांची दाट वस्ती आहे, त्या भागाला माहूर जवळ आहे. माहूरची देवी कोलामांची आद्य देवता आहे आणि गोंडांचीही मुख्य देवी माहूरलाच आहे. माहूरगडावरील देवीला सर्वच आदिवासी पूजीत असले तरी त्यांत कोलामच तिचे भक्त आधिक्याने आहेत. माहूर येथे कोलामांची वस्ती आहे. त्या वस्तीत देवी असून जवळच देवदेवेश्वरी देवळाजवळ उघड्यावर कोलामांचा एक देव आहे. माहूरच्या रेणुकेला ( किल्ल्यातील देवी वेगळी ) सर्वच जातीजमाती भजतात.

आपल्या मुख्य देवतेच्या दर्शनासाठी सवडीप्रमाणे काही कोलाम लोक व्यक्तिशः केव्हाही माहूरला जातात व देवीचे दर्शन घेऊन येतात. कधी नवस करण्याच्या तर कधी नवस फेडण्याच्या निमित्तानेही ते माहूरला जाऊन येतात. कधी कोंबडे-बकरे देण्याचा 'भाव' (नवस) असेल तर तेवढ्यासाठीही कोलाम लोक माहूरला देवीजवळ जातात. दसऱ्याच्या वेळी या देवीजवळ माहूरच्या आसपासचे बहुतेक सर्व कोलाम जमतात. त्या भागातील कोलामांचे तेथे जणू संमेलनच भरते ! रात्रभर देवीपुढे डफपावलांवर ( पाऊल, पावले= पावा, पावे ) नृत्ये करून व गीते गाऊन कोलाम लोक या देवीचे आराधन करतात. दसऱ्याच्या वेळी माहूरला हिंदू धर्मातील इतर जातींचे लोकही मोठ्या प्रमाणात जमतात. तेथे त्यावेळी श्रीदत्ताची यात्रा भरते. माहूरला अनेक संस्कृतींचे बहुमेळ दर्शन घडते. म्हणूनच अनेक पंथ, जाती, जमाती व देवता यांचे वैविध्य तेथे आढळते.

माहूरच्या देवीच्या दर्शनासाठी बरेच कोलाम माहूरला जाऊ शकत नाहीत. माहूरच्या ह्या देवीची प्रतिकृती म्हणून कोलाम लोक आपल्या वस्तीत देवी मांडतात. कोलामांच्या वस्तीमध्ये साधारणतः मध्यभागी कोलामांच्या पंचायतीची चावडी असते. चावडी म्हणजे एक झोपडीच असते. या चावडीपुढे अंगण असते. ते अंगण

स्वच्छ असते. त्या अंगणात १||–२ फूट उंचीची मातीची एक ढिगारेवजा जागा असते. ती जागा स्थूलमानाने माहूरगडासारखी दिसावी, अशी तिची रचना असते. दक्षिण विदर्भातील प्राचीन किल्ल्यांपैकी माहूर हा एक प्रमुख किल्ला होता. म्हणून माहूरला माहूरगड असेही म्हणण्यात येते. माहूरगड हे नाव दक्षिण विदर्भात सर्वत्र प्रचारात असून माहूरच्या विविध देवदेवता उंच डोंगरावर, किल्लेवजा जागेतच आहेत. माहूरचा किल्लाही त्याच भागात वर डोंगरामध्ये आहे. कोलामांच्या चावडीपुढील अंगणात उभारलेल्या मातीच्या त्या ढिगाऱ्यावर दोन उभट दगड ठेवून त्यांना शेंदूर लावलेला असतो. ते शेंदरी दगड म्हणजेच कोलामांची देवी ! जेव्हापासून कोलामांची वस्ती वसली असेल तेव्हापासून या देवीची स्थापना झालेली आहे असे निश्चितपणे समजावे ! प्राचीन काळापासून कित्येक ‘ पोड ’ ( कोलामवस्ती ) त्याच जागी आहेत. त्यामुळे तेथील देवीही तितकीच प्राचीन ठरते. या देवीच्या केंद्रावर कोलामांचे सारे धार्मिक भावजीवन आजवर स्थिरपणे जगविले गेले आहे–– जागविले गेले आहे ! कोलामांच्या वस्तीतील बहुतेक सारे धार्मिक विधी या देवीपाशीच पार पाडले जातात. नृत्यगीतांचे कार्यक्रमही बहुतेक तेथेच होतात आणि सामुदायिक अंगतींपंगतींची पण तीच जागा असते. शिकारीच्या वेळी, धार्मिक कार्याच्या वेळीं, एखाद्या कामाच्या शुभारंभसमयी किंवा अशाच स्वरूपाच्या कार्याच्या वेळी देवीला नैवेद्य दाखविल्याशिवाय होत नाही. कोलाम लोक ही गोष्ट न चुकता करतात.

कोलामवस्तीतील या देवीचे तोंड बहुतेक जागी दक्षिणेकडे आढळते. माहूरकडे तोंड असावे, या उद्देशाने तिची तशी मांडणी कोलाम लोक करतात.

महामारी, माता यांसारखे साथीचे रोग आले तर तेव्हाही देवीची पूजा विध्युक्त केली जाते. देवीला शेंदूर लावून, कोंबडे–बकरे कापून दिले जाते आणि ‘ हा कोप शमव ’ अशी विनंती कोलामांकडून करण्यात येते.

सीता ही कोलामांची मुख्य देवी असल्याची माहिती ‘ ज्ञानकोशा’त आली आहे.[१] परंतु ती माहिती अगदीच चूक आहे. माहिती मिळविणारांनी कोलामांना त्यांच्या देवीचे नाव विचारले असता कोलामांना ते सांगता आले नसेल, अशी एक शंका आहे. परंतु ही शंकाच असावी असे वाटते. कारण वस्तुस्थिती वेगळी आहे. डॉ. केतकरांची माहिती रसेल–हिरालाल यांचा आधार घेऊन लिहिलेली आहे. वऱ्हाडातील शेतकरी कापूस निघण्याच्या आरंभी ‘ सीतादेवी’ची ( पिकाच्या ओळीची, तासाची ) पूजा करतात व कापसाची पहिली बोंडे त्या देवीला अर्पण करतात. कोलामांतही काहीजण शेतकरी आहेत. तेही ‘ सीतादेवी ’ करतात. त्यामुळेच

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४



कोलामांची देवी

कोलामांच्या देवीचे नाव हिरालाल व रसेल यांनी 'सीता' असल्याचे सांगून टाकले.[१] म्हणूनच देवी आणि सीता यांचा घोटाळा झाला! वस्तुतः कोलामांच्या देवीचे नाव 'सीता' असे नाहीच! कोलामांच्या देवीला मारूनमुटकून 'सीता' व्हावे लागले, हे स्पष्ट आहे. कोलामांच्या या देवीला नाव नाही. देवी म्हणजे देवी, बस्! कोलामांपैकी एकालाही आपल्या या देवीचे नाव सांगता आले नाही. त्यांच्या भाषेतही ते या देवतेला देवी असेच म्हणतात, असे दिसले. त्यांच्या देवीविषयक गीतांतही 'माहुर्ता देवी' (माहूरची देवी) असाच उल्लेख तिजसंबंधी येतो. सेतुमाधवराव यांनी कोलामांची देवी 'आवाल' (Awa!) या नावाची असल्याची माहिती आपल्या कोलामी व्याकरणाच्या प्रस्तावनेत दिली आहे.[२] परंतु हे नाव प्रचारात दिसले नाही. किनवट-आदिलाबाद भागात या नावाचा प्रचार असण्याची शक्यता आहे. माहूर येथील एका कोलामेतराने किल्ल्यातील कोलामांच्या देवीला 'महाकाली' म्हणतात अशी माहिती दिली. परंतु प्रत्यक्षात कोलामांमध्ये 'महाकाली' हे नाव प्रचारात नाही, हे

---

१. Russell-Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, पृ. ५२३

२. P. Setu Madhao Rao : A Grammar of the Kolami Language (1950), प्रस्तावना

सत्य आहे. मात्र माहूरच्या किल्ल्यावरील देवीला जनसाधारणात महाकाली हेच नाव आहे व इतर जातींचे असंख्य लोक तिचे भक्त आहेत.

सीता किंवा राम यांच्या पूजेसंबंधी कोलामांमध्ये फारशी आस्था नाही. रामाची पूजा करतांना ते आढळत नाहीत. आदिवासींमध्ये रावणदेवाची पूजा करण्याची प्रथा काही भागात आहे. एतद्देशीय मूळ अनार्य हे आदिवासी मानल्यास रावणदेवाला त्यांनी पूजण्यात गैर काहीच नाही. सातपुड्यातील कोरकू गोंडांत व दक्षिण भारताच्या काही जमातींत रावणास देव मानले जाते. यावरून, व्यतिक्रमाने असे म्हणता येईल की, रामाची पूजा कोलामांमध्ये नसण्यामागे हेही सूत्र असणे अशक्य नाही. मात्र, कोलामांमध्ये रावणाची पूजा करण्याची पद्धती नाही, हेही येथे ध्यानात घेणे आवश्यक आहे. सीता हे आदिवासींमधील मूळ नाव असून ते नंतर इतरांमध्ये आले.

## ( २ ) आया

ग्रामीण भागात ‘ आई ’ नावाची देवता ग्रामीण जन पूजतात. ही ‘ आई ’ बहुधा उघड्यावर असते. निंबाच्या झाडाखाली ती मांडलेली असते. कोलामांची ‘ आया ’ नामक देवता व ग्रामीणांची ‘ आई ’ ही देवता एकच असावी, असे अंशतः वाटते. कारण या दोन्ही जमातींत या देवतेला पूजण्याच्या बाबतीत काही साम्ये आढळतात. कोलामीमध्ये ‘ आय, ’ ‘ आया ’ या शब्दांचा अर्थ आई असाच आहे. तरीपण, आईच्या भक्तीचे, पूजेचे आणि सणोत्सवांचे कोलामांमधील स्वरूप बऱ्हंश वेगळे आहे. त्यामुळे, तुरळक साम्यांसाठी कोलामांची व इतरांची ‘ आई ’ ही एकच ठरविणे कठीण आहे. इतरांची ‘ आई ’ ही बहुतेक वेळा शीतलामाता असते; तर कोलामांची ‘ आया ’ शीतलामातेच्या भूमिकेबरोबरच इतरही भूमिकेत आढळते.

कोलामांच्या वस्तीच्या बहुतेक पूर्व दिशेस त्यांच्या ‘ आया ’ देवतेचे स्थान असते. झाडाखाली उघड्यावर एक ओबडधोबड दगडाची मूर्ती मांडलेली असते; तिला ‘ आया ’ म्हणून कोलाम लोक पूजतात. वस्तीत देवी, पटकी यांसारखे रोग आल्यास सर्व कोलाम सामुदायिकरीत्या कोंबडे-बकरे देण्याचा नवस कबूल करतात. रोगराई संपल्यानंतर कबूल केलेला नवस, तो प्राणी कापून फेडतात. ते मांस शिजवून पंगत करतात.

कोलामांच्या ‘ भगता’च्या अंगात बहुधा हीच ‘ आया ’ येते. कोलामवस्तीमधील ‘ भगता’च्या देवठाण्यात याच देवतेची प्रतिकृती असते. या देवठाण्यात ‘ आया’चा महोत्सव चैत्र पौर्णिमेला होतो. ‘ चैत ’ किंवा ‘ चैताचा सण ’ या नावाने हाच सण व उत्सव ‘ आई’च्या प्रीत्यर्थ वऱ्हाडात इतरही जातींचे लोक करतात. कोलामांच्या ‘ आया’पाशी चैत्र पौर्णिमेला आजूबाजूच्या गावांचे व वस्तींचे कोलाम जमतात. इतरही

लोक येतात. ' भगता'च्या ' अंगात आया येते. ' या ' देवा'ला मग लोक आपले भलेबुरे विचारून घेतात. आजार वगैरे कधी बरे होतील, वर्षात पीक कसे येईल इ. प्रश्नांची उत्तरे लोक ' भगता'च्या ' अंगात आलेल्या आया'कडून काढून घेतात. याच दिवशी ' आया'च्या उत्सवाच्या निमित्ताने वस्तीतील बहुतेक कोलाम वस्तीतील ' आया'च्या देवठाण्यापासून मिरवणूक काढून डफ–पावे वाजवीत वस्तीबाहेरच्या पूर्वेकडील ' आया'जवळ जातात. ' भगत'ही या मिरवणुकीत असतो. त्याच्या ' अंगात आया आलेली ' असतेच. ती ' उतरेपर्यंत ' कोलाम लोक बकरा कापतात व त्याचे हिस्से पाडतात. ते हिस्से कोलाम बायकांना शिजवायला देतात. त्या बायका तेथेच आपापल्या कुटुंबाचा अलगअलग स्वयंपाक तयार करतात. बकरा कापणे विधियुक्त होते. पूजा, नैवेद्य हेही विधी पार पाडले जातात.

' भगता'च्या ' अंगातील आया उतरल्या'वर कोलाम लोक जेवणे आटोपतात. ती आटोपल्यावर परस्परांचा ' रामराम ' (नमस्कार) होतो आणि नंतर ते सर्वजण वस्तीत परत येतात.

चैत्र शुद्ध प्रतिपदेला म्हणजे वर्षप्रतिपदेलासुद्धा कोलाम लोक ' आया'ची पूजा करून शिकारीला जातात. आईच्या आशीर्वादाने भरपूर शिकार मिळावी, हा त्या पूजेमागचा हेतू असतो.

' आया'ची पूजा सर्वजणांनी मिळून करण्याचा एक सोहोळा माघ महिन्यातील पौर्णिमेच्या दिवशी होतो.

कोलाम पुरुष ' भीमाय्याक ' या देवाची पूजा करतात, त्यावेळी कोलाम स्त्रिया स्वतंत्रपणे ' आया'ची पूजा करीत असतात. पेरणीच्या हंगामात ' भीमाय्याका'च्या पूजेचा कार्यक्रम होत असतो तेव्हा एकीकडे ' भीमाय्याका'ची पूजा चालली असतांना दुसरीकडे ' आया'जवळ जमलेल्या कोलाम स्त्रिया कोंबडीचे पिलू कापून ' आया'ची पूजा करतात. त्या दिवशी ' आया'पुढे डहाळ्यांचा मांडव स्वतः कोलाम स्त्रिया करतात आणि हळद, अक्षता व कुंकू यांनी ' आया'ला अक्षरशः रंगवून टाकतात !

' मेटी दियाम ' या नावाच्या देवतेच्या उत्सवसमयीही कोलाम लोक ' आया'ची पूजा करतात.

कोलामांची ' देवी ' आणि ही ' आया ' ह्या दोन देवता अगदीच भिन्न असून, त्या दोन्ही एक नव्हेत, हे कटाक्षाने लक्ष्यात घेतले पाहिजे !

### ( ३ ) बेक

या देवतेसंबंधी कोलामांमध्ये माहिती फारच कमी मिळते. बेक ही काही कोलामांची गृहदेवता आहे.

वस्तुतः ' बेक ' व ' आया ' एकच असाव्यात; कारण कोलामी भाषेत ' बेक ' या शब्दाचा अर्थ ' आई ' असा आहे.

## ( ४ ) कारायमेराय

ग्रामजीवनात देवीची अनेक नावे व अनेक रूपे आढळतात. उदा. कुबडी आहे ती कुबडाई; खोकल्याची देवी असेल ती खोकलाई व ठसके लागल्यावर जिच्या कृपेने ते जाऊ शकतात ती ठसकाई ! कोलामांमधील काराईमेराई ( कोलामी उच्चार–कारायमेराय ) ही अशीच देवी असावी. ' मेरा ' किंवा ' मेळ ' याचा अर्थ ग्रामीण भागात ' गावाची हद्द ' असा होतो. या हद्दीवर राहून गावाचे रक्षण करणारी देवता मेराई या नावाने ग्रामीण भागात ओळखली जाते. पूर्व–मंडला भागातील आदिवासी ' मेरोदाई ' नावाची जी देवता मानतात तीही ग्रामरक्षिकेच्याच स्वरूपात ![१] कोलामांच्या ' कारायमेराय'चे स्वरूप असेच असावे, असे तिच्या नावावरून वाटते. रसेल-हिरालाल यांच्या माहितीत कोलामांची मुख्य देवी ही ग्रामरक्षिका असते, असे म्हटले आहे.[२] ( ' सीतेला'च ह्या लेखकांनी देवी म्हटले ते वेगळे ! पाहा पृ. १६९-१७० )

## ( ५ ) माणकूबाई

कोलामांमध्ये ज्या गृहदेवता आहेत, त्यांत हिचा समावेश होतो. माणकूबाईची पूजा सामुदायिक रीतीने झाल्याचे आढळत नाही. व्यक्तिगत पूजेची ही देवता असून देवीचेच हे एक निराळे रूप वाटते.

राजुरा तालुक्यातील माणिकगड किल्ला वैरागडच्या नागवंशीय गहिलू राजाने बांधला. " हा किल्ला चंद्रपुराहून २७ मैलांवर दक्षिणेस आहे. माणिकादेवी वैरागडच्या नागवंशीय राजांच्या घराण्यातील अधिष्ठात्री देवता होय. बस्तर संस्थानातील नागवंशीय राजे हे वैरागडच्या राजांचे प्रतिस्पर्धी होते. त्यांचीही अधिष्ठात्री देवता माणिकेश्वरी हीच होय. या बाजूला जो राज्यविस्तार झाला तो माणिकेश्वरीच्या कृपेनेच होय असे समजून गहिलू राजाने किल्ला बांधून त्यास माणिकागड असे नाव दिले. त्याचा अपभ्रंश माणिकगड होय. "[३] या माणिकगडाजवळ टेकड्यांमध्ये मारकालमेट्टा येथे कोलामांची वस्ती आहे. तेथील कोलामांची शेती करण्याची पद्धती कोलाम जातीतील प्राचीन परंपरेला धरून आहे. गहिलू राजाची देवता माणिकेश्वरी, किल्ले माणिकगड आणि जवळील कोलामांमधील माणकूबाई नामक एक देवता यांचा काही अन्योन्य संबंध असेल काय ?

---

१. Stephen Fuchs : The Gond and Bhumia of Eastern Mandla ( १९६० ), पृ. ३९६

२. Russell—Hira Lal : The Tribes and Castes of the Centrat Provinces of India, Vol. III ( London 1916 ), पृ. ५२३

३. अ. ज. राजूरकर: चंद्रपूरचा इतिहास, पृ. २२–२३

## ( ६ ) लाळाबाई

देवीचे हेही वेगळे रूप आहे. सार्वजनिक स्वरूपात लाळाबाईची पूजा कोलामांमध्ये होत नाही. गृहदेवता म्हणून ही देवता काही घरांत पूजली जाते. कसार आडनावाच्या कोलामांची ही गृहदेवता असून तिची पूजा महाशिवरात्रीला करण्यात येते.

## ( ७ ) भुताय

भुताखेतांना दूर ठेवणारी देवी भुताई (कोलामी उच्चार–भुताय) या नावाने ओळखली जाते. ही बहुधा गावाबाहेर मांडलेली असते. हिची पूजा सार्वजनिक स्वरूपात होत नाही. तरीपण, भुतेखेते लागलेल्या व्यक्तींना 'भगत' आणि 'आया'-जवळ जसे नेले जाते, तसेच या भुताईजवळही त्यांना आणले जाते. भुताईची पूजा करून तिला नवस करणे व पुढे तो कबुलीप्रमाणे फेडणे ह्या प्रक्रिया कोलामांकडून या देवतेच्या संदर्भात होतात.

भुताई ही व्यक्तिगत गृहदेवताही आहे. या देवतेची पूजा चैत्र पौर्णिमेनंतर करतात.

## ( ८ ) वाघाय

कोलाम हे जंगलांच्या सान्निध्यात व दऱ्याखोऱ्यांच्या परिसरात राहत असल्यामुळे त्यांच्या आणि वाघोबाच्या भेटीही बरेचदा होतात ! वाघोबा त्यांची जनावरे पळवून नेतो. वाघाने ही कृती करू नये म्हणून वाघांना आळा घालणारी वाघाई (कोलामी उच्चार- वाघाय) नावाची देवता कोलाम लोकांनी मांडलेली असते. वाघाला जनावरे मारावयाची असल्यास तो प्रथम मारुतीपुढे जातो असे खेड्यापाड्यात मानले जाते; तर कोलामांच्या मताप्रमाणे वाघ प्रथम वाघाईजवळ जातो आणि एखादे जनावर मारण्याची परवानगी मागतो. वाघाईने परवानगी दिली तरच तो वाघ एखादे जनावर मारू शकतो, असा विश्वास कोलामांमध्ये आहे. एकंदरीत, आपल्या गायीगुरांचे व शेळ्यांचे वाघापासून रक्षण करणारी देवता म्हणून वाघाईची पूजा कोलामांमध्ये रूढ आहे.

आषाढी पौर्णिमेचा सण आदिवासींमध्ये विशेष मानला जातो. 'आखाडी' या नावाने हा सण वऱ्हाडी खेड्यांमध्ये व खेडुतांमध्ये प्रचलित आहे. या 'आखाडी'च्या दिवशी कोलाम लोक वाघाईची पूजा सर्व मिळून करतात. ह्या देवतेला बळी देण्यासाठी कोलामांमधील मुख्य पंचांतर्फे एक कोंबडा विकत घेण्यात येतो. पूजाविधी आटोपल्यावर हा कोंबडा कापला जातो आणि सर्व कोलामांच्या घरी तो सारख्या प्रमाणात प्रसाद म्हणून वाटला जातो.

या दिवशी सकाळी पळसाच्या पानांचा व फांद्यांचा एक वाघोबा काही कोलाम तयार करतात. निसर्गातील वस्तूंचा वापर करून वाघाचा आकार आणण्याची ही पद्धती

कलात्मक, कल्पनापूर्ण व औचित्ययुक्त आहे, यात शंकाच नाही ! या नकली वाघाला कान, शेपूट, तोंड, पाय व जबडा एवढे ठळक अवयव लावलेले उठावदारपणे दिसतात.

पळसाच्या पानांचा व डहाळ्यांचा हा वाघ, डफ आणि पावे यांच्या तालावर वाजतगाजत गावाबाहेरील वाघाईच्या मूर्तीजवळ नेण्यात येतो. तेथे त्या दोन्ही 'वाघां'ची पूजापाती आटोपण्यात येते.

या पूजेच्या वेळी ज्यांच्या घरी गायी असतील ते कोलाम आपल्या गायींची 'टापरे' ( = घंटा ) वाघाईपुढे ठेवतात. जणू त्या वाघाईला उपहार म्हणून 'टापरे' दिली जातात ! गायींच्या गळ्यात बांधण्यासाठी लाकडी घुंगरू वा घंटा गुराखी अथवा गायीचे मालक स्वतः तयार करतात किंवा सुताराकडून करवून घेतात. कधीकधी ही 'टापरे' लोखंडी असतात. ह्या 'टापरां'च्या आवाजाने जंगलात चुकलेल्या एकटदुकट गायी हेरून परत आणता येतात. वाघाईला अशी ही 'टापरे' उपहार म्हणून देण्यातही सूचकता आणि समयज्ञता आहे.

## (९) भोवानी

कोलामांच्या स्वतःच्या अशा ज्या अष्टदेवी वर वर्णिल्या आहेत; त्या त्यांच्या जमातीच्या म्हणून वैशिष्ट्यपूर्ण आहेत. परंतु आजूबाजूच्या लोकांच्या संपर्कामुळे काही देवतांचे आगमन कोलामांच्या देवतांमध्ये झाले असणे शक्य आहे. त्यांपैकी 'भोवानी' ही कोलामांमध्ये बरीच मिसळलेली देवता आहे, असे म्हणावयास हरकत नाही. वस्तुतः कोलामांच्या वस्तीत किंवा त्यांच्या वस्तीबाहेर त्यांची म्हणून 'भोवानी' नामक देवता कुठेच आढळत नाही. असे असले तरी क्वचित एखाददुसऱ्या कोलामाच्या घरात गृहदेवता म्हणून ती आढळते. इतकेच नव्हे तर, केळापूर तहसिलीतील वाई या गावी आदिवासींची जी जत्रा भवानीच्या नावाने भरते तिला त्या भागातील बहुसंख्य कोलाम जातात आणि भवानीचे दर्शन घेतात. वाईच्या हेमाडपंती देवळाप्रमाणेच केळापूर येथेही एकवीरा देवीच्या हेमाडपंती देवळापुढे 'भोवानी' आहे. नव्या भांड्यात सरकी पेटवून कोलाम लोक आरती करतात व या 'भोवानी'पुढे नाचतात. कोलामाच्या 'भगता'च्या 'अंगात'ही ती या जागी 'येते.' स्वजातीत फारशी न आढळणारी ही 'भवानी' काही कोलामांनी आत्मसात केली व 'भोवानी' या नावाने तिला भजण्याचा पायंडा पाडला असावा. यामुळे कोलामांच्या अष्टदेवींमध्ये आणखी एकीची भर पडली आहे.

'भोवानी' ही कोलामांची स्वतःची मूळ देवताही असू शकते. कारण मंगळवार हा या 'भोवानी'चा वार आहे, अशी कोलामांची समजूत आहे.

'भवानी'चा ग्रामीण उच्चार 'भोवानी' असा आहे. वऱ्हाडात 'भोवानी' हाच उच्चार सर्वत्र रूढ आहे.

## (१०) सावारी

ही देवता मुस्लीम संस्कृतीने कोलामांना दिली आहे. सर्वच कोलामांची ही देवता नाही. फक्त काही कोलामांच्या घरी ' सवारी ' ( कोलामी उच्चार-सावारी ) मांडली जाते. मुसल्मानांच्या मोहरम ह्या सणात डोले ( ताबूत ), सवाऱ्या व नाल्या-हैदर मांडण्याची प्रथा आहे. मुसलमानांची ही प्रथा मूर्तिपूजेला जवळची म्हणून की काय, हिंदूपैकी अनेकांनी उचलली. हिंदूंच्या बहुतेक जातींमध्ये सवाऱ्या मांडून त्या अंगात येण्याची रीत आहे.

मुस्लीम संस्कृती जवळ नांदू लागल्यामुळे व काही अंशी राज्यकर्त्यांचा प्रभाव प्रजेच्या जीवनावर पडतो हा नियम असल्यामुळे काही कोलामांनी सवाऱ्या मांडण्याची ही प्रथा उचलली. आपल्या संस्कृतीला अगदी चिकटून राहणाऱ्या कोलामांनी येथे मुसल्मानांपासून उसनवारी केलेली दिसते. परंतु यात फक्त कोलामच येतात असे नाही; तर हिंदूंमधील ब्राह्मण, कुणबी, कोळी वगैरे अनेक जाती येतात. मुसलमानांच्या या सवाऱ्यांच्या निमित्ताने कितीतरी हिंदूंच्या घरात दर्गे बसविले गेले आहेत व मुस्लीम सणरीती आल्या आहेत. तेव्हा, कोलामांनी सवाऱ्या मांडण्याची पद्धती सरळ मुसलमानांकडून स्वीकारली असण्यापेक्षा त्यांनी ती जवळच नांदणाऱ्या ग्रामजीवनातील कुणबी, कोळी, ब्राह्मण वगैरे लोकांकडून उचलली, असे म्हणणे अधिक संयुक्तिक होईल.

मोहरमात निरनिराळ्या ठरीव घरी सवारी मांडली जाते. एका काठीवर शुभ्र वा किंचित पिवळसर वस्त्र लावले जाते· वर चांदीची नाल व आणखी तसेच अलंकार सवारीला चढविण्यात येतात. लिंबू व खोबऱ्याच्या वाट्या यांची माळ तिला घालण्यात येते. सवारी ५-६ फूट उंचीची असते. सवारी ज्याच्या अंगात येते तो माणूस ( हा ठरलेला व तोच असतो. ) मोहरमाच्या विशिष्ट दिवशी तिला उचलतो व इतर सवाऱ्यांसोबत मिरवणुकीत चालू लागतो. सवारीला एक नाडा असतो. ज्याच्या अंगात सवारी येते त्या ' झाडा'च्या ( झाड=' अंगात देव येणारी ' व्यक्ती ) मागून एक सेवक तो नाडा धरून चालतो. त्या नाड्याला खालीवर हालवून सवारीला तो डोलवितो. सवारी बसण्याच्या स्थानापुढे ' अवाला ' असतो. अवाला म्हणजे लहानशा खड्ड्यात असलेली आगटी ! ह्या ' अवाल्या'भोवती फिरूनच ही सवारी निघते व परत आल्यावर ' अवाल्या'भोवती फिरून सवारी ' थंडी होते ' आणि जाग्यावर बसविली जाते. मग ' झाडा'च्या ' अंगातून ती उतरते ' !

त्या दिवसानंतर पुढील दिवशी नाल्याहैदर ' उठतो ' व तिसऱ्या दिवशी पुन्हा सवाऱ्या ' उठतात ' !

हिंदू व मुसलमान यांच्यामध्ये वरीलप्रमाणे हा सण साजरा होतो. आणखीही काही रीती पाळल्या जातात. कोलामांमध्येही साधारणतः अशाच तऱ्हेने सवाऱ्यांचा सण मोहरमात साजरा होतो.

' देव अंगात येणे ' या गोष्टीवर कोलामांचे अतीव प्रेम असल्यामुळेही ' अंगात येणारी ' सवारी त्यांनी उचलली असण्याचा अधिक संभव आहे. तसेच, सवारीच्या स्थानापुढे ' अवाला ' म्हणून जी आगटी असते, तशीच आगटी कोलामांच्या सार्वजनिक चावडीपुढेही असते. या साम्याचे प्रेमही काहीसे परिणाम करणारे ठरलेले असावे.

मोहरम सणाच्या वेळीं नाचण्याचे जे कार्यक्रम होतात, त्यांत कोलाम स्त्रिया भाग घेतात.

कोलामांच्या देवतांजवळ मुस्लीम देवतांची प्रतीके येऊन बसलेली आढळतात ! मडकोना ( ता. यवतमाळ ) येथे कोलामांच्या वस्तीलगतच एक दर्गेवजा जागा आहे, तर भारी ( ता. यवतमाळ ) येथे कोलामांच्या समागृहापुढे ( चावडीपुढे ) त्यांच्या मुख्य देवीपाशी ५-६ फुटांवरच तशाच तऱ्हेचा उंचवटा असून तो मुसलमानांचा देव असल्याचे कोलाम सांगतात. हा दुसरा देव कोलामांच्या चावडीच्या अगदी अंगणातच ठळक जागी आहे.

## ( ११ ) भीमाय्याक

कोलामांमध्ये सर्वमान्य व ओळखीचा असा हा एक मोठा देव आहे. काही कोलामांना हाच मुख्य देव वाटतो. कोलामांमध्ये या देवाचे नाव ' भीमा, ' ' भीम्या ' असे एकेरी पद्धतीचे पण आवडीचे असून त्या शब्दाचा उच्चार ते ' भीमा ' असाच जास्त करतात. या देवाचे पूर्ण नाव उच्चारतांना कोलाम लोक ' भीमाय्याक ' असे म्हणतात. कोलामी भाषेत ' अय्याक ' या शब्दाचा अर्थ ' देव ' असा होतो. हा ' भीमदेव' गोंडांमध्ये ' भिवसन ' ( भिवसेन, भीमसेन ) या नावाने ओळखला जातो. भिवसन ही देवता मूळची ' बिसन ' म्हणजे विष्णू असावी, असा एक तर्क आहे. गोंडांमधील भिवसनदेव यवतमाळ-हिंगणघाट भागातील काही कुणब्यांची गृहदेवता आहे. ते कुणबी त्यास ' मोठा देव ' असेही म्हणतात. गोंडांमध्ये ' बडा देव ' आहे व भिवसनालाच ' बडा देव ' म्हणण्याची वहिवाट यवतमाळ भागातील गोंडांमध्ये आहे. आदिवासींची ही भिवसन देवता ज्या कुणबी कुळांमध्ये गृहदेवतेच्या रूपात आहे, त्यांच्या घरी आषाढी पौर्णिमेला ( ' आखाडी'ला ) एक आदिवासी जेवू घालतात. तो जेवल्याशिवाय तो कुणबी जेवत नाही. या सणात मलिदा ( = गूळपोळीचे लाडू ) करून त्या आदिवासीला खायला देतात. त्या कुणब्याकडून कोंबडीचे पिलू आषाढी पौर्णिमेच्या दिवशी भिवसनास दिले जाते.

कोलामांच्या भीमाय्याकाला नवससायास बरेच केले जातात. अन्य देवतांप्रमाणेच भीमाय्याकाबद्दलच्या बऱ्याच गोष्टी श्रद्धाळू कोलामांमध्ये प्रचलित आहेत. भीमाय्याका-मुळे जादूटोणा, भूत इ. गोष्टी लागल्यास निघून जातात या श्रद्धेने अनेक नवस कोलाम लोक या देवास करतात आणि कोंबडी-बकरी बळी देऊन ते फेडतात. मूल व्हावे म्हणूनही भीमाय्याकाला बरेचदा नवस करण्यात येतात. ' भगता'च्या ' अंगात आयाप्रमाणेच भिवसनही येत असतो. '

भीमाय्याक वस्तीबाहेर, बहुधा पश्चिम दिशेस मांडलेला असतो. त्याचे वास्तव्य निरनिराळ्या गावी निरनिराळ्या झाडांखाली आढळते. मोहो, पळस, पांजरा ही झाडे यवतमाळ भागात विपुल आहेत. भीमाय्याकाला हीच झाडे वास्तव्यासाठी आवडतात असे दिसते. मोहाच्या झाडाखाली राहणे भीमाय्याकास अधिक पसंत आहे. कळंब (ता. यवतमाळ) येथील एक भिवसन कळंब गावाच्या व तेथील कोलामवस्तीच्या आग्नेयेस आहे. तसेच, तो पळसाच्या झाडाखाली वस्ती करून राहिलेला आहे.

वैशाख मासात भिवसनदेवाला सामुदायिक रीतीने आंघोळीस नेण्याचा कार्यक्रम होतो. भीमाय्याकाच्या आंघोळीचा हा कार्यक्रम कोलामांमध्ये मोठ्या उत्साहाने करण्यात येतो. उदाहरणादाखल नांझा येथून निघालेला भीमाय्याक वाजतगाजत, डफ-पावे यांच्या निनादात २५–३० मैल चालून गेला, तो प्रसंग सांगता येईल. नांझ्या-तील सर्व कोलाम देवास घेऊन वाजतगाजत पायीपायी निघाले. केळापूर येथील जुन्या किल्ल्याजवळ खुनी नदीच्या पात्रात भीमाय्याकास विश्रांती मिळाली. तेथील भिवसन, एकवीरा देवी, हनुमान इ. पुराण–मूर्तींना भेटून हा देव दक्षिणेकडे पैनगंगा उतरून गेला व पैलतीरी तीन मैलांवरील पंढरवाडा येथे जाऊन आंघोळ करता झाला! ही हकीकत १२ वर्षांपूर्वीची आहे.

या स्नानयात्रेत रस्त्यातील कोलामवस्तींमधील ज्ञातिबंधू सामील होत जातात व पदयात्रेत रंग भरत जातो. बकरा कापणे, रात्रभर नाचणे, वाद्ये वाजविणे व गीते गाणे अशा कार्यक्रमांना उधाण येते.

ज्यावेळी दूर जाणे शक्य होत नाही, त्यावेळी जवळपासची नदी पाहून तिला डोह असेल अशा जागी कोलाम लोक भीमाय्याकाला आंघोळीला नेतात. जुने अवशेष, पडक्या गढ्या व किल्ले ज्या भागात असतील, त्या भागात भीमाय्याकाला आंघोळीला नेण्याकडे कल दिसून येतो.

कोलाम लोक शेतात पेरावयाचे बी घेऊन प्रथम भीमाय्याकाला प्रसाद म्हणून अर्पण करतात व पेरणीचे कार्य उत्तम व्हावे म्हणून त्या देवाचा आशीर्वाद मागतात. घरी शेती असो–नसो, पण सर्वांच्याच शेतीची पेरणी उत्तम साधावी, पिके उत्तम पिकावी व धनधान्याचा सुकाळ व्हावा, या सद्भावनेने सर्व कोलाम या कार्यक्रमात

भाग घेतात. पेरणीचे बी भीमाय्याकाला अर्पण करण्याचा हा कार्यक्रम पाऊस आरंभ होण्याच्या किंवा आरंभ झाल्यानंतरच्या काळात करतात. कोलाम लोक या उत्सवास 'बायब्राकी' असे म्हणतात. हा उत्सव बहुतेक बुधवार किंवा रविवार या दिवशीच होतो. बुधवार हा भीमाय्याकाचा दिवस मानला जातो. म्हणून बुधवारी हा कार्यक्रम करण्यावर विशेष भर असतो. कोलामांचा प्रमुख उत्सव 'गावबांधणी' व भीमाय्याकाची पूजा हे दोन्ही कार्यक्रम साधारणतः एकाच आठवड्यात किंवा पंधरवाड्यात, काही थोड्या दिवसांचे अंतर टाकून, करण्याची कोलामांची एक व्यवहारिक रीत काही भागात आढळते. 'गावबांधणी' व तेवढ्यातच होणारी भीमाय्याकपूजा या दोहोंना अधिक खर्च होऊ नये या हेतूनेच हे दोन्ही उत्सव जवळजवळ ठेवले जातात. 'गावबांधणी' व भीमाय्याक–पूजा या दोन्ही कार्यक्रमांसाठी एकच वर्गणी काढली जाते. ही वर्गणी कोलामांच्या प्रत्येक व्यक्तीमागे कमीतकमी चारदोन आणे असते. ह्या वर्गणीतून दोन बकरे विकत घेण्यात येतात. पैकी एक 'गावबांधणी'च्या वेळी उपयोगात आणतात व दुसरा भीमाय्याकाच्या उत्सवात कामाला येतो. वर्गणी कमी पडल्यास जास्तीचा खर्च नाईकादि पंच पत्करतात.

गावाबाहेर झाडाखाली वसलेल्या भीमाय्यकाजवळ हिरव्या पानांचा व डहाळ्यांचा लहानसा मांडव तयार करण्यात येतो. उत्सवासाठी विकत घेतलेला बकरा घेऊन वस्ती-मधून एक मिरवणूक निघते. डफ व पावे यांचा गजर चाललेला असतो. तालावर वाजतगाजत सर्व कोलाम भीमाय्याकाकडे जातात. पेरणीचे बी पोटल्यांमध्ये बांधून ते मिरवणुकीच्या मुख्य भागातून चालवितात.

भीमाय्याकापुढे बकरा उभा करण्यात येतो. कोणत्याही वेळी कोंबडा–बकरा बळी द्यावयाचा झाल्यास त्याला देवापुढे उभे करण्यात येते. त्याने अंग झाडले तर देवाने तो मान्य केला असे समजतात. अंग झाडण्याच्या या क्रियेला 'झडती देणे' असे म्हणतात. वऱ्हाडच्या ग्रामीण भागातील इतर जातींतही अशीच प्रथा आहे. कोंबड्याने वा बकऱ्याने लवकर 'झडती' न दिल्यास त्याच्या अंगावर पाणी शिंपडतात. देवभोळ्या लोकांची श्रद्धा अशी आहे की, पाणी शिंपडूनही कोंबडा वा बकरा 'झडती' देत नाही. 'देव घेईल' (=देव स्वीकृत करील) तेव्हाच तो प्राणी 'झडती' देतो, अशी समजूत आहे.

'झडती' दिल्यावर तो बकरा कोलाम लोक कापून काढतात; त्याचे तुकडे करतात व ते शिजवितात. तेथेच भीमाय्याकापुढे सामुदायिक भोजनाचा समारंभ होतो. या भोजनासाठी कोलामांकडून आधीच ज्वारीचे थोडेथोडे पीठ जमविलेले असते. त्या पिठाच्या भाकरी व कण्या शिजविलेल्या असतात. हे पीठ जमा करून आधीच कोलामांच्या चावडीत ठेवलेले असते.

भीमाय्याकाला बकऱ्याऐवजी बैल बळी देण्याची प्रथा मूळात होती. आजही ती काही भागात चालू आहे. या दृष्टीनेच एका माहितीपटात भीमाय्याकाला बळी देण्यासाठी म्हातारा बैल ओढत नेल्याचे दृश्य चित्रित करण्यात आले आहे. हा माहितीपट मेंढला ( ता. यवतमाळ ) येथे दाखविण्यात आला तेव्हा बेलोना ( ता. यवतमाळ ) येथील कोलामांना ते दृश्य बरे वाटले नाही. 'पूर्वी कदाचित बैल बळी देण्याची चाल असेल' असे त्यांचे मत पडले. 'आज ही चाल आमच्यात नाही' असे त्यांनी सांगितले. परंतु या खेड्यापासून केवळ ८–९ मैलांवर असलेल्या भारी ( ता. यवतमाळ ) या खेड्यातील कोलामांनी 'आमच्यात भिवसनास बैल बळी देण्याचीच प्रथा पूर्वीपासून चालत आलेली आहे; परंतु या ७–८ वर्षांत ती प्रथा बंद झाली असून बकरा बळी देण्यात येतो' अशी माहिती दिली. गोंडांच्या 'मोठ्या देवा'ला पूर्वी गायीचा बळी देत असत. [१]

भीमाय्याकाची ही जी पूजा चालू असते, त्यावेळी 'भगता'च्या अंगात 'देव येतो. ' अंगात आल्या'वर कोलाम लोक त्या 'भगता'ला त्या वर्षीचे पावसाचे योग विचारतात. 'भगत' चालू वर्षी पाऊस केव्हा पडेल ते सांगतो. कोलामांचे हे 'पंचांग'च असते !

ज्यावेळीं इकडे भीमाय्याकाची पूजा चालू असते तेव्हा कोलामवस्तीच्या दुसऱ्या दिशेस असलेल्या 'आया'ची पूजा करण्यात कोलाम स्त्रिया गुंतलेल्या असतात. 'आया'पुढे पानांचा व डहाळ्यांचा मांडव करून आणि त्या देवतेला कोंबडीचे पिलू देऊन कोलाम स्त्रिया भीमाय्याकाच्या पूजेच्या दिवशी व त्याच वेळीं 'आया'ला पूजतात.

इकडे भीमाय्याकापुढे चाललेली जेवणे आटोपल्यानंतर पानांच्या शिवलेल्या एका पत्रावळीत ज्वारीच्या शिजलेल्या कण्या ठेवतात. ती पत्रावळ भीमाय्याकापुढील जागेत मांडून त्या पत्रावळींभोवती कोलामांच्या पाच मुलांना एकत्र जेवायला बसवितात.

सायंकाळी मिरवणुकीत आणलेल्या बियांच्या पोटल्या सोडून काही कोलाम लोक ज्वारी, तुरी, तांदूळ, गहू इ. धान्यांनी निरनिराळे द्रोण भरतात. पळसांच्या पानांचे एक माप तयार करतात. धान्य मापण्यासाठी साधारणतः पायलीचे माप वापरण्याची पद्धती आहे. पळसांच्या पानांचे जे माप तयार करतात त्याला कोलाम 'पायली' म्हणून संबोधतात. कोलाम्मी भाषेत 'मुत्ता' किंवा 'मोदु रेक्काने मुत्ता' ( मुत्ता=पायलीचे माप; मोदु रेक्काने मुत्ता=पळसाच्या पानांची पायली ) असे त्या मापास म्हणतात. पळसांच्या त्या इवल्याशा पायलीने द्रोणातील विविध बीजधान्ये कोलाम लोक मोजतात.

---

१. Stephen Fuchs : The Gond and Bhumia of Eastrn Mandla; पृ. ३८७ ( तळटीप )

धान्य मोजण्याची ही प्रक्रिया चालते तोवर त्या पाच मुलांनी आपले जेवण चालूच ठेवावयाचे असते. धान्य मोजून संपेल तेव्हाच त्यांचे जेवणही संपेल; एरवी ते संपू शकत नाही ! त्या जेवणाऱ्या मुलांमध्ये लग्न झालेला मुलगा नसतो. जेवणारी ती सर्व मुले अविवाहित असली पाहिजेत !

तुरी, ज्वारी इ. धान्ये मोजतामोजताच एकमेकांजवळ देतात व विचारतात, " काय भरतोस ? " दुसरा उत्तर देतो, " पेव भरतो. " अशा तऱ्हेने अनेकदा प्रश्नोत्तरे होऊन सर्व धान्यांची ही पेवे भरून बंद केली जातात ! जमिनीत लहानलहान खड्डे करून त्यांत धान्ये भरण्याची क्रिया करतात. पेवे भरण्याची ती नक्कल असते. एवढे भरपूर धान्य पिकावे अशी अपेक्षा ह्या कृतीतून व्यक्त होते.

सर्व धान्ये पेवांमध्ये भरण्याची क्रिया संपल्यावर ' शेवटचे पेव ' भरतात. हे ' शेवटचे पेव ' म्हणजे जमलेल्या प्रत्येक कोलामाचे तोंड ! आधीची पेवे भरतांना काही तीळ मुद्दाम उरविण्यात येतात. ते तीळ व थोडाथोडा गूळ या ' शेवटच्या पेवा'त कोंबतात, म्हणजे प्रत्येकाला खायला प्रसाद देतात ! या तऱ्हेने तोंड गोड करून कार्यक्रमाचा ' शेवट ' करण्यात येतो.

परंतु हा शेवट केवळ पेवे भरण्याच्या प्रक्रियेचा असतो. अजून काही गमती-जमती बाकी असतातच !

पेवे भरण्याचे काम संपले की पत्रावळीवर कण्या खात बसलेल्या अथवा रेंगाळत जेवण चालू ठेवणाऱ्या मुलांनीही जेवण संपवावयाचे असते. तसे ते संपवून पाचही मुलांना पत्रावळ पाच बाजूंनी एकेक हात लावून आतआत दुमडावयाची असते. गुंडाळत आणलेली ती पत्रावळ पूर्ण गुंडाळून झाली की त्या पाच मुलांनी ती पत्रावळ देवाच्या बाजूला ठेवावी, असा संकेत आहे. तीवर दगड ठेवून ती उडून जाऊ नये याचीही व्यवस्था त्या कोलाम मुलांना करावी लागते.

जेवणाचे खरकटे हात त्या मुलांनी धुतले की, त्यांची चेष्टा मोठी माणसे करू लागतात. पाचपाच वेळा त्या मुलांची मुंडकी देवापुढे दाबतात. तसेच लहान मुलांच्या धोतरांचे कासोटे फेडून त्यांची फजिती करण्याचा प्रयत्न मोठी माणसे करतात. त्यामुळे हास्यविनोदास भरते येते व बरेचदा लहान मुले रडकुंडीला येतात.

त्यानंतर भीमाय्याकाला नमस्कार करून सर्व कोलाम " बायबाकीऽऽ " असा उच्चार जोराने ओरडून करतात आणि " बायबाकीऽऽ, बायबाकीऽऽ " असे ओरडत व डफ-पावे वाजवीत वस्तीत परत येतात.

' आया'जवळचे पूजाप्रकार आटोपून कोलाम स्त्रिया अंधारण्यापूर्वीच वस्तीत परत आलेल्या असतात. पुरुष मंडळी येईपावेतो त्या स्त्रिया वस्तीमधील चावडीपुढच्या

अंगणातील देवीशेजारी फुगड्या वगैरे खेळत असतात. तद्वतच गाणी गाऊन व नाच-नाचून त्या बाया अक्षरशः आनंदाचा जल्लोष करीत असतात.

भीमाय्याकाच्या पूजेहून " बायबाकीऽऽ, बायबाकीऽऽ " असे ओरडत आणि वाद्ये बडवीत येणारे कोलाम वस्तीजवळ येतात असे पाहून कोलामांमधील सर्व मुले चावडीपुढील देवीला घेरून तिला अगदी चिकटून बसतात. पुरुष येताच त्या मुलांना ते पकडतात. पकडता पकडता मुलांच्या धोतरांचे कासोटे फेडण्याचे विनोदी प्रकार पुन्हा तेथेही करण्यात येतात. त्यावेळीं मात्र मुले दूर पळून जातात किंवा पुरुषच मुलांना देवीपासून दूर हाकलतात.

अशा तऱ्हेने हा ' बायबाकी ' सण साजरा करून कोलाम लोक घरोघर निघून जातात.

कोलामांच्या ' फूलझडणी ' किंवा ' झाडपेरणी ' नावाच्या सणात शेतीतील नवे पदार्थ देवांस देण्याच्या कार्यक्रमाचा बराच भाग भीमाय्याकाजवळच पार पडतो. त्या दिवशी भीमाय्याकास बकरा देतात, पंचमंडळी तेथेच स्वयंपाक करते आणि देवाजवळ जेवण्याचा व हास्यविनोद करण्याचा कार्यक्रम मजेत पार पडतो. ( विस्तृत माहिती पुढे याच प्रकरणाच्या ' फूलझलणी ' किंवा ' झाडपेरणी ' ह्या सणाच्या वर्णनात आली आहे.)

भीमाय्याक जसा कोलामसमूहाचा देव आहे, तसाच तो अनेक कोलामांच्या ' घरचा देव ' ( गृहदेवता ) पण आहे. पुन्हा, त्यातही आवडीनिवडीचे प्रकार पडले आहेत. फुलासारखा भीमाय्याक ' फुल्लाऱ्या ' म्हणवितो. काही कोलामांच्या घरी हा ' फुल्लाऱ्या भिवसन ' असतो. काही कोलामांची ही देवता केवळ शेंदराची असते. त्याला ' शेंदऱ्या भिवसन ' असे म्हणतात. काही कोलामांच्या घरी शेंदूर लावलेल्या नारळाच्या ' टोकरा'चा ( = कारवंटीचा वा नरोटीचा ) भीमाय्याक असतो. काही कोलामांचा भीमाय्याक फक्त लाकडाचा असतो व त्या लाकडास शेंदूर फासण्यात येतो. काही कोलामांच्या घरातील भीमाय्याक दगडाचा असतो. त्यालाच शेंदूर लावला जातो. काही कोलामांचा भीमाय्याक तेलच लावतो ! त्याची पूजा तेल लावूनच केली जाते ! त्याचे नाव ' तेलभिम्या ' ठेवण्यात आले आहे. काही कोलामांच्या घरी मोरांचे पंख लावून उंच लाकडावर हा देव सजविला जातो. गोंड व गोवारी यांच्यात वरीलपैकी शेवटच्या पद्धतीने भिवसनदेव किंवा देवाची ' काठी ' वा ' टाल ' तयार करण्याची प्रथा आहे.

## ( १२ ) सानसुर्याक

घोड्याच्या पायाला ठोकावयाच्या नालेसारखा, पण तीन टोके असलेला हा कोलामांचा देव गृहदेवतेच्या स्वरूपातच त्यांच्यात अधिक आढळतो. या देवाची पूजा

काही कोलाम व्यक्तिशः करतात. ‘ तीन फंट्यांचा देव ’ ( फंटा = टोक ) अशा शब्दांत कोलाम या देवाची ओळख देतात. ‘सानसुर्याक’ या शब्दाचा अर्थ ‘ लहान सूर्य ’ असा असल्यामुळे या देवतेची पूजा सूर्योपासनेसारखी कोलामांत रूढ असण्याची शक्यता आहे.

## ( १३ ) पारध्याक

पारध ( शिकार ) हे आदिवासींचे मुख्य जीवनांग आहे. कोलामांमध्येही शिकारीचे वेड आहे. ‘ पारध्याक ’ ( = पारधी ) हे शिकारीचे दैवत असून शिकारीस निघतांना या देवाची पूजा करतात व त्यास शेंदूर लावतात. गावाच्या बाहेर गावाची शीव आणि जंगलाची सुरुवात यांच्या दरम्यान कोठेतरी ही देवता एखाद्या झाडाखाली मांडलेली असते.

## ( १४ ) जयतुर

कोलामांना हा देव बराच मोठा व मानवाईक वाटतो. कोणताही कोलाम जयतुर देवाची भक्ती करीत असतो. हा जयतुर नाल्यात, शेतात किंवा जंगलात मांडलेला असतो. तो वस्तीत नसतो. जनसंपर्काच्या जागी तो मांडला जात नाही. ‘ अपेटी ’ म्हणजे आडवळणी जागेत वा एकांत अवस्थेत टेंभुरणी, महारूख ( = महावृक्ष ) अशा झाडांखाली तो असतो.

काळे लुगडे नेसणाऱ्या बायकांना तो ‘ लागतो ’ अशी समजूत कोलामांमध्ये आहे. ‘ देव लागणे ’ म्हणजे ज्याला ‘ देव लागला ’ त्याच्या ‘ अंगात देव येऊन ’ अद्वातद्वा बडबडणे व काहीबाही सांगणे ! ‘ देव ’ किंवा ‘ भूतखेत लागलेली ’ व्यक्ती खूप खाते, बडबडते व बरेचदा बेशुद्ध पडते. तोंडातून फेस येतो. अशी व्यक्ती माणसांतून जवळजवळ उठते ! म्हणून ते ‘ लागणे ’ उतरवणे आवश्यक असते. ‘ भगत ’ हा अशा व्यक्तींना धागे, दोरे, ताईत, गंडे वगैरे देऊन त्यांना ‘ लागलेला ’ देव अथवा ‘ भूतखेत ’ काढून टाकतो. ‘ देव ’ वा ‘ भूत लागलेल्या ’ व्यक्तींना ‘ भगत ’ हा तागाच्या जाड साटाने ( = मोठ्या जाड चाबकाने ) अक्षरशः झोडपतो !

तेव्हा, जयतुर देव आपणास ‘ लागू ’ नये म्हणून कोलाम बायका काळे लुगडे नेसून जयतुराच्या बाजूला जात नाहीत.

जयतुर देवाला रानडुकर द्यावा लागतो ! तो दिल्याशिवाय होतच नाही ! ! नाही तरी जयतुर ही देवताच डुकराची- अर्थात रानडुकराची-आहे ! कोलामी भाषेत ‘ तुर्रे ’ या शब्दाचा अर्थ ‘ डुकर ’– प्रामुख्याने ‘ रानडुकर ’–असा आहे. ‘ जयतुर ’ या शब्दातही ‘ तुर ’ ( तुर्रे ) हा शब्द आहे. जयतुराची मूर्ती जंगलात, नाल्यात किंवा शेतात असते आणि रानडुकर हा जंगलात राहतो, शेतात चरतो व नाल्यात विश्रांती

घेतो. रानडुकरांची शिकार करणे व त्यासाठी डुकरांमागे धावणे हे तर कोलाम जातीचे वैशिष्टयच आहे ! तेव्हा अशा या जयतुर देवाला- कोलामांच्या वराहदेवतेला-'रानडुकर' बळी म्हणून हवा असल्यास नवल नाही ! त्यासाठी कोलाम लोक रानडुकराची शिकार करतात आणि तो जयतुरापुढे आणून ठेवतात. देवाला अशा रीतीने नैवेद्य दाखविल्या-वर त्या डुकराचे मांस शिजवून त्यावर ते ताव मारतात. पंगतीला त्या कोलामवस्तीतील सारे स्त्रीपुरुष व मुलेमुली असतात.

जयतुराला डुकर देण्याचा हा कार्यक्रम श्रावण महिना लागण्यापूर्वी ३–४ दिवस अगोदर किंवा श्रावण संपल्यावर ३–४ दिवसांनी केला जातो. श्रावणात कोलाम लोक मांस खात नाहीत. म्हणूनच कदाचित मांस खाण्याचा हा जंगी कार्यक्रम श्रावण लागण्यापूर्वी किंवा श्रावण संपताच आटोपला जात असावा. मासांची लज्जत एक महिनाभर चाखता येणार नाही किंवा एक महिन्यात चाखलेली नाही, या भावनेने यावेळच्या मांससेवनास विशेष खुमारी येत असेल !

जयतुर ज्याच्या घरी गृहदेवता म्हणून असेल त्याच्या घरी काळे लुगडे वापरण्यात येत नाही. कारण जयतुराला काळे लुगडे आवडत नाही व तो काळ्या लुगड्याच्या स्त्रीला 'लागतो' असा समज कोलामांमध्ये आहे, हे आपण पाहिले आहेच !

गोंडांमध्ये 'पांढरा सेवर' म्हणून जो देव आहे. तोच कोलामांमध्ये 'जयतुर' या नावाने असल्याची माहिती काही कोलामांनी दिली.

## ( १५ ) चाणखाण

कोलामांमध्ये ही देवता आहेच; परंतु तिची विशेष माहिती कोलामांकडून मिळाली नाही. ह्या देवतेचा सामुदायिक उत्सव सर्वच भागात होत नाही. गृहदेवतेच्या रूपात ही देवता कोलामांमध्ये आहे. केळापूरकडील काही गावांत पांढरा झेंडा 'चाण-खाण' या नावाने कोलामांमध्ये ओळखला जातो. स्वतःच्या वस्तीत असलेल्या या झेंड्याला नवे पांढरे कापड दसऱ्याच्या दिवशी चढविले जाते. झेंड्याच्या लाकडाला गेरूचा रंग देतात. नंतर झेंड्याची पूजा करून नारळ फोडतात व खोबऱ्याचा प्रसाद वाटतात.

## ( १६ ) कळासुर

कळासुर या देवतेची फारशी माहिती मिळू शकली नाही. कोलामांमध्ये ही देवता आहे हे मात्र निश्चित ! ह्या देवतेचाही सामुदायिक उत्सव होत नाही. कळासुर ही काही कोलामांची गृहदेवता आहे.

**( १७ ) चुराघाली ( माऱ्या )**

आवर्त वारे तयार होऊन त्यांच्याबरोबर धूळ, कचरा, गवत- कडब्याचा पाचोळा व तत्सम वस्तू वर्तुळाकार फिरत वेगाने उडतांना दिसल्या आणि त्यात कोणी सापडला की, त्याला ‘ भूत लागते ’ असे साधारणतः ग्रामीण विभागात समजले जाते. अशा वाऱ्याला वऱ्हाडत ‘ माऱ्या ’ असे म्हणतात. लहान प्रमाणात असेल ती ‘ वाहट्ळ ’ ( वऱ्हाडी शब्द,=वावटळ ) व उग्र रूपात आलेली वावटळ म्हणजे ‘ माऱ्या ’ ! जोराच्या वाऱ्यामुळे बरेचदा एखादी बेसावध व शक्तिहीन व्यक्ती किंवा मुलगा कोलमडून पडतो, घाबरतो आणि कधीकधी वाकडा होऊन मरतोसुद्धा ! परंतु त्या जोरदार वाऱ्याचा संबंध ग्रामीण जीवनात भुताशी लावण्यात येतो. कोलाम तर बोलूनचालून अज्ञ, अशिक्षित, देवभोळे व भुताखेतांवर विश्वास ठेवणारे ! ग्रामीणांनी ‘ भूत ’ मानलेल्या आवर्त वाऱ्याला कोलामांनी ‘ देवता ’ किंवा ‘ भूतदेवता ’ मानले आहे. वऱ्हाडात ‘ माऱ्या ’ म्हणून बहुतेक खेडुतांना माहीत असलेल्या या आवर्त वाऱ्याचे नाव कोलामी भाषेत ‘ चुराघाली ’ ( चुरा=गोल; घाली=वारा ) असे आहे. ‘ माऱ्या ’ उन्हाळ्यात फार दिसत असला तरी सर्वच ऋतूंत त्याचे कमीअधिक प्रमाणात अस्तित्व असते.

कोलामांमध्ये ‘ माऱ्या’बद्दल काही निराळ्या कल्पना आहेत. तो घरात येऊ नये अशी कोलामांची मनोमन धडपड असते व तो घरात आला की सत्यानाश करतो ही त्यांची समजूत ! या समजुतीत तथ्य आहेच. कारण कोलामांची घरे गवती छपराची व अगदीच कच्ची आणि तकलादू असतात. त्यामुळे ‘ माऱ्या ’ आला तर घरे उडून जातात व गरिबांचे नुकसान होते. या कारणामुळेच कोलाम लोक ‘ माऱ्या’ला फार भितात. यातूनच ‘ माऱ्या’च्या भक्तीची भावना उद्‌भूत झाली.

‘ माऱ्या ’ घरात येऊ नये यासाठी एखाद्या योग्य प्रसंगी ( बहुधा उन्हाळ्यात ) सर्व कोलाम मिळून ‘ चुराघाली’ला म्हणजे ‘ माऱ्या’ला कोंबडी वगैरे बळी देतात व ‘ भगता’कडून त्याची पूजापाती करवून घेतात. माऱ्याची प्रतिमा दगड किंवा लाकूड यांच्या स्वरूपात बहुधा नसते.

**( १८ ) दहीत**

कोलामांमधील ही देवता बहुधा ‘ दैत्य ’ असावी. वऱ्हाडी भाषेत ‘ दैत्य ’ या शब्दाचा उच्चार ‘ दईत ’ असा करतात. कोलामांमध्ये ‘ दहीत ’ या देवतेसंबंधी अशी समजूत आहे की, या देवतेजवळून फिरकल्यास ‘ दहीत लागतो. ’ म्हणून या देवते-जवळून बहुधा कुणी जाऊ नये, असे कोलाम मानतात.

‘ दहीत ’ या देवतेचा ‘ अंड्या दहीत ’ या नावाचा दुसरा एक प्रकार आहे. ‘ अंड्या दहीता’बद्दलही वरीलप्रमाणेच समजुती आहेत.

‘ दहीत लागल्या’स दहीभाताचा नैवेद्य दाखवून त्यास शांत करतात. ‘दहीत’ हा आडवाटेला, बहुधा वाटेपासून दूर जागी मांडलेला असतो. दहीभाताचा नैवेद्य दाखवितांनाच बहुधा कोलाम लोक त्याचे दर्शन घेतात. सामुदायिकरीत्या ‘दहीत’ पूजला जात नाही. ज्याला ‘ लागला ’ त्याच्या घरचे लोक, तो स्वतः व शेजारचे लोक फार तर त्याला दहीदुधाचा व भाताचा नैवेद्य अर्पण करायला जातात.

कोलामेतरांमध्ये ‘ दहीत ’ मांडून त्याची पूजा होत नसली तरी कोलामेतरांनाही ‘ दईत ’ लागल्याची उदाहरणे खेड्यापाड्यांतून आढळतात.

### ( १९ ) बहीस

‘ बहीस ’ ही ‘ दहीता’सारखीच देवता असून तीही ‘ लागते. ’ म्हैस आली की ‘ भैस आला ’ असे म्हणून कोलाम दचकतात, यावरून म्हशीप्रमाणे प्रचंड अशा दैत्याची कल्पना ‘ बहीस ’ या देवतेच्या संदर्भात असावी, असे दिसते.

वऱ्हाडी भाषेत ‘ भईस ’ किंवा ‘ भैस ’ असा शब्द असून त्यातून ‘ दईत ’-सारखाच अर्थ फलित होतो. खेड्यांतील लोकांना क्वचित ‘ भईस ’ ( भैस ) ‘ लागल्या’ची उदाहरणे आहेत. पूर्व-मंडला भागातील गोंड आणि भुमिया या लोकांमध्ये जो ‘ भैंसासुरदेव ’ आहे, त्यालाही ते लोक घाबरतात. म्हशींच्या संदर्भात तो देव तिकडे मानला जातो.[१]

### ( २० ) सकोबा

कोलामांमध्ये ही देवता गृहदेवतेच्या स्वरूपात आढळते. ‘ सकोबा ’ म्हणजे ‘ नागोबा ’ असे काही कोलाम सांगतात. बोचा ( बोरकर ) या कुळाच्या कोलामांची ही गृहदेवता आहे.

### ( २१ ) म्हसोबा

‘ बहीस ’ म्हणजेच म्हसोबा असे काही कोलाम समजतात. काहींना ती देवता निराळी वाटते. हा देव कोलामांच्या वस्तीत मांडलेला नसतो किंवा वस्तीबाहेरही तो फारसा आढळत नाही. एखाद्याच कोलामवस्तीच्या शेजारी त्याचे अस्तित्व असल्याचे दिसते व कोलाम लोक क्वचितच त्याला पूजतात. यावरून म्हसोबा ही कोलामांची खास देवता नसावी. ती इतरांकडून घेतलेली असावी. कोलामांमध्ये ही देवता असेलच तर ती ‘ बहीस ’ असावी.

‘ गावबांधणी ’ या कोलामांच्या महोत्सवाच्या दुसऱ्या दिवशी वाजतगाजत गावाबाहेर जाणारे कोलाम ज्या देवतेजवळ थांबतात, तिचे नाव कोठल्याही कोलामांनी

---

१. Stephen Fuchs : The Gond and Bhumia of Eastern Mandla; पृ. ३९४-९५

सांगितले नाही. मात्र एका कोलामेतराकडून त्या देवतेचे नाव ‘ म्हसोबा ’ असल्याचे कळले. अंदाजाने सांगितलेले हे नाव असावे. ती देवता ‘ ब्रहीस ’ असेल की काय, याबद्दल शंका आहे. कारण तशीही माहिती कुणी दिली नाही.

## ( २२ ) भयरूम

कोलामांची ही देवता सार्वजनिक स्वरूपाची नाही. गृहदेवतेच्या स्वरूपात ती काही कोलामकुटुंबांत आहे.

मराठीतील ‘ बहिरम ’ आणि कोलामी भाषेतील ‘ भयरूम ’ एकच असणे शक्य आहे. ‘ बहिरमा’चे मूळ ‘ भैरवा’त असून कोलामांचा ‘ भयरूम ’ हा ‘ भैरव ’ असणे अशक्य नाही. ‘ दहीत ’, ‘ब्रहीस ’ आणि ‘ भयरूम ’ या देवतांचे तोंडवळे दूरचे असू नयेत !

## ( २३ ) मेटी दियाम

‘ मेड ’ ( =उभे लाकूड ) किंवा ‘ मेढ ’ ( = पळसाचे गोल व उंच लाकूड ) या वऱ्हाडात प्रचलित असलेल्या शब्दाला कोलामी भाषेत ‘ मेटी ’ असा शब्द आहे. पीक निघावयाच्या वेळी ‘ मेढ ’ रोवून व गोलाकार ‘ खळे ’ तयार करून शेतकरी मळणी करतात. कोलामांपैकी काहीजण शेती किंवा शेतमजुरी करतात. ‘ मेढ ’ रोवण्याचा कार्यक्रम कोलामांमध्ये होतो. सर्व कोलाम मिळून ‘ मेढ ’ रोवतात व तिची पूजा करतात. त्या दिवशी ‘ मेढी’ला ‘ मेटी दियाम ’ ( मेटी=मेढ; दियाम=देव ) असे म्हणतात. ही ‘ मेढ ’ रोवण्यापूर्वी कोलाम लोक ‘ आया’ची पूजा न चुकता करतात.

अशी विधिपूर्वक ‘ मेढ ’ रोवल्याशिवाय मळणी करू नये, असा कोलामांमध्ये दंडक आहे. या पूजाविधीच्या पूर्वी कोलाम लोक व्यक्तिशः ‘ मेढ ’ रोवीत नाहीत. साधारणतः दिवाळीनंतरच ‘ मेढ ’ रोवली जाते; त्यापूर्वी रोवली जात नाही. अर्थात ‘ मेटी दियाम’चा म्हणजे ‘ मेढ-देवते’चा उत्सव हिवाळ्यात पीक निघण्याच्या वेळी करण्यात येतो. ज्या भागात कोलाम राहतात, तो भाग साधारणतः तुरी, ज्वारी, मूग, मटकी अशा तऱ्हेची धान्ये पिकविणारा आहे. ही धान्ये दिवाळीनंतर नोव्हेंबर-डिसेंबरमध्ये किंवा त्यानंतरच्या एकदोन महिन्यांत निघतात. ‘ मेटी दियाम’च्या उत्सवाची वेळसुद्धा धान्ये निघण्याचा हा हंगाम सुरू होण्याचीच असते.

## ( २४ ) पेट्टा दियाम

कोलामांच्या वस्तीच्या चार कोपऱ्यांवर चार देव असतात. ‘ गावबांधणी ’ या उत्सवाच्या वेळी ईशान्येकडील कोपऱ्यापासून पूजेस व ‘ गावबांधणी ’च्या आखणीस आरंभ होतो. या कोनास ‘ मुदल कोन ’ असे म्हणतात. या कोपऱ्याची देवता ‘ पेट्टा

दियाम ' या नावाने कोलामांमध्ये असून तिची वर्षातून एकदा सामूहिक पूजा कोलाम लोक करतात. ही पूजा पौषात होते. ह्या पूजेच्या वेळी या देवास बकरा बळी दिला जातो.

## ( २५ ) साटवन

' गावबांधणी'च्या वेळी वस्तीच्या चार कोपऱ्यांपैकी आग्नेय बाजूच्या ज्या कोनाची पूजा कोलाम लोक करतात, त्या कोनास ' साटवन कोन ' असे म्हणतात. त्या कोनाच्या देवतेचे नाव ' साटवन ' आहे की आणखी दुसरे आहे, ते कळू शकले नाही. मात्र या कोनाची देवता ' सटवी ' असल्याची माहिती एका जागी मिळाली, यावरून ' साटवन ' ही देवता ' सटवी'च असावी असे वाटते.

## ( २६ ) मोराम

कोलामांच्या वस्तीच्या नैऋत्य कोपऱ्यात जो देव असतो, त्याला ' मोराम ' असे नाव आहे. ' गावबांधणी 'च्या वेळी ह्या कोपऱ्यास ' मोराम कोन ' असे संबोधण्यात येते व त्याची पूजा देवीच्याही पूर्वी, सर्वात अगोदर केली जाते. त्यावेळी त्याला कोंबडीचे पिलू कापून अर्पण करतात.

मोराम देवाची स्थापना कोलामांची नवीन वस्ती वसते, तेव्हा प्रथम केली जाते. ही पूजा मोठ्या धूमधडाक्याने होते. या देवाला त्यावेळी मेंढा दिला जातो व ' खीस ' ( खिचडा; कांडलेल्या ज्वारीचा शिजविलेला विशिष्ट पदार्थ ) करून नैवेद्य दाखविण्यात येतो. दर तीन वर्षांनी या देवासाठी मेंढाच कापला जातो. कापलेल्या मेंढ्याच्या मांसावर सर्व कोलाम ताव मारतात. ( अधिक माहिती प्र. २, पृ. ७७।७८ वर आलेली आहे. )

या मोराम देवाचा व मोहरम या मुस्लीम सणाचा मुळीच संबंध नाही. काही कोलामांच्या मते मोराम कोन हा माहूरच्या देवीचा मानला जातो.

मोराम देव धनोडी ( ता. यवतमाळ ) या गावी वस्तीच्या आग्नेय कोपऱ्यात मांडलेला दिसतो. एरवी तो नैऋत्येस असतांना येथेच तो आग्नेयेस कसा, हा प्रश्न आहे. कदाचित तेथील कोलामांनी आग्नेय कोनावरील देवाचे नाव चुकून ' मोराम ' असे सांगितले असेल व तीच शक्यता अधिक आहे.

## ( २७ ) महादेव

कोलामांच्या ' गावबांधणी ' उत्सवाच्या वेळी वायव्य कोनाच्या ज्या देवतेची पूजा केली जाते, तिला कोलाम लोक ' म्हादेव ' ( महादेव ) असे म्हणतात. वस्तीच्या त्या कोपऱ्याचे नाव ' महादेव कोन ' असे आहे. या कोनाची पूजा ' गावबांधणी'च्या

दिवशी करतांना तो भाग साफसूफ करण्याची धडपड कोलाम करतात. ' महादेवा 'च्या वाट्याला साफसफाई अधिक येते !

महादेव ही मूळ अनार्यांची देवता असल्यामुळे ती आदिवासींमध्ये असल्यास नवल नाही. गोंड, गोवारी, अस्पृश्य हे तर महादेवाचे परम भक्तच आहेत. गोंड व गोवारी यांच्यामधील ' शेंदरी काठी ' ही सामान्यतः ' महादेवाची काठी ' मानली जाते. या ' काठी'चा, महादेवाचा व ' भिवसना'चा अन्योन्य संबंध असणे अशक्य नाही. कोलामांच्या विवाहातही ही ' महादेवाची काठी ' नाचविली जाते. ( वर्णन पाहा- प्र. ४, पृ. १५३ )

कोलामांमध्ये महादेव ' गावबांधणी'च्या कोन-पूजेच्या निमित्ताने आलेला दिसतो. तसेच वऱ्हाडातील इतर ग्रामीण समाजात आढळणारे श्रावण सोमवारांचे उपवास काही कोलामांमध्ये आढळतात. हे सोमवार महादेवाच्या नावाने केले जातात. कोलामांच्या काही वस्तींची नावे शंकर, गणेश या देवतांना धरून असतात.

मात्र, कोलामांमध्ये महादेवाच्या भक्तीचे अन्य प्रकार बहुधा कोणतेच आढळत नाहीत. यावरून, कोलामांचा महादेव निराळा तर नाही ना ?

गोंडांचा भिवसन हा ' मोठा देव ' किंवा ' बडा देव ' म्हणूनही प्रसिद्ध आहे. आदिवासींशिवाय इतर लोकांमध्येही हे नाव अंशतः प्रचारात आहे. गोंडांमध्ये मोरपंख लावलेल्या उंच काठीला ' भिवसन ' म्हटले जाते; गोवाऱ्यांमध्येही तशीच ' काठी ' नाचविली जाते व कोलामांमधील एका भिवसनाचा असाच साजशृंगार असतो. सात-पुड्यातील महादेव व सालबर्डी ( लहान महादेव ) येथील यात्रांमध्ये ज्या ' काठ्या ' जातात त्या आणि गोंड, गोवारी व कोलाम यांचा भिवसन देव यांत फारसा फरक नसतो. महादेवाचे नावही ' मोठा देव ' व ' बडा देव ' ( महा=मोठा+देव=महादेव ) या अर्थाचेच आहे. तेव्हा, कोलामांचा महादेव वेगळा निघेल असे वाटत नाही. कोलाम लोक महादेवाच्या यात्रेला बहुतेक जात नाहीत. त्यामागे कदाचित त्यांचे दारिद्र्यही कारणीभूत असू शकेल. पण, तसे म्हणावे तर त्यांच्याच आजूबाजूला राहणारे महार, गोंड, गोवारी व इतर कफल्लक लोक पायीच महादेवाला जातात व पायीच येतात. कोलामांमध्ये माहूर-यात्रेशिवाय दूरच्या देवयात्रेला जाण्याची प्रथा व आवड नाही. जवळच्या यात्रेला हौस म्हणून बाजारहाटासारखे फार तर ते जाऊन येतील ! माहूरला सर्वच कोलाम जातात असेही नाही.

### ( २८ ) मारुती

महादेव हा कोलामांच्या ' गावबांधणी ' या मुख्य सणात मानाचे स्थान प्राप्त करून बसलेला आहे; पण मारुतीची मूर्ती मात्र कोलामांनी स्ववस्तीत वा स्ववस्तीशेजारी

कधीच मांडलेली नाही. असे असले तरी कोलाम-वस्तीला जवळ पडणाऱ्या गाव-ठाणातील मारुतीजवळ बरेच कोलाम जातात, नारळ फोडतात, कापूर जाळतात व त्याच्या नावाने शनिवारही करतात. कदाचित, आसपासच्या लोकांच्या संपर्कामुळे ही पूजा कोलाम लोक शिकले असतील! परंतु इतर काही आदीवासींमध्ये हनुमानाची पूजा करण्यात येते. आर्य आणि अनार्य या दोहोंना मारुती पूज्य आहे. मारुती हा अनार्य असून आर्यवीर श्रीरामचंद्राचा भक्त आहे. अनार्यांमधील हनुमंत कोलामांना जवळचा वाटला असेलही! रामचंद्राची पूजा कोलामात नाही; पण मारुतीची आहे, ही विशेषता चिंत्य वाटते! हनुमानाचे प्रतीक म्हणूनच की काय, वानरांना कोलाम मारीत नाहीत व त्यांचे मांस खात नाहीत!

४ : :

## देवतांचे विश्लेषण

कोलामांच्या विविध देवतांची माहिती आपण आतापर्यंत पाहिलेली आहे. यांपैकी काही देवतांचे स्वरूप निश्चितच कोलामजीवनाच्या दृष्टीने सर्वव्यापी व महत्त्व-पूर्ण आहे. उदा० देवी, आया, भीमाय्याक व जयतुर. या देवतांच्या खालोखाल वाघाई, भुताई, पारध्याक, चुराघाली, मेटी दियाम व 'गावबांधणी'तील चारही कोनांवरील देव ( पेट्टा दियाम, मोराम, साटवन, महादेव ) यांचा मान आहे.

देवी, आया, भीमाय्याक, जयतुर, मोराम, मेटी दियाम, पेट्टा दियाम, वाघाई, व चुराघाली यांचे उत्सव सामुदायिक रीतीने पार पडतात. पारध्याक या देवतेला शिकारीच्या वेळी महत्त्व येते. 'गावबांधणी'च्या वेळी पेट्टा दियाम , साटवन, मोराम व महादेव यांची पूजा होते.

दहीत, बहीस, भुताई व जयतुर यांपैकी बहुतेक देवता 'लागट' म्हणजे 'लागणाऱ्या' दिसतात. त्या 'लागल्या' की त्यांचे पूजा वगैरेंचे सोपस्कार करावे लागतात. बऱ्याचशा देवता कोलामांना स्वप्नात येऊन काही बाबी द्यायला व करायला सांगतात. अशी स्वप्ने कोलामांना पडतात व त्यांवर त्यांचा विश्वास असतो. देवतांनी स्वप्नात सांगितले तसे करण्यास कोलाम चुकत नाहीत.

भोवानी व मारुती ह्या देवता इतर जातींमधील आहेत. मारुती व भोवानीची पूजा इतरांप्रमाणेच कोलामांत होते. महादेव, आया व देवी यांचे पूजाविधी वेगळे असल्यामुळे इतर जातींमधील त्या नावांच्या (महादेव, आई व देवी) देवतांसारखेच यांचेही स्वरूप व महात्म्य आहे, असे म्हणण्यात अर्थ नाही. वऱ्हाडी लोकांना मास्या माहीत आहे; पण कोलामांना त्याची पूजाही माहीत आहे. भीमाय्याकाची कोलामांमधील पूजा गोंडगोवाऱ्यांपेक्षा बव्हंश वेगळी आहे. भीमाय्याकाचे काही प्रकारही कोलामांनी पाडले आहेत. देवाला उपहार देण्याचे इतर जातींचे प्रकार व कोलामांचे प्रकार यांतही फरक पडतो. दहीदूध वगैरे 'मवाळ' पदार्थ कोलामांच्या देवांना क्वचित चालतात. त्यांना मांसच हवे असते!

## गृहदेवता

कोलामांच्या जेवढ्या देवता आहेत, त्यांपैकी बहुतेक साऱ्या कोणत्या ना कोणत्या कोलामांच्या गृहदेवता आहेत. कोलामांत चारदेवे, पाचदेवे, सहादेवे व सातदेवे असे एकूण चार कुलसंच आहेत. चारदेवे कुलसंचात मोडणाऱ्या कुळाच्या कोलामांच्या घरी चार देवता असतील. त्यांत एक मुख्य राहील. भीमाय्याक, जयतुर यांसारख्या श्रेष्ठ अशा समूहदेवता गृहदेवता तर असतातच, परंतु माणकूबाई, लाळाबाई, बेक, कारायमेराई, भुताई, सकोबा, सानसुर्याक, चाणखाण, कलासुर, ह्या लहान लहान देवता गृहदेवता म्हणूनच प्रामुख्याने कोलाम लोकांना माहीत असतात. ह्या लहान देवतांचे सामूहिक उत्सव बहुधा होत नाहीत. शेंदरी देवाच्या रूपात प्रायः प्रत्येक कोलामांच्या घरी गृहदेवता विराजमान झालेली असते. गृहदेवतेची वार्षिक पूजा त्या त्या दिवशी चारदोन लोक करतात व आपल्या घरी त्या दिवशी चारदोन लोक जेवू घाल्तात. व्यक्तिगत कोणतेही शुभ कार्य करतांना वस्तीच्या चावडीपुढची देवी व घरचा देव यांना शेंदूर लावून नारळ फोडणे, कापूर जाळणे इ. गोष्टी कोलाम लोक करतात.

'भोवानी' ही एखाद्याच कोलामाची गृहदेवता आहे. 'सावारी' मुसल्मानांकडून घेतली असली तरी कुलदेवतेच्या शेजारी येऊन बसली! मात्र, गृहदेवांच्या यादीत 'सवारी' समाविष्ट झाली नाही! ज्यांच्याकडे ती असेल, तेथे तिचे स्वरूप अतिरिक्त असते.

## 'तांदळी'च्या देवता

'तांदळी पाहण्या'चे काही प्रकार असतात. जळता दिवा हलविता हलविता 'अमुक वस्तू याने चोरली? त्याने चोरली? अमक्याने चोरली?' असे प्रश्न विचारीत जातात. हे काम 'तांदळी पाहणारा' चोरीचा पत्ता लावण्यासाठी करीत असतो. 'तांदळी पाहणाऱ्याच्या' अवतीभवती संबंधित कोलाम असतात. ज्याने वस्तू चोरली असेल त्याचे

नाव घेतल्यास हालता दिवा थांबतो असा समज कोलामांमध्ये आहे. माणकूबाई, लाळाबाई यांसारख्या देवता 'तांदळीं पाहण्याच्या' वेळीं उच्चारल्या जातात. या देवतांच्या स्मरणाने चोरीचा किंवा हरवलेल्या वस्तूचा पत्ता लागतो, असे काही कोलाम मानतात.

'तांदळी'चे अशा तऱ्हेचे प्रकार वऱ्हाडच्या खेड्यांतील इतर जातींतही आढळतात. मात्र, त्या 'तांदळी'च्या संदर्भात वस्तू चोरू शकणाऱ्या लोकांची किंवा हरवलेली वस्तू सापडू शकेल त्या ठिकाणची नावे उच्चारली जातात. याउलट, कोलामांमध्ये विशिष्ट देवतांना त्या कार्यक्रमाच्या वेळीं साक्षीला ठेवले जाते!

## दिक्पती आणि चार कोन

आठ दिशांचे आठ स्वामी असल्यासंबंधी आर्यांमध्ये समजूत होती. त्यांना अष्ट दिक्पाल असे म्हणण्यात येई. कोलामांमध्ये 'गावबांधणी'च्या उत्सवात वस्तीचे चारही कोन पूजले जातात. ह्या चार कोनांवरच्या देवता म्हणजे कोलामांच्या वस्तीचे दिशारक्षकच म्हटले पाहिजेत! पेट्टा दियाम, साटवन, मोराम व महादेव हे कोलामांचे चार दिक्पाल समजायला हरकत नाही.

## साधे व उघड्यावरचे देव

सामुदायिक रीत्या देवपूजनाची कोलामांची पद्धती बव्हंश आगळी म्हटली पाहिजे. कोलामांचे देव कोलामेतरांच्या वस्तीत बहुधा नसतात! यांचे काही देव यांच्या वस्तीत व काही देव यांच्या वस्तीच्या बाहेर असतात. यांचे व इतरांचे देव यांत सरमिसळ होत नाही. (मारुतीचा यास अपवाद आहे.)

कोलामांचे देव कोरीव, कातीव किंवा नक्षीदार नसतात. घडीव मूर्ती ह्या कंगाल लोकांमध्ये असणे शक्य नाही. ओबडधोबड दगड किंवा लाकडे यांचेच देव हे लोक करतात. एखाद्या वेळीं थोडे फोडफाड केलेले दगड देवासाठी उपयोगात आणले जात असतील; परंतु त्यामुळे त्या देवाला उत्तम आकार येतोच असे नाही. कोलामांचा सुतारही कधी लाकडी देव थोडा आकारयुक्त करण्याचा प्रयत्न करील; पण त्यामुळे देवतांचे सौंदर्य वाढते, असे नाही. खरे म्हणजे यांचे देव अगदीच साधेसुधे!

कोलामांच्या देवावर देऊळ दिसणार नाही. स्वतःचे घर नीट नसलेला कोलाम देवाला देऊळ कुठले करणार? बहुतेक देव अगदी उघड्यावर असतात. नाही म्हणावयाला एखाद्या झाडाखाली देव मांडलेला असल्यास तेवढाच निवारा त्या देवाला मिळतो. फक्त वस्तीतील 'आया' ही देवता मात्र एका झोपडीत असते. या झोपडीत 'भगता'च्या 'अंगात देव येतो' तेव्हा भाविक लोक नवसादिकांच्या निमित्ताने जमतात. कोलामांचे हे देऊळच असते. त्यांच्या घरात व या देवळात फरक नसतो.

कोलाम लोक ह्या 'देवघरा'ला 'गुडी' (= देऊळ), 'दियाम गुडी' (दवाचे देऊळ) किंवा 'दियाम एल्ला' (देवाचे घर) असे आपल्या भाषेत म्हणतात.

## देवतांच्या स्थानमानाचे महात्म्य

कोलामांचे बहुतेक सारे देव अनंत काळापासून एकाच जागी असले तरी 'गावबांधणी'च्या दिवशी कोलामवस्तीमधील देव मुख्य देवीजवळ आणून ठेवतात व 'गावबांधणी' संपल्यावर पुन्हा जागच्या जागी नेऊन ठेवतात. हे उचलण्या–ठेवण्याचे काम फक्त कोलामच करू शकतात. इतरांनी केल्यास त्यांच्या धर्मभावना दुखविल्या जातात. वस्तीबाहेरचे देव मात्र कधीच उचलले जात नाहीत. आदिवासींना आपल्या देवता किती प्रिय असतात, या बाबतीत कळंब (ता. यवतमाळ) येथील एक घटना उल्लेखणे आवश्यक ठरेल. इ. स. १९६३ च्या शेवटी शेवटी कळंब येथील पंचायत समितीचे बंगले बांधण्यासाठी दक्षिणेकडील गोठाणावरील जागा घेण्याचे ठरले. ही जागा सरकारी आहे. या जागेत 'धनाई' नावाची आदिवासींची देवता उघड्यावर मांडलेली आहे. गायीगुरांना 'धन' असे म्हणतात. हे 'धन' राखण्याचे व चारण्याचे काम गोवारी ही आदिवासी जमात करते. दिवाळीत गायींचा महोत्सव खेड्यात साजरा होतो. गावातील सर्व गायी खेळविल्या जातात. कळंबच्या ह्या कार्यक्रमाचे केंद्र गायीगुरांची देवता 'धनाई' हेच असते. 'धनाई'पुढे गोवारी लोक नाचतात, बागडतात, नारळे फोडतात व सेरण्या वाटतात. गोवाऱ्यांच्या गायी खेळवितांना डफ-पावे वाजविण्याचे काम कोलाम लोक करतात. त्यावेळी तेसुद्धा 'धनाई'ची पूजा करतात. 'विकासा'चे बंगले बांधण्यासाठी जागा हवी म्हणून या 'धनाई'ला उचलण्याचा प्रयत्न झाला तेव्हा गोवारी, गोंड व कोलाम चिडले आणि ते प्रकरण जिल्हा-परिषदेच्या अध्यक्षांपर्यंत गेले! ती देवता तेथेच असावी असा निर्णय प्रत्यक्ष त्या स्थळी येऊन अध्यक्षांनी दिला. तात्पर्य हे की, आपल्या देवांच्या स्थानमानाचे महात्म्य आदिवासींना अपार वाटते!

कोलाम लोक हे महात्म्य बरोबर पाळतात. रजस्वला स्त्रीची गृहदेवतांवर सावलीही पडू नये, याची काळजी घेण्यात येते. ती घरात फिरकतही नाही. तसेच रजस्वला स्त्रियांनी कोणत्याही देवाजवळ जाऊ नये वा त्यास शिवू नये, ही गोष्ट कटाक्षाने पाळली जाते. ही गोष्ट इतर जातीजमातींतही पाळली जाते. कोलामांच्या वस्तीत त्यांचे देव असतात, म्हणून इतर जातीच्या लोकांनी सायकलसुद्धा घेऊन त्या वस्तीत जाऊ नये, (कारण सायकलीचे टायर कातड्याचे असतात, असे कोलामांना प्रामाणिकपणे वाटते.) देवाजवळ चपलाजोडे नेऊ नयेत, असा नियम कोलामांमध्ये आहे. 'गावबांधणी'च्या वेळी पाच दिवसपर्यंत जोडेवाहणा देवाजवळ कुणीही नेणे हा कोलामांच्या नियमांप्रमाणे गुन्हा आहे.

## पारधवृत्तीची व निसर्गभयाची भावना

आदिकाळात आणि अज्ञ अवस्थेत निसर्गाला देव मानण्याची प्रथा होती. समज आलेला व लिखित वाङ्मय जाणणारा समाजच निर्गुण–निराकार देवाकडे वळतो. तरीही तो सगुणमूर्तीचा भोक्ता उरतोच! आदिवासी बोलूनचालून रूढ व पारंपरिक जीवन जगणारे! त्यांच्याजवळ वाङ्मय नाही व लिपीही नाही. साक्षरतेचा त्यांना गंधही परवापरवापर्यंत नव्हता. अर्थात त्यांच्या देवता निसर्गात, दगडांत, लाकडांत, झाडांत आणि अशाच गोष्टींत असणार! म्हणूनच कोलामांच्या देवता दगड, लाकूड यांच्या असल्याचे दिसून येते.

कोलामांच्या गुणवैशिष्ट्यांचाही परिचय त्यांच्या देवतांवरून मिळू शकतो. कोलाम स्त्रिया स्वतंत्र रीतीने सण साजरे करून कोंबडीचे पिलू वगैरे कापतात, यावरून त्या स्त्रियांच्या निर्भय वृत्तीची व स्वतंत्ररीत्या काम करू शकण्याच्या पात्रतेची कल्पना येते. शिकार, मांसाहार यांत कोलामांची गती असून त्यांच्या काही देवतांनी त्यांना पारधप्रवीण केलेले दिसते! याउलट वाघाई, भुताई, मास्या यांसारख्या त्यांच्या जीवनात नित्य भेडसावणाऱ्या वस्तु-प्रतीक-देवतांचे ते पूजक आहेत. भुताखेतांवरील श्रद्धेची ती प्रतीके असून निसर्गभयाची भावना अशा देवपूजेमागे असते, हे नव्याने विशद करण्याची गरज नाही.

५ : :

## सणवार व उत्सव

कोलाम लोक जे सण व उत्सव साजरे करतात त्यांत व इतरांच्या सणोत्सवांत काही साम्ये आढळत असली तरी दोहोंच्या रीतिरिवाजांमध्ये बराच फरक असतो. कुणबी, शेतकरी, गोंड व गोवारी यांच्या सणांच्या दिवशी कोलामांचे बरेच सण असतात, हे खरे आहे. साहचर्य व सान्निध्य यांच्यामुळे हे झाले असावे. कोलामांच्या नित्यसंबंधात बहुसंख्य लोक कुणबी, शेतकरी, गोंड व गोवारी हेच असतात. त्यामुळे त्यांच्या सणोत्सवांतील काही गोष्टी कोलामांनी घेतल्या असणे शक्य आहे. तरीपण, कोलामांचे सर्व सणवार, उत्सव व कुळाचार ह्या सर्वांचा सविस्तर विचार करावयाचा झाल्यास एखादा स्वतंत्र ग्रंथसुद्धा अपुरा पडेल.

## सणोत्सवांची नामावली

कोलामांच्या सणोत्सवांची यादी पुढे दिली आहे :—

| सणोत्सवाचे नाव | साजरा करण्याचा काळ |
| --- | --- |
| १. फणमोडी (कोलामी नाम–कोरोड, खोरोड) | चैत्र शु. प्रतिपदा ( वर्षप्रतिपदा ) |
| २. मोहडोंबरी ( कोलामी नाव–बुर्री, भुर्री ) | अक्षय्यतृतीया किंवा कधीकधी वर्षप्रतिपदा |
| ३. गावबांधणी ( कोलामी नाव–साती ) | वैशाख ते ज्येष्ठ या महिन्यात सोयीप्रमाणे केव्हाही |
| ४. मास्या ( कोलामी नाव–चुराघाली ) | बहुधा उन्हाळ्यात केव्हाही |
| ५. चैत ( आईची पूजा ) | चैत्र पौर्णिमा |
| ६. भीमाय्याकाला बी देणे ( कोलामी नाव–बायबाकी ) | पाऊस येण्यापूर्वी २–३ दिवस अगोदर किंवा पाऊस सुरू झाल्यावर २–३ दिवसांनी; गावबांधणीच्या आगेमागे |
| ७. बायकांनी आईला स्वतंत्रपणे पूजणे | 'बायबाकी'च्या दिवशी |
| ८. भीमाय्याकाची आंबोळ | वैशाख |
| ९. मोराम देवाचा उत्सव | नव्याने वस्ती वसवितांना; नंतर दर तीन वर्षांनी |
| १०. वाघाईची पूजा | आषाढी पौर्णिमा |
| ११. जयतुर देवाची पूजा | श्रावण महिन्याच्या दोनतीन दिवस अगोदर किंवा श्रावण संपल्यावर दोनतीन दिवसांनी |
| १२. 'कारगुल' व 'काष्टाफेडी' | नागपंचमी |
| १३. नागपंचमी | |
| १४. फूलझडणी किंवा झाडपेरणी | |
| १५. पोळा | पोळा |
| १६. 'अतारी'– 'अथारी' | पोळ्यानंतर |
| १७. अखरपख ( पितृमोक्ष अमावास्या ) | पितृमोक्ष अमावास्या |
| १८. दसरा | दसरा |
| १९. दिवाळी | दिवाळी |
| २०. मोहरम | मोहरम |
| २१. 'मेटी दियाम' | हिवाळा |
| २२. 'पेट्टा दियाम' | पौष महिना |
| २३. आईची पूजा | माघ महिना |
| २४. होळी | होळी |

वर जे सणोत्सव सांगितले आहेत त्यांपैकी बहुतेक सणोत्सव कोलामांमध्ये सामूहिक स्वरूपातच पार पाडले जातात. फार थोडे सण त्यांनी अन्य समाजापासून घेतलेले आहेत. तेच फक्त अंशतः व्यक्तिगत व अंशतः सामुदायिक स्वरूपात पाळले जातात.

वरील यादीत दिलेल्या सणोत्सवांपैकी काहींची माहिती यापूर्वी येऊन गेलेली आहे. मास्या ( पृ. १८५ ), चैत ( पृ. १७१–७२ ), भीमाय्याकाला बी देणे–बायबाकी ( पृ. १७७–८२ ), बायकांनी स्वतंत्रपणे देवीला पूजणे ( पृ. १७७–८२ ), भीमाय्याकाची आंघोळ ( पृ. १७८ ), वाघाईची पूजा ( पृ. १७४–७५ ), जयतुर देवाची पूजा ( पृ. १८३–८४ ), मेटी दियाम ( पृ. १८७ ), पेट्टा दियाम ( पृ. १८७–८८ ) व आईची माघपूजा ( पृ. १७१–७२ ) यांच्यासंबंधीची माहिती याच प्रकरणात देवदेवतांच्या वर्णनात आलेली आहे. मोहरम हा मुसलमानांचा सण हिंदूंमध्ये आलेला असून तो कोलामांत किती प्रमाणात व कशा स्वरूपात आहे, त्यासंबंधीचे विवेचन याच प्रकरणात ( पृ. १७६–७७ ) येऊन गेले आहे. तसेच मोराम देवाच्या उत्सवाची माहिती सदरहू प्रकरणात ( पृ. १८८ ) आणि कोलामांच्या वस्तीविषयक प्रकरणात ( प्र. २, पृ. ७७–७८ ) आलेली आहे. माहिती येऊन गेलेल्या या सणोत्सवांचे स्वरूप सामुदायिक आहे. मोहरमाचे स्वरूप अंशतः सामुदायिक व अंशतः व्यक्तिगत आहे. ज्या सणोत्सवांची माहिती येऊन गेलेली आहे, त्यांची ओळख या ठिकाणी पुन्हा देण्यापेक्षा, ती न देता, पुनरावृत्ती टाळली आहे.

उरलेल्या सणोत्सवांपैकी गावबांधणी हा कोलामांचा सर्वात मोठा उत्सव असून त्याखालोखाल फणमोडी, मोहडोंबरी आणि नागपंचमीची फूलझडणी या सामूहिक उत्सवांचे महत्त्व आहे. कोलामांचे हे सणोत्सव बहुतांशी स्वतंत्र आहेत. पोळा, नागपंचमीची वारूळपूजा, पितृमोक्ष अमावस्या, दसरा, दिवाळी व होळी हे सण कोलामांनी इतरांपासून उचललेले आहेत, असे वाटते. तरीही हे सण साजरे करतांना कोलामांची काही वैशिष्ट्ये दिसून येतात. इतरांपासून घेतलेल्या सणांचे स्वरूप काहीसे घरगुती आहे; तर दिवाळी, होळी यांसारख्या सणांत कोलामांनी सामुदायिकता आणली आहे.

## फणमोडी

वर्षप्रतिपदा साजरी करण्याची एक वेगळी पद्धत वऱ्हाडी शेतकऱ्यांमध्ये आहे. सूर्योदयाच्या वेळी शेतात वखर घालून मशागतीची सुरुवात करण्याच्या निमित्ताने शेतजमिनीची पूजा वऱ्हाडी शेतकरी करतात. या सणाला शेतकऱ्यांमध्ये ' साजुणी ' असे नाव प्रचारात असून या सणाचा उद्देश भूमिपूजा हा आहे.

साधारणतः कोलामांमधील ' फणमोडी ' सणाचे स्वरूप काहीसे असेच आहे. कोलामांचा हा सणसुद्धा चैत्र शुद्ध प्रतिपदा ( वर्षप्रतिपदा ) याच दिवशी असतो.

वर्षप्रतिपदेपासून शेताचे नांगरण-वखरण सुरू व्हावयाचे असते. कापणी-मळणी आधीच आटोपलेली असते. शेते उलंगलेली ( पिकांविरहित झालेली ) असतात. आता, नांगर-वखर घालून शेतामधील उभ्या 'फणां'ना वा फणकटांना 'मोडण्याचे' ( = पिकाची बुडाकडील राहिलेली निरुपयोगी बुरखंडे काढून टाकण्याचे ) काम करावयाचे असते. या संदर्भात कोलामांचा 'फणमोडी' हा सण प्रचारात आला आहे.

'फणमोडी' हे नाव कोलाम लोक मराठीभाषिकांना सांगत असले तरी, या सणाचे नाव त्यांच्या भाषेत 'कोरोड' किंवा 'खोरोड' असे आहे.

कोलामांमध्ये बरेच लोक स्वतःची शेती नाहीत, असेच असायचे ! त्यामुळे 'फणमोडीची'चा कार्यक्रम कोलामांचा जो 'महाजन' ( पंचमंडळाचा उपाध्यक्ष ) असतो, त्याच्या शेतात करण्याची प्रथा पडली आहे. किंबहुना, 'फणमोडी' हा सण म्हणजे 'महाजनाचा मान' असा विश्वास कोलामांमध्ये आहे.

कोलामवस्तीतील काही कोलाम वर्षप्रतिपदेच्या दिवशी भल्या पहाटे उठून त्यांच्या 'महाजना'च्या शेतात जातात. 'महाजना'कडे शेती नसेल, तर दुसऱ्या एखाद्या शेतकरी कोलामाच्या शेतात जातात. शेतात गेल्यावर ते कोलाम काही फणकटे गोळा करतात आणि त्या फणकटांचा एक ढीग करून तो पेटवून देतात. हा कार्यक्रम सूर्योदयापूर्वीच आटोपतो. तेवढ्यात सूर्योदयाची वेळ होते. सूर्योदय होत असतांना, ज्या जागी फणकटांचा ढीग पेटविलेला असेल त्या जागेची पूजा हळद, कुंकू, अक्षता इ. वस्तूंनी ते कोलाम करतात. नंतर सकाळी सात-साडेसात वाजेपर्यंत ते घरी येतात.

जंगलात शिकारीला जाऊन वर्षप्रतिपदेचा हा दिवस कोलाम अगदी आनंदात घालवितात. शिकारीला निघण्यापूर्वी, सकाळीं सुमारे नऊदहा वाजता, वस्तीबाहेर असलेल्या 'आई' या देवतेजवळ सर्व कोलाम जातात. तिची ते पूजा करतात. शिकार करावयाचा मोठा सोटा प्रत्येकाजवळ असतो. या सोटयाने डुकरासारखी जनावरे मारण्याची सवय कोलामांना असते. प्रत्येक कोलाम आपला सोटा 'आई'पुढे ठेवून देतो. समुदायातील एका कोलामाने आधीच कोंबडीचे एक अंडे सोबत आणलेले असते. ते अंडे एका कपड्यावर बांधून 'आई'पुढे धरले जाते. त्या अंड्याकडे पाहून 'घऱ्या' ( कोलामांच्या पंचमंडळातील एक व्यक्ती ) हावभाव करून आपल्या भाषेत जोराने ओरडतो —

"सशा ऽऽ ला ऽऽ"

त्यासरशी बाकीचे ओरडतात—

"आला, आला ऽऽ
येतो, येतो ऽऽ"

—आणि ओरडता ओरडताच ते बाकीचे लोक त्या अंड्याला मारू लागतात.

पुन्हा ' घस्या ' जोराने म्हणतो—
" हरणा ऽऽ ला ऽऽ "

त्यासरशी बाकीचे ओरडतात—

" आले, आले ऽऽ
येते, येते ऽऽ "

—आणि ओरडता ओरडताच ते बाकीचे लोक त्या अंड्याला मारू लागतात.

अशा तऱ्हेने, शिकारीत सापडणाऱ्या बहुतेक साऱ्या प्राण्यांची नावे संपेपर्यंत वरीलप्रमाणे सवालजबाबांची फैर झडते. कमीत कमी पाच प्राण्यांची नावे उच्चारली जातात व त्यांच्या बाबतीत वर उल्लेखिल्याप्रमाणे प्रश्नोत्तरांची प्रक्रिया घडते.

चांगली शिकार मिळावी व ती ' आईमाय'ने मिळवून द्यावी अशा अपेक्षेने अंडे फोडण्याचा विधी पूजेच्या या प्रकारात केला जातो, हे स्पष्टच आहे. ' सशाला, हरणाला ' असे म्हणतांना ' सशाला मारूया, हरणाला मारूया ' असे सुचवावयाचे असते; तर ' आला आला, येतो येतो ' अशा तऱ्हेचे आवाज काढण्यात ' तो प्राणी आलाच किंवा येतोच आणि शिकार सापडतेच ' असे म्हणावयाचे असते.

' आई'ची अशी पूजा आटोपून कोलाम लोक आपापल्या घरी जातात. ते आंबील पितात व थोडे जेवण करतात. नंतर ते सर्व मिळून शिकारीसाठी जंगलात जातात. जंगलात भटकून शिकार पकडण्याचा त्यांचा कार्यक्रम सायंकाळी साडेचार-पाच वाजेपर्यंत चालतो.

शिकार आणावीच ही अपेक्षा असते. शिकार साधल्याशिवाय रिकाम्या हातांनी शिकारी परत आले तर त्यांना वस्तीतील इतर जातिबांधव ( जे शिकारीला गेले नसतील ते ) वस्तीत शिरू देत नाहीत. कधीकधी शिकाऱ्यांना वस्तीबाहेरच रात्र काढावी लागते.

नंतर परत आल्यावर ते सर्व जण एका विशिष्ट जागी बसतात व आणलेली संपूर्ण शिकार भाजून काढतात. भाजून झाल्यावर तिचे समान वाटे करतात व प्रत्येक कोलामास देतात. ते घरी नेऊन शिजवविण्याचा आणि त्यावर चंगळ करण्याचा कार्यक्रम त्या रात्री घरोघर होतो.

वर्षप्रतिपदेच्या दिवशी सायंकाळी किंवा रात्री ( अथवा सोयीच्या वेळी ) वस्तीचे सर्व कोलाम एकत्र जमतात व नव्या वर्षासाठी न्याय-व्यवस्था मंडळातील कार्यकर्त्यांची निवड करतात. ( या निवडणुकीची माहिती ' न्याय, नीती आणि गुन्हेगारी ' या ७ व्या प्रकरणात विस्ताराने येईल. )

## मोहडोंबरी

कोलामी भाषेत ह्या सणाला ' बुर्री ' किंवा ' भुर्री ' असे नाव आहे. ह्या सणामध्ये मोहांचे महात्म्य असते, म्हणून कोलामांनी मराठी लोकांसाठी ' मोहडोंबरी ' हे नाव ' बुर्री ' किंवा ' भुर्री ' या सणास दिले आहे.

काही कोलाम हा सण ' फणमोडी ' या सणासोबत वर्षप्रतिपदेला करतात. ' फणमोडी ' व ' मोहडोंबरी ' हे दोन्ही सण एकाच दिवशी साजरे करण्याची प्रथा कळंब व धनोडी ( ता. यवतमाळ ) या गावांतील कोलामांमध्ये आढळली. वेळेची व खर्चाची बचत व्हावी म्हणून ही सुधारणा केली गेली असणे अधिक शक्य आहे. इतरत्र कोलाम लोक ' मोहडोंबरी'चा हा सण अक्षय्यतृतीयेच्या दिवशी साजरा करतात.

' मोहडोंबरी ' साजरी करण्यासाठी प्रत्येक कोलाम-वस्तीत दीडदोन पायली सुके मोह आधीच गोळा करण्यात येतात. तसेच कोलामांच्या घरातून प्रत्येकी एकएक शेर चारोळीं व एकेक आणा वर्गणी जमा करण्यात येते. हे काम कोलामांच्या पंचमंडळातील ' घऱ्या ' करीत असतो. कोलामांची वस्ती असलेल्या जंगली भागात मोह व चारोळीं ह्या दोन्ही वस्तू मुबलक मिळतात.

' मोहडोंबरी'च्या आधल्या दिवशी किंवा त्याआधी मोहचारोळीं गोळा करतांना किंवा ' मोहडोंबरी 'ची चर्चा करतांना त्या सणाच्या आगमनाचा आनंद वस्तीत निर-निराळया तऱ्हेने व्यक्त होतो. ' मोहडोंबरी'संबंधीच्या पुढील त्रोटक गाण्यात हाच भाव दिसेल:—

| कोलामी | मराठी |
|---|---|
| सावडी बोद्देत तांद केरी केरी | चावडीपुढच्या अंगणात कशाचा गलबला ! |
| – तोल्लीने भुर्री आंडा ! | –' मोहडोंबरी ' आहे उद्याला ! |

तिजेला ( अक्षय्यतृतीयेला ) येणाऱ्या ' मोहडोंबरी'च्या दिवशी कोलाम पुरुष शिकारीसाठी जंगलात जातात. फणमोडी, मोहडोंबरी आणि इतरही सणांच्या वेळी शिकारीस निघतांना एक रूढी कटाक्षाने पाळण्यात येते. पुरुष शिकारीस गेल्याशिवाय स्त्रियांनी कामास सुरुवात करू नये, अशी ती रूढी आहे. शिकारीस निघतांना स्त्रीवर्ग दिसल्यास अपशकुन होतो, अशी भावना या रूढीमागे असावी. पुरुषीपणाच्या प्रदर्शनाच्या वेळी बायकी बाबींचे मुळी दर्शनच नको ! पुरुष शिकारीस जाण्यापूर्वी बायकांनी काजळ आणि कुंकू नव्याने लावून साजशृंगार करू नये, अशीही कोलाम पुरुषांची त्या काळात अपेक्षा असते. पुरुष म्हणतातच—

" काजळ लावाल तर कान्ही जाईल ! "
" कुंकू लावाल तर गेरवा जाईल ! "

—अर्थ हा की, रूढी मोडून काजळ लावण्याचा गुन्हा एखाद्या स्त्रीकडून घडल्यास त्या वर्षी ज्वारीच्या कणसांना ‘ कान्ही ’ नावाचा रोग होईल आणि कुंकू लावण्याचा गुन्हा झाल्यास गव्हावर ‘ गेरवा ’ हा रोग येऊन गव्हाचे पीक नासेल! शिकारीस जाणारे सर्व कोलाम पुरुष वस्तीच्या चावडीपुढे जमल्यावर शिकारीस निघून जातात. ते वस्तीबाहेर गेल्यानंतरच कोलामिणी पाणी वगैरे आणायला निघतात.

शिकारीचा कार्यक्रम आनंदाने हास्यविनोदात पार पडतो. सामुदायिक गीते गायली जातात. आनंदगीते गातगात दुपारभर शिकार चालते. हरणे, बाटरे, ससे, रानडुकरे अशा तऱ्हेचे प्राणी मारून सायंकाळी वस्तीत आणतात. ते मृत प्राणी वस्तीतील चावडीपुढील विशिष्ट जागी भाजून काढतात आणि नंतर त्यांचे हिस्से पाडून ते प्रत्येक कुटुंबास वाटून देतात. वाटणी करण्यापूर्वी ते सर्व मांस ‘देवी’ला नैवेद्य म्हणून दाखवितात.

हिस्सेवाटणीचे वरील काम सुरू असतांना काही कोलाम स्त्रिया पूर्वी जमवून ठेवलेले मोह घरातच भाजून घेतात. ते भाजलेले मोहो व जमविलेली चारोळी नैवेद्य दाखविण्याच्या वेळी ‘देवी’जवळ आणतात. त्यावेळी वस्तीतील सर्व कोलाम स्त्रीपुरुष तेथे जमतात. जमविलेल्या वर्गणीतून गूळ, साखर, तीळ व पानसुपारी आणलेली असते. गूळ, साखर, तीळ व चारोळी यांचा प्रसाद तयार करण्यात येतो. हा प्रसाद तयार करण्यापूर्वी, जमविलेल्या चारोळीतून गावाच्या पाटलाचा हिस्सा अलग काढून ठेवतात. तो काढून ठेवल्यावर ‘देवी’पुढे जमलेल्या सर्व कोलाम स्त्रीपुरुषांना प्रसाद म्हणून दोनतीन इसम तो चारोळीयुक्त प्रसाद वाटतात. सोबत भाजलेले मोहही वाटतात. वाटून झाल्यावर ‘ घट्या ’ सर्वांसमोर उभा राहून त्याच्या पद्धतीने एक छोटेसे भाषण करतो. ते भाषण तीनचार वाक्यांपेक्षा मोठे नसते. त्या भाषणात, “ चूकभूल माफ करा; मिळून राहा ” असाच काहीसा तो उपदेश करतो. भाषण संपल्यावर तो सर्वांना मोठ्याने विचारतो, “ प्रसाद सगळ्यांना मिळाला ? कोणाला मिळाला नाही ? ” एखाद्याला मिळाला नसल्यास ‘ घट्या ’ त्याला प्रसाद देण्याची व्यवस्था करतो. त्यानंतर ती गोड चारोळी व भाजलेले मोह यांचा प्रसाद सामुदायिकपणे ग्रहण करण्याचा कार्यक्रम होतो.

दुसऱ्या दिवशी डफ-पावे यांच्या तालावर नाचत नाचत कोलाम लोक गावच्या पाटलाकडे, त्याच्या हिश्शाची चारोळी मानाने पोचवून देतात. पाटीलसुद्धा हा एक मानच समजतो व चारोळी कमी असल्यास तो कधीकधी कोलामांवर रुसतोसुद्धा!

वऱ्हाडात बहुसंख्य जातींमध्ये ‘ अखजी ’ किंवा ‘ तीज ’ या नावाने अक्षय्यतृतीयेचा सण साजरा करतात. मांडे, चिंचवणी, आमरस वगैरे पदार्थांचे या सणात महात्म्य असते. विशेष हे की, या सणाच्या दिवशी चारोळी टाकल्याशिवाय चिंचवणी व आमरस हे पदार्थ करीत नाहीत. या दोन्ही पदार्थांमध्ये चारोळी टाकावी, अशी

रीत आहे. कोलाम आणि कोलामेतर अशा तऱ्हेने एकाच दिवशी येणाऱ्या सणांमध्ये चारोळी वापरून अंशतः साम्य ठेवतात; परंतु दोन्ही जमातींच्या सण पाळण्याच्या पद्धतीत यान्यतिरिक्त साम्य नाही. कोलामांचा 'मोहडोंबरी' हा सण कोलामेतरांच्या 'अखजी'हून अगदीच वेगळा आहे. 'वोहर' किंवा 'पितर' जेवू घालण्याची कोलामेतरांमधील रीत कोलामांत मुळींच नाही. कोलामेतरांच्या या दिवशीच्या जेवणातील मांडे, कुरड्या, गुरोळ्या, चिंचवणी, आमरस हे प्रामुख्याने आढळणारे पदार्थ कोलामांत एरवीही करीत नाहीत व अक्षय्यतृतीयेच्या वा 'मोहडोंबरी'च्या सणानिमित्तानेही त्या अन्नपदार्थांना शिजविले जात नाही.

## गावबांधणी

कोलामी भाषेत या सणाचे नाव 'साती' असे आहे. मराठी लोकांना सांगण्यासाठी 'गावबांधणी' हे नाव तयार करण्यात आले आहे व कोलामेतरांना 'गावबांधणी' हेच नाव माहीत आहे.

'गावबांधणी' हा कोलामांचा सर्वांत मोठा असा सणोत्सव आहे. त्यामुळेच त्यांच्या या सणात अधिक आनंद येतो. कोलामांचे इतर सण क्वचित चुकू शकतील· परंतु 'गावबांधणी' चुकू शकत नाही. आवश्यक स्वरूपाचा हा उत्सव असून त्याला कोलामांच्या वार्षिक धार्मिक स्नेहसंमेलनाचे रूप येते. भजनांच्या 'जागृत्या' (=रात्रभर भजन करून जागण्याचे कार्यक्रम) जशा वारकऱ्यांमध्ये होतात, तशी कोलामांची ही 'गावबांधणी' म्हणजे एक 'जागृती'च असते. कोलाम लोक बहुतेक सारे सणोत्सव एकत्र मिळून करतात. 'गावबांधणी'त हे संघटन आणि सहकार्य कळसास पोहोचते.

'गावबांधणी'चा उत्सव वैशाख मासाच्या आरंभापासून तर ज्येष्ठातील पौर्णिमेपर्यंत केव्हाही एकदा पार पाडला जातो. हा उत्सव ठरीव तारखेलाच केला पाहिजे, असा नियम नाही. साधारणतः एप्रिल–मेच्या दरम्यान वस्तीतील कोलाम व त्यांचे मुख्य लोक एकत्र जमतात आणि आपसात विचारविनिमय करून पुढचा सोयीचा दिवस 'गावबांधणी'साठी मुक्रर करतात. त्या दिवशीची आमंत्रणे दुसऱ्या गावच्या आपापल्या नातेवाईकांना देतात. जवळपासचे नातेवाईक या 'साती'च्या उत्सवाला येतात. 'आंब्याच्या रसाला' (=उन्हाळयात आंब्याच्या रसाच्या मेजवानीसाठी) नातेवाईक बोलावणे जसे वऱ्हाडात 'अपरूक' मानले जाते, तसेच 'गांवबांधणी'च्या वेळी कोलामांकडे नातेवाईक बोलाविले जातात. त्यावेळीं प्रत्येक घरी एक ना एक पाहुणा असतोच.

'गावबांधणी'साठी एकमेकांच्या गावी जाता यावे, म्हणून जवळपासची गावे आपल्या 'गावबांधणी'च्या तारखा शक्यतोवर वेगवेगळ्या ठरवितात. उदाहरणार्थ,

१९६४ साली रासा या गावच्या कोलामांची 'गावबांधणी' गुरुवार दि. ११ जून रोजी झाली; तर जवळच्या दोन मैलांवरील कळंबच्या कोलामवस्तीत हाच उत्सव बुधवार दिनांक १७ जून रोजी झाला. सुभानहेटी या केळापूर तालुक्यातील खेड्याची 'गावबांधणी' शनिवार दि. ३० मे रोजी झाली. एकंदरीत 'गावबांधणी'चे उत्सव उन्हाळ्यात मे-जूनच्या दरम्यान होत असतात, हे यावरून दिसून येईल.

ही 'गावबांधणी' नवीन वसलेल्या कोलामवस्तीत पहिली तीन वर्षे होत नाही. मोरामदेवाची पूजा करून वस्ती वसविल्यावर तीन वर्षांनी त्या वस्तीत 'गावबांधणी' साजरी होते. नवीन वस्ती झाल्यावर सोयीसवलती उपलब्ध होण्यासाठी एवढा अवधी आवश्यकच ठरतो! एकदा सुरळीत जीवन सुरू झाल्यावर 'गावबांधणी'च्या निमित्ताने वस्तीतील सर्व ज्ञातिबांधवांचे स्नेहसंमेलन घेणे, हे औचित्याला धरूनच आहे. कोलामांच्या इतर वस्तींत 'गावबांधणी' दरवर्षी न चुकता होते.

भीमाय्याकाची वैशाखपूजा (माहिती पृ. १७७-८२ वर आली आहे) व 'गावबांधणी' जवळपासच्या अंतराने साजरी करण्याची प्रथा सोयीच्या दृष्टीने पडली. आठपंधरा दिवसांचे अंतर या दोन सणांत ठेवावे, असा संकेत आहे. बहुतेक आठच दिवसांचे अंतर ठेवतात. दोन्ही सणांच्या तारखा अंदाजाने व सोयीने ठरविल्या जातात. दोन्ही सणांसाठी एकदाच वर्गणी वसूल करतात व दोन्ही सणांमध्ये कापावयाचे दोन बकरे त्या वर्गणीतून एकाच वेळीं विकत घेण्यात येतात. कधीकधी या दोन सणांतील अंतर कमीजास्त होते. पण असे कमी वेळा घडते.

वस्तीला व वस्तीतील लोकांना कोणत्याही रोगराईचा त्रास होऊ नये, क्रूर प्राण्यांनी वस्तीत शिरून त्रास देऊ नये आणि बाहेरच्या भुताने वा देवाने पछाडू नये या दृष्टीने हा 'गावबांधणी'चा उत्सव करण्यात येतो. 'गाव बांधून काढले' की, भुतेखेते, बाहेरचे देव व रोगराई बाहेरच्या बाहेरच राहून गावबांधणुकीच्या आत येत नाहीत अशी या लोकांची ठाम समजूत आहे.

हा सण पार पाडण्यासाठी 'भगत' अत्यावश्यक असतो. त्याचा मान 'गावबांधणी'च्या दिवशी फार असतो. एखाद्या कोलामवस्तीत 'भगत' नसेल तर दुसऱ्या कोलामवस्तीतून त्याला आणविण्याची व्यवस्था करण्यात येते. प्रत्येक कोलामवस्तीत 'भगत' असतो असे नाही. एखाद्या कोलामवस्तीत तो नसतोही!

'गावबांधणी'चा उत्सव दोन दिवस चालतो. पहिल्या दिवशी सायंकाळी ४-५ वाजता 'गाव बांधून काढण्या'पासून या उत्सवाची सुरुवात होते. वस्तीमधील देवीला शेंदूर लावून तिची पूजा करण्यात येते. तेव्हा एक बकरा कापला जातो. बकरा व कोंबडे कापण्याचा मान नाईकाचा असल्यामुळे तोच हे काम करतो. बकरा किंवा कोंबडे कापून

ज्या देवीला अर्पण करतात, ती कोलामांची मुख्य देवता जी ‘देवी’, तीच असते. रसेल-हिरालाल म्हणतात[१] त्याप्रमाणे ती ‘सीता’ मुळी नसतेच !

नाईकाने कापलेल्या बकऱ्याचे आतडे व एक तंगडी त्या मृत बकऱ्याच्या तोंडात अडकवून विशिष्ट तऱ्हेने देवीपुढे टांगून ठेवतात. देवीपुढे जांभळीच्या पानांचा एक लहानसा मांडव तयार केला जातो. तो एखाद्या झोपडीसारखा दिसतो. ‘गाव-बांधणी’चा उत्सव देवीपुढेच प्रामुख्याने पार पडतो. ही देवी ‘चावडी’च्या पुढील अंगणात, वस्तीच्या मध्यवर्ती जागी असते, व ती माहूरच्या देवीची प्रतिकृती असते, हे आपण यापूर्वी पाहिलेच आहे. (पृ. १६८-७१) ‘चावडी’पुढील ‘आगटी’त अग्नी पेटविण्यात येतो व तो अग्नी रात्रभर धगधगत असतो.




---

१. Russell, Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, ( London, 1916 ), पृ. ५२४

देवीची पूजा करून झाल्यावर सूर्य बुडण्याच्या संधानात किंवा त्याच्या थोडे अगोदर ' गाव बांधला ' जातो. गाव बांधून काढणे म्हणजे वस्तीभोवती रेषा काढून गाव बंद करून टाकणे ! ही ' बांधणी ' मंत्रतंत्रांच्या साह्याने ' भगता'कडून विधियुक्त होत असते.

पृ. २०३ वरील आकृतीत दर्शविल्याप्रमाणे ' गाव बांधला ' जातो. देवीची पूजा करून प्रथम सर्वजण वस्तीच्या ईशान्य कोपऱ्यावर जातात. या कोपऱ्यास ' मुदलकोन ' असे म्हणतात. प्रत्येक कोनावर लाकडाचा उलटा नांगर रोवण्याची प्रक्रिया प्रथम या कोनावर होते. या कोनावरची कोलामांची देवता ' पेट्टा दियाम ' या नावाने ओळखली जाते. या देवतेची व उलट्या नांगराची हळदीकुंकवाने पूजा केली जाते आणि त्यांना शेंदूर लावला जातो. या कोनापासून ' गाव बांधणे ' सुरू होते. ह्या कोनावर तीन दगडांमध्ये एक मेख ( = खुंटी ) गाडण्यात येते. ह्या खुंटीच्या व दगडांच्या खाली एक कोंबडा किंवा कोंबडीचे पिलू पुरण्यात येते. कोनांची व देवांची पूजा करण्यासाठी वस्तीचा पुजारी ( दियाला, देवकरी ) पुढे असतो. त्याच्याजवळ एक मोठा भाला असतो. त्या भाल्याने रेषा आखीत आखीत तो पश्चिमेकडे वस्तीच्या काठाकाठाने चालत जातो. इतर सर्व कोलाम वस्तीच्या बाजूने, रस्त्याच्या आतल्या भागाने असतात. पुजाऱ्याबरोबर ते आतल्या बाजूने चालतात. आधीच कापलेल्या बकऱ्याच्या रक्ताने चौदा द्रोण भरलेले असतात. त्यांतील सात ' बाहेरचे ' ( ' वाकाला ' ) व सात ' आतले ' ( ' लोपाला ' ) असतात.[१] ते चौदा द्रोण चौदा माणसांजवळ प्रत्येकी एकेक याप्रमाणे देतात. त्यांपैकी सात माणसांना आतल्या बाजूने व सात जणांना रेषेच्या जवळून बाहेरच्या दिशेने चालावे लागते. दुसऱ्या एकाजवळ घोंगडी असते. घोंगडीच्या घडीत मीठ किंवा वाळू असते. आणखी एकाजवळ सूप व खुंट्या असतात. खुंट्या ठोकणारा प्रत्येक कोनावरच्या तीन दगडांमध्ये खुंटी ठोकून मजबूत करीत जातो. रक्ताचे द्रोण घेतलेले कोलाम रक्त शिंपडत जातात. ' बाहेरचे ' द्रोण घेतलेले बाहेर शिंपडतात व ' आतले ' द्रोण घेतलेले आत शिंपडतात. मीठ वा वाळू घेतलेली व्यक्ती मीठ वा वाळू हातात धरून आखीव रेषेवर टाकीत नेते.

वरीलप्रमाणे चालत चालत सर्व कोलाम वायव्य कोनावर येतात. ह्या कोनाची साफसफाई करण्यात येते. ह्या कोनाला ' महादेव कोन ' असे नाव आहे. उलटा नांगर, तीन दगड, खुंटी व त्याखाली पुरावयाचा कोंबडा किंवा कोंबडीचे पिलू ह्या बाबी येथेही असतात. पूर्वीच्या कोनाप्रमाणेच ह्याही कोनाची पूजा होते व पूर्वीप्रमाणेच रक्त शिंपीत, वाळू वा मीठ टाकीत व रेषा आखीत ते कोलाम दक्षिण दिशेकडे, वस्तीच्या पश्चिमेकडून पुढे चालू लागतात. रेषा आखीत जाणारा पुजारी भाल्याच्या साह्याने गाव बंद करीत नेतो किंवा ' गाव बांधत ' जातो !

---

१. कोलामी भाषेतील शब्द : वाकाला – बाहेरचे; लोपाला – आतले

नैऋत्येकडील कोनास ' मोराम कोन ' असे म्हणतात. या कोनावरील मोराम देवतेचे महात्म्य फार आहे, हे मागे आले आहे. (प्र. २, पृ. ७७-७८ व प्र. ५, पृ. १८८) वस्ती वसवितांना ह्या देवाची पूजा सर्वप्रथम केली जाते. ' गावबांधणी'पूर्वीही त्याची पूजा पहिल्यांदा झालेली असते. केवळ त्या बाबीचे स्मरण म्हणूनच ' गावबांधणी'च्या दिवशी सर्वात अगोदर, देवीची पूजा होण्याच्या पूर्वी, दुपारी या मोराम देवाची व त्याच्या कोनाची पूजा करण्यात येते आणि त्यास कोंबडीचे पिलू दिले जाते. 'गाव बांधतांना' पुजारी आणि कोलाम पुन्हा या कोनावर येत असल्यामुळे मोराम देवाला एकाच दिवशी दोनदा पूजालाभ होतो. या दुसऱ्या वेळी ' मुदल ' व महादेव ह्या दोन कोनांवरील पूजेप्रमाणेच येथेही पूजा होते आणि रक्त शिंपीत व वाळू किंवा मीठ टाकीत ही मंडळी पूर्वेकडे चालत जाते. पुजारी भाल्याने गावाला बंद करण्याची रेषा पुढे सरकवीत नेत असतोच !

वस्तीच्या आग्नेय कोनावर ते सर्व कोलाम येतात. त्या कोनाला ' साटवन कोन ' असे म्हणतात. या कोनावरही पूर्वोक्त विधी होतात. पूर्वीच्या तीन कोनांप्रमाणेच या चौथ्या कोनावरील सोपस्कार आटोपून ते सर्व लोक उत्तरेकडे चालू लागतात. रेषा-आखणीचे काम सुरूच असते. वस्तीच्या पूर्व बाजूच्या मध्यावर (पृ. २०३ वरील आकृती पाहा) एक बैलगाडी जाण्याजोगी वाट ठेवून ही रेषा मुदलकोनाला भिडविण्यात येते. या रस्त्यावर दोन बाजूंना दोन उलटे नांगर चार कोनांप्रमाणेच बसविले जातात. असे एकून सहा जागी सहा नांगर बसविण्यात येतात व चार कोनांवर तीन-तीन दगडांमध्ये एकेक मेख पक्की केली जाते. शेतकामातून जुने झालेले तुटके नांगर ' गावबांधणी'च्या वेळी उपयोगाला येतात. सहा तुटके नांगर न मिळाल्यास, कमी पडलेल्या कोनांवर नांगरासारखे लाकडी तुकडे बसवितात.

गाव ' बांधून काढण्या'च्या या प्रक्रियेतील आखीव रेषेला ' बंदेश ' असे नाव असल्याची माहिती ' ज्ञानकोशा'त (हिरालाल-रसेलच्या आधारे) दिलेली आहे.[1] परंतु हा शब्द प्रचारात असल्याचा अनुभव मात्र नाही.

वर दिलेल्या प्रक्रियेप्रमाणे संपूर्ण कोलाम-वस्तीच्या भोवताल रेषा आखून पूर्ण केल्यावर सर्व कोलाम जेथून निघाले त्या मुदलकोनावर आपोआपच येतात. हातात सूप व खांद्यावर सब्बल घेऊन पुजारी त्या कोनाच्या तीन दगडांवर उभा राहतो. बाजूला ' भगत ' असतो. बाकी सगळे कोलाम आतल्या बाजूस राहतात. ' भगता'कडे व आतल्या लोकांकडे पाहत पुजारी म्हणतो—

माहुर्ता देवी वात्तिवा ? (माहूरची देवी आली काय ?)

त्यावर ' भगत ' म्हणतो—

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

वात्तार वात्ताना । ( आली ! आली !! )

नंतर पुजारी म्हणतो—

झाडाच्या पोकळीवरच आली काय ?

त्यावर ' भगत ' होकारार्थी उत्तर देतो—

वात्तार वात्ताना ।

नंतर पुजारी पुन्हा म्हणतो—

धुंटारी वात्तिवा ? ( दगडांवरच आली काय ? )

' भगत ' उत्तरतो—

वात्तान ! ( होय ! )

याप्रमाणे पोकळी, दगड, पान अशासारख्या वस्तू उच्चारल्या जातात. देवी कशावर आली ? –असे विचारण्याचा भाव त्यात असतो. माहूरची देवी कोलामांना सर्वांत अधिक पूज्य आहे व तिलाच या दिवशी प्रामुख्याने आवाहन केले जाते. त्याशिवाय गावोगावच्या देवी, देवदेवता आल्या काय, असेही प्रश्न वरील पद्धतीने विचारून त्यांची उत्तरे दिली जतात.

वरील सर्व प्रश्नोत्तरांची पुनरावृत्ती तीनतीन वेळा त्या मुदलकोनावर करण्यात येते. नंतर चावडीपुढे देवीजवळ दोन वेळा तीच प्रश्नोत्तरे पुन्हा होतात.

ही प्रश्नोत्तरे संपतात न संपतात तोच डफ वाजविणारे कोलाम जोराने वाद्यध्वनी करतात. पाव्यांचे सूर आवाजात मिसळतात. त्या आवाजासरशी ' भगताच्या अंगात देव येतो ' व तो घुमू लागतो. त्या भरात ' भगत ' एकटाच चारही कोनांवर जाऊन ' देव ' पाहून येतो. बाकीचे कोलाम देवीजवळच थांबतात. ' भगत ' आणि त्याच्या-बरोबरची एकदोन माणसे वस्तीच्या आत असलेले दगडांचे सारे देव जमा करून आणतात आणि देवीजवळ एकत्र करून ठेवतात.

त्यानंतर देवीजवळच रात्रभर जागून नाचण्याचा कार्यक्रम आरंभ होतो. ' गाव बांधून झालेले ' असते ! आता भुतेखेते, क्रूर प्राणी व रोगराई यांना आत येणे शक्य नसते ! ! त्या सीमांच्या आत कोलाम लोकांनी आनंदाने अगदी बेहोश होण्याला आता सुरुवात होते !

' गाव बांधून झाल्यावर ' कोणताही कोलाम त्या बांधणीच्या बाहेर ' गाव-बांधणी'चा उत्सव संपेपर्यंत जाऊ शकत नाही. बाहेरच्या चुकल्यामाकल्या कोलामाला आत येण्यासाठी पूर्वेची वाट असते. परंतु ' गावबांधणी'च्या दिवशी कोणताच कोलाम वस्तीबाहेर नसतो व असलाही तरी तो चारपाच वाजायच्या आतच वस्तीत परत येतो. उशिरा 'गांवबांधणी'च्या आत येणारा कोलाम आजवर तरी आढळला नाही.

आनंदोत्सवाच्या वेळी बाहेर राहील कोण ? शिवाय तो त्यांचा धर्मविधी आहे. तो टाळणे म्हणजे धार्मिकतेला तड जाणे, अशी भावना कोलामांमध्ये असते.

'गावबांधणी'च्या या उत्सवात एक विशिष्ट नियम पाळण्याची एकप्रकारे सक्तीच असते ! तो न पाळल्यास कोलामांच्या दृष्टीने तो गुन्हा होतो. असा गुन्हा करणारास कोलाम लोक दंड करतात. तो नियम असा आहे की, 'गाव बांधून' झाल्यावर त्या दिवशी, त्या रात्री आणि दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत त्या आखीव रेषेच्या आत कुणीही बाहेरील माणूस ( कोलामेतर ) जाऊ शकत नाही. 'कोलामेतरांना ही रेषा ओलांडण्याची सक्त मनाई आहे' अशी ताकीदच जाहीर रीतीने ओरडून दिली जाते. इतकेच नव्हे तर, काही घोटाळे होऊ नयेत म्हणून बऱ्याच 'पोडां'वरचे ( = कोलामवस्तींमधील ) कोलाम आधीच पोलीसठाण्यात जाऊन 'गावबांधणी'चा दिवस नोंदवितात. 'त्या दिवशी कुणी इतरांनी आत येऊ नये; आल्यास त्यांना आमच्या धर्मनियमांप्रमाणे शिक्षा होईल' असे ते पोलिसांना स्पष्टपणे सांगून टाकतात. कोलामांना लिहिता येत नसल्यामुळे आजवर त्यांनी स्वतः लेखी निवेदन दिले नाही, ही मात्र वस्तुस्थिती आहे. तोंडी निवेदने देऊन ती नोंदविण्याची पद्धती काही कोलामांत आहे.

या 'गावबांधणी'त रेषा ओलांडून जाता येत नाही; रात्री तर अजिबातच नाही! तरीपण, अपवाद म्हणून एखाद्या चाहत्या व सज्जन व्यक्तीला 'गावबांधणी' पाहायला म्हणून कोलामांच्या नाईकाच्या परवानगीने आत घेतले जाते. परंतु त्या नवागत व्यक्तीने फक्त पूर्वेकडील मोकळ्या जागेतून आत यायला हवे. त्याने प्रथम त्या वाटेवर उभे राहून जोराने हाका मारायला हव्या आणि कोलामांच्या नाईकाची परवानगी घ्यायला हवी. ती परवानगी मिळाली तरच अनवाणी आत जाता येते. नाईक एक काठी घेऊन त्या वाटेवर रेषा मारतो व ती रेषा मोडल्यासारखे करतो. त्यानंतर नवागत त्या जागेवरून आत प्रविष्ट होतो.

सज्जन लोक कोलामांचे हे धर्मनियम मोडीत नाहीत. उत्सुकता म्हणून जाणारी व्यक्ती वस्तीची 'बांधणी' होण्यापूर्वीच आत जाऊन थांबते आणि कार्यक्रम संपल्यावर वस्तीबाहेर येते. त्या विशिष्ट प्रवेशद्वारातून खास अनुमतीने प्रेक्षक म्हणून इतरास आत सोडण्याची कधीकधी व्यवस्था करण्यात येते, ती प्रेमाने व सद्भावनेने ! त्यांच्यावर वस्तुतः तशी जबरदस्ती करता येत नाही. कोलाम ज्या भागात राहतात, त्या भागातील जवळच्या लोकांना 'गावबांधणी'ची ही प्रथा व तीमधील दंडक यांची थोडीबहुत कल्पना असते. त्यामुळेच त्यांच्या बाबतीत घोटाळे बहुधा होत नाहीत.

'गावबांधणी'च्या वरील दंडकाच्या रूढीला कोलामांच्या दृष्टीने अर्थही आहे. बाहेरची रोगराई, भुतेखेते यांचा बंदोबस्त करण्यासाठी 'गाव बांधलेले' असते.

इतके करूनही ‘ गाव बांधल्या’च्या पहिल्याच रात्री बाहेरून जे काही येईल ते भूत किंवा रोगराईच असणार, ही त्यांची मनोमन धारणा असते ! म्हणूनच ‘ गाव बांधणी’च्या आत कुणी येणे अगदी अशुभ मानले जाते ! जो कोणी येईल तो मूर्तिमंत भूत, बाहेरचा लागट देव किंवा रोगच असतो, ही कोलामांची ठाम समजूत असते व ही ‘ अरिष्टे ’ येऊ नयेत म्हणून तर ही ‘ गावबांधणी ’ असते ! रोगराईला आणि आरिष्टांना आळा घालण्याची ही रीत मनोरंजक खरी; पण तत्त्वतः ती बरोबर आहे.

‘ गावबांधणी ’ उल्लंघिण्याच्या गुन्ह्याला कोलाम लोक फार महत्त्व देतात. तो त्यांच्या अतीव श्रद्धेचा विषय आहे. एरवी गोगलगायीप्रमाणे जगणारे कोलाम, ‘ गाव-बांधणी ’ तोडण्याचा गुन्हा करणारा हमरीतुमरीवर आला तर मारामारी करायला तयार होतात. त्यांच्या श्रद्धेला तड जाता कामा नये. दर्ग्यावरून, मशिदीवरून वाद्ये वाजवीत नेली तर मुसलमानांच्या धार्मिक भावना दुखविल्या जातात. कोलामांची ‘ गावबांधणी ’ तोडून कुणी आत शिरल्यास त्यांच्याही धार्मिक भावना मनस्वी दुखावल्या जातात. खुद्द पोलीस, अधिकारी, पाटील इ. लोकांनीसुद्धा हा नियम मोडू नये अशी कोलामांची अपेक्षा असते. परंतु कधीकधी पोलिसांकडून ही ‘ बांधणी ’ तोडली जाते व त्याचे पर्यवसान हातघाईवर येण्यात होते, हे १९६४ च्या ३० मे रोजी केळापूर तालुक्यातील सुभानहेटी येथे झालेल्या ‘ गावबांधणी’च्या दिवशी घडलेल्या एका अनुचित प्रसंगावरून दिसून येईल. त्या दिवशी परवानगीशिवाय ‘गावबांधणी’त पोलीस शिरले. प्रकरण हातघाईवर आले आणि त्याचा परिणाम दि. ३ जून रोजी कोलामांवर पोलिसांकडून गोळीबार होण्यात व कोलामांची धरपकड करण्यात झाला, हा इतिहास ताजाच आहे !

कोलामांची ‘ गावबांधणी ’ कुणी तोडू नये, हा झाला नियम ! परंतु ही रेषा ओलांडून चुकूनमाकून एखादा कोलामेतर आत शिरला व अशा रीतीने अनवधानाने वा माहिती नसल्याने ‘ गावबांधणी तोडली ’ तर त्यावर उपाय काय ? त्यालाही काही नियम कोलामांनी पूर्वीपासूनच तयार करून ठेवले आहेत. हे नियम परंपरेने जुन्या काळापासून चालत आलेले आहेत.

‘ गावबांधणी तोडण्याचा ’ गुन्हा कुणाकडून घडलाच तर प्राचीन काळी त्याला देवीपुढे बळीच देत असत, असे ऐकीव माहितीच्या आधारे कोलाम सांगतात. कोलामांच्या रूढ परंपरेचा तो कायदा होता, असे म्हटले जाते. परंतु अशा प्रकारे नरबली दिल्याचे प्रत्यक्ष पाहिलेला एकही कोलाम किंवा कोलामेतर आता आढळत नाही, त्याअर्थी अनेक वर्षांपासून ही प्रथा बंद झाली असावी. मात्र यासंबंधी कोलामां-मध्ये एक कथा प्रचलित आहे, तीवरून प्राचीन काळी ‘ गावबांधणी तोडणाऱ्यां’ना बळी देण्याची प्रथा कोलामांत असली पाहिजे, असे वाटते. ती कथा अशी—

एकदा एका डोंगरी 'पोडा'ची 'गावबांधणी' सुरू होती. एक प्रवासी चुकून तीत शिरला. त्याला भूत समजून कोलामांनी देवीपुढे उभे केले. बकरा कापतांना करतात तशी त्याची पूजा केली व त्याला कापला! कापून त्याचे तुकडेतुकडे केले आणि त्याची 'मुंडी' देवीपुढे ठेवली!

परंतु 'पोडा'बाहेरच्या एका कोलामेतराने ही भयानक गोष्ट पाहिली. त्याने गावातील पाटील आणि इतर लोकांना तेथे बोलावून आणले. त्यांनी चौकशी सुरू केली. त्यापूर्वीच कोलामांनी कापलेल्या माणसाची 'मुंडी' टोपल्याखाली झाकून ठेवली होती. कोलाम लोक चौकशीमुळे घाबरले. त्यांनी देवीची मनःपूर्वक प्रार्थना करून त्या कठीण प्रसंगातून निभावण्याची तिला विनवणी केली. आणि काय आश्चर्य? पाटील आदि मंडळींनी टोपले उचलून पाहिले, तो त्याखाली बकऱ्याचेच मुंडके दिसले!

–या कथेचा भावार्थ हा की, कोलामांमध्ये 'गावबांधणी' तोडणाऱ्या गुन्हेगारांना बळी देण्याची प्रथा पूर्वी कधीतरी असावी. अर्थात कोलाम लोक जेव्हा जंगलात अगदीच एकाकी राहत असतील, तेव्हाच त्यांच्यात उपर्युक्त प्रथा प्रचारात असण्याची शक्यता आहे. उतनूर ( जि. आदिलाबाद ) भागातील घनदाट जंगलांत असलेल्या कोलाम–वस्तींमध्ये क्वचित नरबली दिले गेले असल्याची ऐकीव माहिती त्या भागातील काही शिक्षकांमध्ये आहे.

हल्ली रस्त्यापासून दूर असलेल्या अगदी आतल्या डोंगरी 'पोडा'ची 'बांधणी' कुणी 'तोडली' तर त्याला खांबाशी वा झाडाशी बांधून ठेवतात. त्याने गुन्हा कबूल करून दंड भरण्याची आधीच तयारी दर्शविली तर त्याला बांधतसुद्धा नाहीत. उलट, 'बांधणी'तच रात्रभर ठेवतात, गंमत व नाचगाणे पाहू देतात आणि दुसऱ्या दिवशी जेवण वगैरे देऊन झाल्यावर मानाने त्याची रवानगी करतात. गुन्हा करणारे सामुदायिकपणे भांडायला उठले तर मात्र कोलामांची व त्यांची मारपीट होते. तीसचाळीस वर्षांपूर्वी गुन्हा कबूल न करणारांना कोलाम लोक बांधून ठेवीत, त्यांची हळद, कुंकू व अक्षता वाहून पूजा करीत आणि सकाळी मोकळे करीत. अशा गुन्हेगारास एखादे टेंगूळ वगैरे असल्यास तो अपशकुन समजून त्यास न बांधता अलग बसवीत! त्याचा गुन्हा त्याला माफ करण्यात येई.

परंतु हे असे 'गावबांधणी' तोडणारे गुन्हेगार सहसा आढळत नसत. कारण धार्मिक विधीची बूज कोणताही धार्मिक आणि सज्जन माणूस ठेवतोच! अशा कार्याच्या वेळी अरेरावी करण्याची गरजच काय? विनाकारण कुणाला त्रास द्यावा किंवा भांडणे उकरून काढून अशा श्रेष्ठ सणाच्या दिवशी स्वतःला कटकट करवून घेण्याच्या मनःस्थितीत कोलाम मुळीच नसतात.

'गावबांधणी' चुकून 'तोडणाऱ्या' लोकांना दंड झाल्याची उदाहरणे मात्र आढळतात. कित्येकदा 'गावबांधणी'चा दिवस परगावच्या कोलामेतरांना माहीत नसतो.

त्यामुळे काही कामाच्या निमित्ताने ते चुकून ' गावबांधणी'त शिरतात. असे गुन्हेगार अनवधानाने आले असल्यामुळे ते आपली चूक ताबडतोब कबूल करतात व नियमानुसार दंडही भरतात. कोलामांनी अशा प्रकारे जास्तीत जास्त पंधरावीस रुपये दंड मागितल्याचे ऐकिवात आहे. तेवढा किंवा त्यापेक्षा जास्त दंड आजवर मागितल्याचे वा गुन्हेगाराने भरल्याचे कुणीच सांगत नाही. त्यामुळे सुभानहेटी–' गावबांधणी '-प्रकरणात पोलिसांना पाचशे रुपये दंड मागितला, ह्या ४ जून १९६४ च्या बातमीत अवास्तवता आणि अतिरंजितता आहे हे तेव्हाच पटते ! फक्त आपल्या जमातीतील चोर, डाकू, जार वगैरे धोकादायक माणसांना कोलाम प्रथम गाव सोडून जाण्याची शिक्षा सुनावतात; तर हे धंदे सोडून देण्याची कबुली दिल्यास आजकाल त्यांचे नाईक दोन-अडीचशे रुपये दंड मागतात. पण जातीबाहेर कायमचे दूर जाण्याच्या भीतीने तसे गुन्हे कोलामांमध्ये क्वचितच घडतात. वीसपंचवीसपर्यंत आकडेही धड न मोजता येणारे आणि एवढे रुपये बहुधा दृष्टीस न पडणारे कोलाम बरेच आहेत. ते पाचशे रुपये दंड ' गावबांधणी'च्या संदर्भात मागू शकतात, हे असंभवीयच आहे !

कोलाम जात नीतिधर्माच्या बाबतीत स्वजातीशी कठोर असली तरी, इतरांशी नेहमीच प्रेमळ आणि नम्र असल्याचे आढळते. पाटलांच्या आणि कुणब्यांच्या नोकऱ्या त्यांनी मोठ्या इमानाने केल्या आहेत. इतरांशी त्यांचे संबंध नेहमीच घरोब्याचे राहिले आहेत. तेव्हा, अशा स्थितीत पोलिसांकडून पाचशे रुपये दंड मागितल्याची बातमी कपोलकल्पित तरी म्हणावी लागेल किंवा अपवाद म्हणून सोडून द्यावी लागेल ! ( मला वाटते, सुभानहेटी खटल्याचा १९६५ च्या उन्हाळ्यात निकाल लागून त्यात कोलामांना निर्दोष सोडण्यात आले. .शासन आणि पोलीस यांचा हा पराभवच ! त्यातून कोलामांच्या या संदर्भातील नियमांना तपासण्यास मदत होईल. )

एकदा एका जंगली ' पोडा'च्या अगदी काठून एक ट्रक जाऊ लागला. त्या दिवशी तेथे ' गावबांधणी ' होती. कोलामांनी धावत जाऊन तो ट्रक अडविला. ड्रायव्हरला काय झाले हे उमगण्यापूर्वीच ट्रकवरील एका कामगाराने पूर्वानुभवाच्या आधारावर दहा रुपयांची एक नोट कोलामांना देऊन टाकली. कोलामांनी आनंदाच्या भरात डफांच्या तालावर नाचत ट्रकला जाण्यासाठी वाट करून दिली आणि ट्रकवरील माणसांना हजारो मुजरे केले.

परंतु हे एक उदाहरण सोडले तर कोलाम दहा रुपयेसुद्धा मागत नाहीत असे आढळते. नेहमीची पद्धत खालीलप्रमाणे आहे. गुन्हा कबूल करणारास ते म्हणतात—

" दे पाच रुपये ! आहेत का ? "

गुन्हेगार गरीब असला तर त्याच्याजवळ एवढे पैसे नसतातच.

कोलाम म्हणतात–– " दोन रुपये काढ. "

तेही वेळेवर नसले तर कोलाम म्हणतात--
" निदान नारळशेंदुरासाठी पाच आणे तरी दे बाबा ! "
झाले ! संपला त्यांचा दंड ! !

अनुभव असा आहे की, ' गावबांधणी तोडणाऱ्या ' बहुतेक सर्वच गुन्हेगारांना पाचच आणे दंड झाला आहे ! आणि अशा धार्मिक कार्यासाठी पाच आणेच काय, एखाददुसरा रुपया द्यायला कुणी नाकबूल होईल असे वाटत नाही. उलट, खुशीनेच एवढे देणे योग्य होईल.

एकदा एका गुराख्याने आपली बैलगाडी चुकून ' गावबांधणी'जवळून नेली. कोणत्यातरी कोनावरील देवाला ती लागली. कोलामांच्या हे लक्ष्यात येताच त्यांनी बैलगाडीवाल्यास दंड मागितला. परंतु त्याच्याजवळ एक पैसासुद्धा नव्हता. अखेर कोलामांनी म्हटले, " मग तू आपली टोपीच देवीपुढे ठेवून दे ! " गुराख्याने तसे केले आणि सगळ्यांनी त्याची रिवाजाप्रमाणे हळद–कुंकू–अक्षतांनी पूजा केली.

ह्या गोष्टींचा मथितार्थ हा आहे की, दंडाच्या रकमेबद्दलचा आग्रह कोलाम मुळींच धरीत नाहीत; तर त्या उत्सवाबद्दल दाखवावयाच्या आदराविषयीची अपेक्षा तसे करण्यामागे अभिप्रेत आहे. ' गावबांधणी ' आणि त्यांच्या देवीची ही सर्वश्रेष्ठ पूजा यासाठी जीवसुद्धा द्यायला कोलाम तयार असतात, इतकी त्यांची अलोट आणि अमाप श्रद्धा या सणावर आणि देवीपूजेवर आहे. अशा स्थितीत कोलामेतरांनी केवळ ' मान ' म्हणून दंडाची रक्कम देऊन समंजसपणा दाखविण्यातच औचित्य आहे. त्यात त्या गरीब व भोळ्या लोकांचे समाधान असते ! दंड न देणारावर कोलाम कधी सूड उगवीत नाहीत. इतर वेळींही ही जात कधी मग्रुरीने वागत नाही. असो.

' गावबांधणी'ची आखणी संपल्यावर काही कोलाम आपापल्या घरी जाऊन थोडेसे साधे जेवण करतात. काहींनी आपले जेवण दुपारी तीनचार वाजताच आटोपलेले असते. ' भगता'च्या अंगातील देव उतरण्याची पहिली फेरी संपली की कोलाम लोक आळीपाळीने जेवण करण्यासाठी मोकळे होतात. रात्री ७–८ वाजेपर्यंत अशा प्रकारे सर्वांची जेवणे आटोपतात. ' भगता'च्या अंगातील ' देव उतरण्या'च्या पहिल्या फेरीला ' पहिला घट ' असे म्हणतात. रात्री आठ-साडेआठ वाजेपर्यंत चावडीसमोरील देवीच्या अंगणात सर्व कोलाम स्त्री-पुरुष जमतात. पाहुणे, मुलेबाळे सगळे तेथे येतात. चारपाच वाजेपासूनच लोक जमायला सुरुवात झालेली असते आणि काहीजण आधीपासूनच कार्यक्रमांमध्ये गुंतलेले असतात.

त्या रात्री देवीजवळ दंडार, गमतीजमती, नृत्ये, वाद्ये, गीते इत्यादि बाबींचा जल्लोष चालतो. बहुतेक कोलाम आळीपाळीने नाचतात आणि आपली हौस भागवून घेतात. पुरुष, मुले व कधीकधी स्त्रियाही नाचतात. डफ-पावे वाजविणारेही

आळीपाळीने काम करतात. रात्रभर नृत्य, गाणे, वाजविणे सुरूच असते. दारूबंदी नव्हती तेव्हा कोलाम मोहाची दारू पिऊन तर्र असत. मोहाची झाडे त्यांच्या 'पोडां'च्या परिसरात आणि जवळच्या डोंगरांवर कमी नाहीत. मोह वेचणे हा तर कोलामांचा एक प्रमुख धंदा! त्यामुळेच मोहाची दारू काढणे त्यांना सहजसुलभ होते आणि म्हणूनच बहुतेक सगळ्या उत्सवांमध्ये मुख्य पेय म्हणून मोहाची दारू असे. आनंदाने धुंद झालेल्या स्थितीत गोलाकार फिरून नृत्य चालते. लगतच 'आगटी' पेटलेली असते. काही पुरुष लुगडी नेसून स्त्रियांचे पेहेराव करतात व नाचतात. एकमेकांच्या खांद्यांवर हात ठेवून, तर कधी हातांनी अभिनय करीत हे लोक नृत्य करतात. डफ, पावले (=पावे) व कधीकधी ढोलकी, बासरी, छोटे शिंग यांच्या संमिश्र स्वरूपाच्या आवाजात डफांचा 'धबडधबड, धबडदाम धबडदाम, दिडी दाम—दिडी दाम' असा आवाज उठून ऐकायला येतो व पाव्यांची 'तुही तुही तुही तू--तुही तुही तुही तू' अशी मंजुळ सुराणी त्या आवाजात मिसळून जाते. ह्या आवाजावर फेर धरधरून नाचणारे कोलाम रात्रभर अगदी बेभान होऊन रंगतात! त्यातच मधूनमधून एकमेकांच्या पाठीवर जोराने थापा मारून 'भलेऽऽ' 'शाबासऽऽ' असे ओरडतात, शिट्या वाजवितात किंवा तालावर तसे आवाज काढतात आणि गाणी गातात. रात्रभर वाद्ये, दंडार, नृत्ये, गाणी व आवाज यांचा ताल बिघडत नाही. एकसंध तालावर त्या दिवशी कोलाम लोक जीवनरसाचे मधुघट ओतओतून, भरभरून घेतात! 'गावबांधणी' पाऊस सुरू झाल्यावर असली तर या कार्यक्रमात अधिकच रंग भरतो. उघड्यावरील झोपड्यांमध्ये राहणाऱ्या या जमातीला उघडा वर्षाकाळ बहारदार वाटणार नाही, तरच नवल! बेभान होऊन नाचनाच नाचणाऱ्या कोलामांच्या साथीला मेघवर्षा असली तर त्या लोकांचा उत्साह शिगेला पोचतो. पावसाच्या सरींनी त्यांच्या नृत्याला भरते येते. 'अधिक पाऊस, अधिक उत्साह' असे त्यावेळचे सूत्र असते. कार्यक्रमाच्या वेळी पाऊस येणे ही गोष्ट कोलाम अत्यंत आनंदाची व शुभ मानतात. त्यांच्या दुर्दैवाने त्यावेळी पाऊस आला नसला तर कृत्रिमरीत्या पावसाचे वातावरण कोलाम तयार करतात. प्रेक्षक आणि नाचे लोक घागरी भरभरून डोक्यावरून पाणी आणतात. ते पाणी ओतून अंगणात मुद्दाम चिखल करतात. मग त्या चिखलात नाचण्यात त्यांना खरी मौज वाटते. निसर्गाने चिखल केला तर बहारच, पण न केला म्हणून काय बिघडले? मानवी प्रयत्नांनी निसर्गाचे वातावरण तयार करता येत नाही असे थोडेच आहे?

वस्तीतील सगळ्यांनीच रात्रभर जागे राहिले पाहिजे अशी अपेक्षा असते. खऱ्या अर्थाने 'गावबांधणी' ही 'जागृती' ठरावी, हा त्यामागचा हेतू असतो. त्यामुळे कुणी झोपल्यास त्याला उठविण्याचा प्रयत्न होतो. चिमटे घेणे, अंगावर पाणी ओतणे, कधीकधी चिखल फेकणे आणि चाटूने (= लाकडी पळीने) झोपलेल्याच्या तोंडांत कढी ओतणे ह्या प्रकारांनी झोपी गेलेला जागा करण्यात येतो.

नृत्यासोबत कोलाम लोक गीते गातात. ' गावबांधणी'च्या वेळीं पुढील पद्धतीची गीते गातात—

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| माहुरता देवी तांदुंग वात्तिना<br>तांदुंग तोदा ?<br>—बारा मेनेला पुंजा<br>तिने वात्तिन ! | १ | माहूरची देवी कशाला आली—<br>नि कशाला नाही ?<br>बारा महिन्यांची पूजा<br>( एकदम ) घ्यायला ! | १ |
| आउरा पिल्लाकुल इउरा पिल्लाकुल<br>तांदुंग कुळतेरा तांदुंग तोदा ?<br><br>—साती ओलेंगे वात्तेव ! | २ | त्या गावच्या बायापोरी, या<br>गावची पोरेबाळे, कशाला<br>जमली नि कशाला नाही ?<br>' गावबांधणी'-उत्सव पाहायला ! | २ |

' गावबांधणी'च्या या उत्सवातील गीतांमध्ये ' भगता'ची टिंगल उडविणारी विनोदी गीतेही असतात. " नदीच्या काठी कासव चरतो ! मात्र इकडे ' भगत ' पोट खोल गेले म्हणून चरत फिरतो ! ! "-अशा अर्थाचे एक गीत असून ' चरत फिरण्या-वर ' नर्मविनोद केलेला असतो. गावडुकर हा गावभर चरत फिरतो, असे तेथे म्हणावयाचे असते.

पहाटे चारच्या सुमारास दुसरा 'घट' होतो, म्हणजे 'भगता'च्या अंगात दुसऱ्यांदा ' देव येतो. ' त्यानंतर वस्तीतील बहुतेक घरी ' भगत ' जातो. त्याच्या हातात ' साट ' ( = दोरीचा मोठा चाबूक ) असतो. तो प्रत्येक घरी जाऊन हळद-कुंकू आणतो, ' पटरपटर ' ( बडबड ) करतो, ' भुताई दे, वाघाई दे ' असे काहीसे बडबडतो आणि हातावर ' साट ' मारून घेतो. त्याला सावरण्यासाठी इतर दोनचार कोलाम असतातच. प्रत्येक घरातून कोंबडा, कोंबडीचे पिलू, जे काय सापडेल ते गोळा करून ' भगत ' देवी-जवळ आणून ठेवतो. त्याच्याजवळ एक लहान डफ असतो. देवदेवतांची नावे घेऊन डफावर थाप मारीत मारीत ' भगत ' पुढे चालतो.

' भगता'च्या मदतीला एक नकली ' भगत ' असतो. त्याला ' घोट्टेसुपारी ' असे म्हणतात. तो घरोघरी जाऊन भाकरी जमविण्याचे काम करतो, पोरांकडून ' साट 'मारवून घेतो आणि मुलांचा मार हुकविण्यासाठी अंगविक्षेप करून विनोद निर्माण करतो. जमविलेल्या काही भाकरींतून अर्धीअर्धी खाऊन बाकीच्या भाकरी तो देवीजवळ आणून ठेवतो. त्यामुळे त्याचे जेवण बहुधा असेच उरकते.

भाकरी जमविण्यासाठी नाचे कोलामसुद्धा फिरतात. सूर्यनारायण उगवू लागताच नृत्यपटूंची धुंदी उतरू लागते. रिकाम्या बायका ह्या वेळेपर्यंत ताज्या भाकरी करून

ठेवतात. कोंबड्याबकऱ्यांच्या ढिगाजवळ भाकरींचा ढीग वाढत जातो. स्वयंस्फूर्तीने काही कोलाम घरून भाकरी आणून देतात. खरे म्हणजे ह्या सणात भाकरींपेक्षा अंडी, बकरा, कोंबडा, कोंबडी, कोंबडीची पिले यांचाच 'मान' अधिक असतो. म्हणूनच की काय अपेक्षेपेक्षा अधिकच अंडी, कोंबडे, कोंबड्या, कोंबडीची पिले ह्या वस्तू आलेल्या असतात. त्यांत कोंबडीची पिले अधिक असतात. सकाळींसुद्धा काही नाचणारे नाचतच असतात. पुजारी आणि त्याचे मदतनीस कोंबड्याबकऱ्यांच्या मांसाचे तुकडे करीत असतात. त्यासाठी पुजारी सुरी घेऊनच बसलेला असतो.

त्याच वेळीं तीर्थप्रसाद देण्याची वेगळी रीत कोलामांत आढळते. नृत्ये चालू असतांना सकाळीं तव्यात बकऱ्याचे आतडे शिजविले जाते. त्याचे तुकडे करून ते आणि सोबत थोडे पाणी जांभळींच्या पानातून भाकरी आणणाऱ्याच्या हातावर 'घस्या' (पंचमंडळाचा एक सदस्य) ठेवीत जातो. भाकरी ठेवून घेणे व तीर्थप्रसाद देणे हे काम त्यावेळीं 'घस्या'चे असते.

सकाळच्या वेळीं नाचण्याचा शेवट म्हणून की काय त्यात अधिकच रंग भरतो. रात्रभर नाचून-गाऊन आणि ओरडून नाच्यांच्या आवाजात घोगरेपणा येतो. पाया-खालचा चिखल हातात घेऊन तो एकमेकांच्या अंगावर उडविला जातो. आपुलकी, आनंद व स्नेहभाव या अभिनव रीतीने व्यक्त केला जातो.

साधारणतः सकाळी ७–८ च्या दरम्यान 'गावबांधणी'चा कार्यक्रम विशिष्ट विधी होऊन संपतो. कोलामांच्या नाईकाच्या घरून मातीचे पाच गोळे करून आणतात. त्यानंतर आधल्या दिवशी देवीपुढे केलेला पानांचा मांडव वा झोपडी उकलून टाकतात आणि देवीला घोंगड्याने झाकून ठेवतात. त्यावर 'डाले' किंवा मोठे टोपले उपडे ठेवतात. देवीची जागा बकरा कापावयाच्या वेळी आधीच उकरवाकर झालेली असते. त्या जागेला मातीच्या पाच गोळयांनी लिंपून काढतात. मांडवाची पाने गोळा करून त्यांचे एक ओझे बांधतात. ह्यावेळीं ७–८ वर्षांच्या पाच कुमारिका 'भगता'जवळ येऊन हळदीकुंकवाने त्याला औक्षवण करतात. नवरदेवाला ज्याप्रमाणे ओवाळले जाते, तसेच त्या 'भगता'ला ओवाळतात. मात्र, यावेळीं 'भगता'च्या जोडीला आणखी चार मुले बसविली जातात. 'भगत' व ती चार मुले अशा एकूण पाच जणांना त्या पाच बालिका त्यावेळीं ओवाळतात. त्यानंतर कोलामांचा नाईक 'घोंगशी' घेतो. टोपल्यात पाने, कोंबडीची मेलेली पिले व देवी ठेवतो. ते ओझे डोक्यावर उचलतो. कोलाम स्त्रीपुरुष लोटे-घागरी भरून पाणी आणतात व त्या देवीवर आणि पानांच्या डहाळ्यांवर ओततात. थकलेला 'भगत' जर यावेळीं पेंगत असेल तर त्याच्याही अंगावर ते पाणी ओततात. दोन्ही ठिकाणी सांडलेले पाणी सर्व कोलाम तीर्थ म्हणून प्राशन करतात. नंतर नाईक पुढे व मंडळी मागे, अशा थाटात वाजतगाजत देवी वस्तीबाहेर जायला निघते! निघण्यापूर्वी सर्वजण देवीच्या 'ठाण्या'ला प्रदक्षिणा घालतात.

'गावबांधणी'बाहेर जाण्यासाठी पूर्वद्वाराचा उपयोग करण्यात येतो. या द्वारावर आम्रपर्णांचे तोरण बांधलेले असते. 'भगत' येऊन या द्वारावर आडवा झोपतो. द्वाराबाहेर पडण्यापूर्वी तोरणाची पूजा होते आणि सुरीने ते तोरण कापण्यात येते. नंतर झोपलेल्या 'भगता'च्या अंगावरून वस्तीतील सर्व कोलाम पुरुष बाहेर जातात. सर्वजण गेल्यावर 'भगत' उठून त्यांच्यासोबत चालू लागतो. ही मिरवणूक बाहेर गेल्यावर 'गावबांधणी'तून जाणेयेणे सुरू होते. त्यानंतर वस्तीतील स्त्रिया पाण्याबिण्यासाठी बाहेर जाऊ शकतात.

देवी घेऊन वाजतगाजत बाहेर गेलेला हा जत्था एकदोन फर्लांगांच्या अंतरावरील एका ठराविक जागी जातो. तेथे डोक्यावरील देवी उतरविण्यात येते. डहाळ्या फेकण्यात येतात व नाचतांना खेळण्यासाठी उपयोगात आणलेल्या लाकडी तलवारी मोडून टाकतात. नाचणारे आपल्या पायांतील घुंगरू तेथेच सोडतात. तेथे म्हसोबाची (किंवा त्याच्यासारख्या देवाची) पूजा करण्यात येते.

आता 'भगता'च्या 'अंगातला देव उतरावा' म्हणून त्याच्या तोंडात अंडे घालतात. (एरवी लिंबाने हे काम होते, पण आज तर अंड्यांना वाणच नसते!) तेवढ्याने त्याच्या अंगातील 'देव उतरला नाही' तर त्याला खाली पाडून त्याचा 'देव उतरविण्याचा' प्रयत्न करण्यात येतो.

नंतर सर्व कोलाम पुन्हा वस्तीत येतात आणि चारही कोनांची एकदा पूजा करतात. पुरुष वस्तीबाहेर गेल्यावर बायका 'साट' घेऊन एकमेकींना मारतात आणि एकमेकींच्या अंगावर चिखल फेकतात. 'गावबांधणी'तील कार्यक्रमांची अशा रीतीने त्या नक्कल करतात. वस्तीत पुरुष परत येऊ लागताच त्या घरोघरी पळून जातात आणि नंतर पाणी वगैरे आणण्याच्या कामाला लागतात. बायका व माणसे यांची वाटेत भेट झाल्यास पुरुष विनोदनार्थ स्त्रियांना मारतात आणि स्त्रिया पळण्याचा प्रयत्न करतात.

पुरुष वस्तीत परत आल्यावर देवीपुढील मांसाचे प्रत्येक घरासाठी वाटप केले जाते. फक्त बकऱ्याची 'मुंडी' व कोंबडे हे पदार्थ सामूदायिक रीतीने चावडीपुढच्या 'आगटी'त शिजविले जातात. त्यानंतर चावडीपुढे होणाऱ्या पंगतीत फार थोडे लोक जेवतात. व्यवस्थापक मंडळीं व म्हातारी माणसे त्या पंगतीत असतात. बाकीचे कोलाम प्रसाद नेण्यासाठी घरून ताटे आणतात आणि चावडीपुढे शिजलेल्या पदार्थांमधून थोडेसे जेवण घरी नेतात. बहुतेकांच्या घरी पाहुणे असतात. त्यांची नीट व्यवस्था व्हावी म्हणून हिश्शाला आलेले मांस घरीच शिजवितात आणि कमी पडल्यास घरचे मांस त्यात भरीला घालतात.

दुपारी तीनचार वाजता पाहुण्यांसोबत नाच, गाणे व डफ वाजविणे हे कार्यक्रम काही हौशी कोलाम करतात. त्यानंतर परगावचे पाहुणे आपापल्या गावी निघून जातात.

'गावबांधणी' संपल्यावर पाच दिवसपर्यंत कोलामांनी तसेच इतरांनीही जोडे-चपला घालून कोलामवस्तीत फिरू नये, असा नियम आहे. निदान देवीच्या अंगणात व चावडीत तरी जोडेचपला आणू नयेत, असा दंडक आहे. हा दंडक मोडल्यास दंड करण्याची प्रथा आहे. दंड न देणारास थोडासा मार खावा लागतो. नंतर त्यास सोडून देतात. दंडाची रक्कम अगदी क्वचितच पाचदहा रुपये मागितली जाते. सहसा पूजेसाठी शेंदूर, कापूर, ऊद यांचा खर्च म्हणून पाच पैसे दंड मागतात. चुकून आलेल्या इसमास त्रास वगैरे न देता पाच पैसे दंडावरच मुक्त करतात.

'गावबांधणी' झाल्यावर नवीन मोसम सुरू होईपर्यंत त्या 'पोडा'वर लग्ने होत नाहीत. 'गावबांधणी' होण्यापूर्वी मोहो खाऊ नये असाही संकेत आहे. म्हणून 'गावबांधणी'चा उत्सव झाल्यावर त्या वस्तीतील कोलाम मोहो खाण्यास सुरुवात करतात. मात्र, 'मोहडोंबरी' हा त्यांचा सण 'गावबांधणी'पूर्वी झाला तर फक्त त्या दिवशी कोलाम मोहो खातात. कारण त्या दिवशी मोहांचेच महात्म्य असते !

## नागपंचमी

कोलामांची नागपंचमी आगळ्या रीतीने साजरी होते. कोलामांमध्ये या सणाला 'कारगुल' असे नाव प्रचारात आहे. कोलामांच्या लहान मुलांचा मुंजीसारखा एक विधी याच दिवशी पार पडतो. त्याला 'कासइपा' असे नाव कोलामी भाषेत असून मराठीत 'काष्टाफेडी' असे नाव प्रचारात आहे. यासंबंधीची विस्तृत माहिती 'जन्म आणि जीवणाची घडण' या प्रकरणात ( प्र. ३, पृ. १२१-२२ ) देण्यात आली आहे.

या दिवशी कोलाम लोक इतर जातींप्रमाणे लाह्या घेऊन वाजतगाजत फिरतात. दिव्यांची आरती त्यांच्यासोबत असते. वारूळाजवळ जाऊन नागदेवतेची पूजाही ते करतात. वारूळ पुजून येतांना कोलामी भाषेत परंतु वऱ्हाडी लोकांच्या पद्धतीने हे लोक 'बाळ्या' ( = नागोबाची गाणी ) म्हणतात. त्यांचा नमुना—

| कोलामी | मराठी |
|---|---|
| शिळीं मोदाल, मोदुक मोदाल<br>आरे रामा राघोबा रे ! १ | बिबीचे बूड, पळसाचे बूड<br>आरे रामा राघोबा रे ! १ |
| तेके मोदाल, मादगी मोदाल<br>आरे रामा राघोबा रे ! २ | सागाचे बूड, आजनाचे बूड<br>आरे रामा राघोबा रे ! २ |

झाडांची अशी अनेकानेक नावे घेऊन हे गीत वाढवितात. 'आरे रामा राघोबा रे' हे पालुपद नागपंचमीला गावयाच्या मराठी गाण्यातही येते. वऱ्हाडात त्या गाण्यांना 'बाळ्या' असे म्हणतात. 'बाळ्यां'चा या दिवशी सर्वत्र बोलबाला असतो.

नागपंचमीला कोलामांचे वैशिष्ट्य त्यांच्या ' फूलझडणी ' वा ' झाडपेरणी ' या स्वतंत्र सणोत्सवात दिसून येते. हा सणोत्सव नागपंचमीच्या दिवशी कोलाम लोक सामुदयिक स्वरूपात साजरा करतात.

## ' फूलझडणी ' किंवा ' झाडपेरणी '

पहिले धान्य निघाले की ' नवे टाकण्याचा ' म्हणजे त्या धान्याचा प्रसाद वाटण्याचा कार्यक्रम वऱ्हाडातील शेतकरी करीत असतात. कोलाम लोकांमध्ये शेंगांसारखी पावसाळ्यातील पहिली पिके निघण्याच्या निमित्ताने ' फूलझडणी ' वा ' झाडपेरणी ' हा सण करण्याची चाल आहे. पाऊस येतो. पेरण्या होतात. पिके अंकुरतात, वाढतात व बहरतात. त्यानंतर फूल झडू लागते आणि बी वाढते. म्हणून ' फूलझडणी ' ! पीक वाढू लागले की फुले झडतात आणि झाडांवर बी तयार होते. झाडे जणू बियांची नवी पेरणीच करतात. म्हणून ' झाडपेरणी ' म्हणावयाचे ! मका, भुईमूग, चवळीं अशा तऱ्हेची पिके प्रथम निघाली की त्या पहिल्या पिकांचा आनंद शेती करणारे शेतकरी व शेतमजूर यांना व्हावयाचा, हे ठरलेलेच ! नवी निर्मिती आनंददायी असते. आपण लावलेल्या आणि वाढवलेल्या झाडांना फळाफुलांनी बहरलेले, लदबदलेले पाहण्यात एक आगळा आनंद असतो. तो आनंद कोलाम लोक या सणाच्या निमित्ताने व्यक्त करतात.

हा सण कमीअधिक प्रमाणात दोन दिवस चालतो. पहिल्या दिवशी कोलाम मुले जंगलात जातात आणि सागाची पाने तोडून आणतात. पाऊस सुरू झाल्यावर सागाची पाने वस्तीत आणणे वर्ज्य, असा कोलामांचा रिवाज आहे. ' झाडपेरणी'च्या दिवशी हा रिवाज मोडून सागाची पाने वस्तीत आणण्याची सुरुवात होते. तोपर्यंत वर्षाकाळात सागाची पाने वस्तीत आणल्यास कोलामांना त्यांचा विटाळ होतो. जंगली भागात राहणाऱ्या कोलामांचा परिसर सागांनी भरलेला असतो. ' झाडपेरणी'च्या दिवशी सागाच्या पानांचा ' मान ' करून कोलाम औचित्य साधतात !

तोडून आणलेल्या पानांपैकी दोनदोन पाने ती मुले प्रत्येक कोलामाच्या घरी देतात. ती पाने कणगीला, कुडाला, वळचणीला, दारवाज्याला, घराच्या कुठल्यातरी भागाला अडकवून ठेवण्यात येतात. सर्व घरी पाने वाटून झाल्यावर उरलेली पाने वस्तीतील चावडीपुढील देवीजवळ ठेवून दिली जातात. एखादे घर चुकून राहिले तर तो त्या घराचा अपमान समजला जातो. ' आमचे घर का वगळले ? '–असा सवाल त्या घरातील मुख्य माणूस कोलामांच्या न्यायपंचायतीला दुसऱ्या दिवशी सायंकाळी विचारतो. चूक झाली असल्यास पंचमंडळातर्फे ' घऱ्या ' त्या व्यक्तीची क्षमा मागतो.

त्या रात्री पंचमंडळातील लोक एक गंमत करतात. मध्यरात्री पंचांपैकी दोघेतिघे सदस्य कोलामांच्या एकेका घरी चुपचाप जातात आणि त्यांच्या घराचे अंगण कुदळीने खणू लागतात. खणण्याचा आवाज त्या घरातील लोकांना ऐकू गेला तर ते जागे होतात.

त्यामुळे खणणारे लोक आपले काम बंद करतात. घरमालक खणणाऱ्यांना एकएक पोळी जेवायला देऊन त्या लोकांचा सत्कार करतो. जर घरमालक जागा झाला नाही, तर त्याचे संपूर्ण अंगणच हे लोक खणून ठेवतात! अर्थ हा की, झोपतांना सावधपणे झोपावे! अन्यथा, संकटातही जाग येणे कठीणच!!

दुसरा दिवस हा सणाचा मुख्य दिवस असतो. त्या दिवशी सकाळी मका, वाळूक, काकडी, भेंडी इ. सारे नवे पदार्थ शेतीवाडीतून घरी आणून ठेवण्याचे काम कोलाम लोक करीत असतात. या नव्या पदार्थांमध्ये फळे, शेंगा, कणसे यांच्यासोबत नवनवी फुलेही असतात. आणलेली फळे, फुले, शेंगा आणि कणसे हे पदार्थ कोलाम लोक सामुदायिक रीतीने शिवेमधील कोलामांच्या सर्व देवतांना अर्पण करतात. भीमाय्याक, मारुती, जयतुर यांसकट बहुतेक साऱ्या देवदेवतांना ह्या 'नव्या'चा नैवद्य दाखविला जातो.

नैवेद्य अर्पण करण्याचा कार्यक्रम अटोपून सर्व कोलाम भीमाय्याकाजवळ जमतात. ह्या भीमाय्याकापुढे सर्व कोलामांतर्फे काही जणांनी आधीच बकरा कापलेला आसतो. बकऱ्याच्या मांसाचे हिस्से करून ते प्रत्येक कोलामाच्या घरी वाटून दिलेले असतात. सामुदायिक स्वयंपाकाचा खटाटोप व त्रास वाचविण्याची ही रीत अनेक सणोत्सवांमध्ये पाळली जाते. कापलेल्या बकऱ्याचे मुंडके व रक्त भीमाय्याकाजवळ कोलामांच्या पंचांकरिता म्हणून ठेवून देण्यात येते. पंचांचा स्वयंपाक भीमाय्याकाजवळ होतो. तेथेच ते पंच कुटुंबियांसह जेवण करतात. जेवणात बकऱ्याच्या मांसाबरोबर ज्वारीची भाकरी आणि ज्वारीच्या कण्या असतात.

सायंकाळी पंच लोक जेवण्यासाठी साध्या पोळ्या किंवा भाकरी करतात. या सणाच्या सायंकाळी भाकरीऐवजी पोळ्या करण्याचा प्रचार अधिक आहे. भीमाय्याकापुढे सागाची जी पाने ठेवलेली असतात त्यांत हे पंच लोक एक पोळी लपवून ठेवतात. कोलाम-स्त्रियांना सायंकाळी सामुदायिकरीत्या ही पोळी शोधून काढावयाची असते. सर्व कोलाम स्त्रिया देवाजवळ जमून प्रयत्नपूर्वक सागाच्या पानांमधील पोळी शोधू लागतात. सागवानी पानांचा पसारा मोठा असतो व पोळी एकच आणि लहानशीच असते. तसे पाहिले तर त्या स्त्रिया ह्या पोळीच्या पाळतीवरच असतात. तरीही पोळी सापडू नये अशा रीतीनेच लपविण्यात येते. पोळी शोधण्यासाठी जेव्हा घरून कोलामिणी निघतात, तेव्हा त्या स्वतःचे जेवण सागाच्या पानांत वाढूनच घेऊन येत असतात. त्या भीमाय्याकाजवळ बाजूला जेवण ठेवून देतात व पोळी लवकर सापडली नाही तर त्या सर्वजणी सामुदायिक भोजन आटोपून पुन्हा पोळीचा शोध करू लागतात. जर ही पोळी त्यांना सापडली ( मग ती जेवणाआधी सापडो की जेवणानंतर ) तर ती प्रसाद म्हणून सगळ्याजणी थोडीथोडी वाटून घेतात आणि खाऊन टाकतात. पण जर ती पोळी सापडली नाही आणि शोधणाऱ्या स्त्रिया हरल्या तर सगळ्याजणींना

रीघ जावे लागते आणि आपापल्या घरी जाऊन एकएक पोळी घेऊन यावे लागते. हारण्याबद्दल ही एकप्रकारची शिक्षाच त्यांना दिली जाते.

अशा रीतीने या उत्सवात महिलांचाही एक कार्यक्रम असतो. स्त्रियांच्या दृष्टीने हा एक मौजेचा व आनंदाचा कार्यक्रम असून तो पाहण्यासाठी पुरुषसुद्धा जमतात. स्त्रियांच्या शोधक गुणांना, बुद्धीला व समयसूचक दृष्टीला या सणात वाव मिळतो.

रात्री सर्व कोलाम चावडीपुढच्या अंगणात जमून विस्तवाचे निखारे पसरतात. दहापंधरा कोलाम त्या निखाऱ्यांवर नाचून ते तुडवितात. हेतू हा की या निमित्ताने जंगलातील डास, किडे, जळू हे प्राणी जळून जातील आणि त्यानंतर चावणार नाहीत! हीच भावना या कार्यक्रमाच्या मुळाशी असते. 'गावबांधणी'त भूतबाधा, रोगराई, क्रूर प्राणी गावात येऊ नयेत अशी भावना असते, तर येथे जंगलातील रोगजंतू गावात येऊ नयेत, उरू नयेत किंवा ते नष्ट व्हावेत ही भावना असते. वऱ्हाडातील लोक पोळ्याच्या दिवशी 'मारबत' व 'बडगा' काढून 'माशामुरकुट्या यांना घेऊन जाऽऽगे मारबत' 'माशामुरकुट्या यांना घेऊन जाऽऽरे बडग्या' असे ओरडतात. त्यात 'आरोग्य नांदो' हीच सदिच्छा व भावना अभिप्रेत असते. कोलाम लोक 'गुच्छु डोमे' या पालुपदाचे जे गीत गातात व कार्यक्रम करतात त्यांतही अशीच भावना असल्याचे दिसेल. निखारे पेटविण्याचा हा कार्यक्रम संपल्यावर कोलाम लोक आपापल्या घरी जाऊन जेवण करतात.

ह्या सणाच्या दिवशी रात्रभर कोलाम लोक नाच, गाणे, वाजवणे यांत रंगून जातात. दारूबंदी नसली तर दारूचे पेले रिकामे होतात! दारूची धुंदी नाचगाण्यात येऊन मिसळते व त्यांना डफ-पाव्यांचे ध्वनी साथ करतात. पुढील नमुन्याची गीते यावेळी गायली जातात.

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| भांबोडे नेंजेंग काक तेन नीव<br>तांग काकेतीव, गुच्छु डोमे | १ | मुंगळ्यांची भाजी करणार होतीस,<br>का नाही केली ?<br>डासाला घेऊन जा गे मारबत ! | १ |
| पुरेंले नेंजेंग काक तेन नीव<br>तांग काकेतीव, गुच्छु डोमे ! | २ | किड्यांची भाजी करणार होतीस,<br>का नाही केली ?<br>डासाला घेऊन जा गे मारबत ! | २ |

## पोळा

पोळा हा कोलामांचा स्वतंत्र सण नाही. वऱ्हाडातील शेतकऱ्यांचा हा फार मोठा सण असून तो त्यांच्यापासूनच कोलामांनी घेतलेला आहे. कोलामांत बरेच जण

शेतकरी आहेत. बैल पोळ्यात नेणे, तोरण तोडणे, माथोटी जोडणे, बैलांची पूजा करणे, पोळ्यानंतर पाडवा व निपाडवा पाळणे हे पोळ्यातील प्रकार इतरांप्रमाणेच कोलामसुद्धा पार पाडतात. आषाढी पौर्णिमेनंतर पोळ्यापर्यंत किंवा पूर्ण श्रावण महिन्यात मांसमच्छी न खाण्याचे जे व्रत कोलाम पाळतात ते पोळ्यापासून सुटते. पोळ्यानंतर कोलाम मांस खाण्यास पुन्हा सुरुवात करतात.

## ' अतारी ' किंवा ' अथारी '

एखादा गरीब कोलाम शेतकरी असल्यास त्याचे शेतीकाम सामुदायिक रीतीने करून देण्याची एक सुंदर रीत कोलामांमध्ये आहे. कोलामांत शेतकरी कमी आहेत. त्यांची स्वतःची शेती फारच थोडी आहे. हलाखीच्या आर्थिक परिस्थितीमुळे शेतीची कामे एखादा कोलाम शेतकरी नीट करू शकत नसल्यास त्याच्या शेतावर पोळ्यानंतरचा एक दिवस ठरवून वस्तीतील सर्व कोलाम कामाला जातात. नागपंचमीच्या दिवशी सायंकाळी पंच व इतर कोलाम विचारविनिमय करून कोणत्या गरीब शेतकऱ्याच्या शेतात कामाला जावयाचे आणि कधी जावयाचे ते ठरवितात.

ठरलेल्या दिवशी त्या कोलामाच्या शेतात सकाळी नऊदहा वाजता वस्तीतील सर्व कोलाम जातात आणि सामुदायिक कार्याला सुरुवात करतात. ह्या कार्यक्रमाला कोलामी भाषेत ' अतारी ' किंवा ' अथारी ' असे म्हणतात. डफ-पावे यांच्या नादावर बायामाणसे कामे करतात. आधी हळदकुंकू वाहून शेताची पूजा केली जाते. तरुण बाया व मुले पिकातील तण काढतात. काही तरुण डवरे हाकलतात आणि काहीजण तणांचे ढीग गोळा करतात. डफ वाजविणारे कोलाम पूर्ण वेळ डफच न वाजविता शेतात कामसुद्धा करतात. शेताच्या एका बांधावरून दुसऱ्या बांधापर्यंत काम गेले व पुन्हा पहिल्या बांधावर परत आले म्हणजे डफ आणि पावे अधिक जोराने वाजविले जातात. तरुणांनी डफ अधिक वेळ वाजविल्यास म्हातारे कोलाम त्यांचे डफ हिसकावून घेऊन त्यांना कामावर पाठवितात. काम करतांना करमणुकीसाठी बायका गाणी गातात आणि कथा सांगतात. कामात कोणी कुचराई करीत नाही. आपले समजूनच सर्वजण व्यवस्थित व जलद काम करतात. भरपूर लोक कामावर असल्याने त्या गरीब शेतकऱ्याचे बरेच मोठे काम एकाच दिवशी होऊन जाते.

अशा तऱ्हेने एका ' पोडा'वर वर्षातून २–४ तरी ' अताऱ्या ' होतात. १९६४ साली नांझा येथे एकूण सात ' अताऱ्या ' झाल्या. एका गरीब कोलामाच्या शेतीचे काम दि. २७-१०-१९६४ रोजी संपले नसल्यामुळे दुसऱ्या दिवशीही तोच कार्यक्रम त्या शेतावर घेण्यात आला. त्यामुळे त्या कोलाम शेतकऱ्याचे दोन्ही दिवसांमिळून सुमारे दीडशे रुपये वाचले. कोलामांच्या आर्थिक अगतिकतेची कल्पना तर या प्रथेतून येतेच; पण त्यांच्यातील सामूहिक श्रमदानाची, सहकार्याची व शेजाऱ्यांची कामे

आस्थेने उरकण्याची प्रवृत्तीही प्रकट होते. विशेषतः ज्याची पत्नी मरण पावली असेल त्याच्या शेतात किंवा बैल आणि अवजारे ज्या शेतकऱ्यांजवळ नाहीत अशांच्या शेतात 'अतारी' होते. ज्याच्या शेतात 'अतारी' होणार असेल त्याने 'अतारी' ठरविणाऱ्या मंडळींना त्या बैठकीत चहापाणी द्यावे असा संकेत आहे. ज्यांच्या शेतात 'अतारी' झाली ते कोलाम पीक निघण्यापूर्वी आपल्या जातिबांधवांसाठी काही करू शकत नसले तरी पीक निघाल्यावर सर्वांना वरणभाकरिचे किंवा कण्यावरणाचे जेवण द्यायला विसरत नाहीत. साध्या जेवणावरही सर्व कोलाम खुश असतात !

'अतारी'च्या कामाला 'पोडा'वरील एकूणएक स्त्रीपुरुषांनी (मोठ्या मुलांनी-सुद्धा) गेलेच पाहिजे, असा निर्बंध आहे. एखादा तरुण 'पोडा'बाहेरच्या कोलामेतर शेतकऱ्याकडे किंवा पाटलाकडे नोकर असल्यास त्यानेसुद्धा 'अतारी'च्या कार्यक्रमाला आलेच पाहिजे असा नियम आहे. एखादा कोलाम 'अतारी'ला आला नाही तर जातपंचायत त्याला तीनचार रुपये दंड करते आणि त्याला तो भरणे भाग पडते.

**'अखरपख'**

पितृमोक्ष अमावास्या हा सण वऱ्हाडात 'अखरपख' या नावाने बहुतेक जातींत रूढ आहे. कोलाम लोक हा सण इतरांपेक्षा निराळ्या रीतीने साजरा करतात. वऱ्हाडातील कोलामेतर 'अखजी' (अक्षय्य तृतीया) व 'अखरपख' (पितृमोक्ष अमावास्या) हे दोन्ही सण श्राद्ध समजून साजरे करतात आणि 'वोहर' (वधूवर) किंवा 'पितर' अनुक्रमे मृत मातापित्याच्या किंवा मृत पित्याच्या नावाने जेवू घालतात. कोलामांच्या 'अखजी–अखरपखा'त श्राद्धकर्माचा संबंध मुळीच नसतो.

'अखरपखा'च्या संधानात निघणाऱ्या भेंडी, धान यांसारख्या काही पदार्थांचा पहिला 'वाण' देवाला अर्पण करण्याचा विधी कोलाम लोक या दिवशी करतात. ते त्या दिवशी घरात 'घुगऱ्या' शिजवितात. ज्या पदार्थांचा वाण या दिवशी देवाला दिला जातो, ते पदार्थ या दिवसाच्या अगोदर त्या हंगामात कोलाम लोक खात नाहीत. जो पदार्थ देवाला देतात, त्या पदार्थाचा नैवेद्य व नमुना पंचांच्या घरी आदराने नेऊन दिला जातो. तसेच काही कोलाम आपल्या घरी कोलामांची पाच मुले जेवायला बोलावतात व त्यांना 'खिसडा' (=ज्वारी कांडून तयार केलेला विशिष्ट पदार्थ; खीस) खाऊ घालतात. कोलाम लोक या दिवशी आंबाडीच्या भाजीची भाकरी शिजवून खातात. त्यापूर्वी हे लोक त्या हंगामात आंबाडीच्या भाजीची भाकरी करून खात नाहीत.

या दिवशी कोलाम महिला एकमेकींचे पाय धुतात, एकमेकींच्या कपाळास हळद-कुंकू लावतात व एकाच थाळीत सगळ्याजणी मिळून जेवण करतात. परस्पर-स्नेहवृद्धीसाठी कोलाम स्त्रिया हा कार्यक्रम करतात.

या सणाच्या दुसऱ्या दिवशी कोलाम विश्रांती घेतात.

## दसरा

हा सण कोलामांचा स्वतःचा नाही. इतर हिंदूंप्रमाणेच कोलाम लोक हा सण साजरा करतात. दुर्गादेवीच्या स्थापनेचे लोण विदर्भातील खेड्यापाड्यात पोचल्यापासून कोलामही दुर्गादेवीच्या उत्सवात भाग घेऊ लागले आहेत.

## दिवाळी

दिवाळी हा कोलामांचा सर्वस्वी स्वतंत्र आणि स्वतःचा असा सण नाही दिवाळीतील गायीगुरांचे खेळ वऱ्हाडी लोकांप्रमाणेच यांच्यातही होतात. ज्यांच्याकडे गायी आहेत असे लोक वऱ्हाडात बलिप्रतिपदेस गुराख्यामार्फत गायी खेळायला सोडतात. गायीगुरे या दिवशी शृंगारण्यात येतात. ह्या गोधनांपुढे चालत चालत डफ-पावे वाजविण्याची मुख्य कामगिरी कोलाम लोक करतात व त्या कामाची चारदोन रुपये बक्षिसी ते घेतात. एखाद्या शेल्यावर व नारळावरसुद्धा निभते. कळंब ( ता. यवतमाळ ) येथे गायी खेळविण्याचा आनंदोत्सव सर्व आदिवासी फार मोठ्या प्रमाणात करतात. त्यांत गोवारी ही जमात प्रामुख्याने भाग घेते. कोलाम वाद्ये वाजविणारे असतात. कळंब येथील गायी धनाई नावाच्या देवतेजवळ प्रथम पूजेला जातात. त्यावेळी ती देवी इतर आदिवासींप्रमाणेच कोलामांकडूनही पूजली जाते.

कोलामांच्या दिवाळीत लक्ष्मीपूजन नसते. इतरांच्या दिवाळीच्या आनंदात मनोरंजक नृत्ये व दंडारी ( दंडधारी=टिपऱ्यांचे खेळ ) काढून हे लोक भर घालतात पारधी, प्रधान, गोंड व कोलाम या जमातींच्या दंडारींमधून कोलामांच्या दंडारी ठळकपणे उमटून दिसतात. गावात दंडारी नाचविण्याबद्दल कोलाम लोक बक्षिसी म्हणून एखादा रुपया आणि नारळ घेतात.

अशा दंडारींची तयारी कोलामवस्तीत दिवाळीच्या दरम्यान वीसपंचवीस दिवसांपासून चालू असते. कोलामांच्या मुलांना व तरुणांना लुगडी नेसवून टिपऱ्या खेळण्याचे खास शिक्षण कोलामांतील मोठी व अनुभवी माणसे देतात. दंडारींच्या तयारीसाठी कोलामवस्तीच्या नाईकमहाजनांना १५-२० रुपये खर्च त्या १५-२० दिवसांत येतो. चहापाणी व पूजा यांसाठी हा खर्च होतो. ‘ नाईकाची दंडार ’ म्हणूनच कोलामांच्या दंडारीचे नाच ओळखले जातात. इनामाचे पैसे मिळतील, या आशेने हा खटाटोप मुळीच केला जात नाही. धार्मिक प्रथा, धार्मिक प्रतिष्ठा व धार्मिक हौस यांपायी हा खर्च आणि खटाटोप होतो.

दिवाळीच्या दंडारींची नृत्ये मराठी जाणणाऱ्या लोकांकडे अधिक होत असल्यामुळे कोलाम लोक मराठी गीते त्या कार्यक्रमांमध्ये म्हणतात. परंतु त्यातल्या त्यात

विनोदनिर्मितीच्या दृष्टीने कोलामी-मराठी भाषेतील काही संमिश्र गीते ते गातात. पुढे अशा गीताचा एक नमुना दिला आहे. त्यात आलेला ' कुणबी ' हा शब्द ' कोलामेतर शेतकरी ' या स्थूळ अर्थाचा आहे. कोलामाच्या आसपास हाच वर्ग प्रामुख्याने वावरतो. या गीताची वऱ्हाडी लकब कायम ठेवली आहे.

| वऱ्हाडी-कोलामी | | मराठीकरण | |
|---|---|---|---|
| कोलावार मन्ते ' कूटे ' | | कोलाम म्हणतात ' कूटे ' | |
| कुनबी मन्ते ' गाय ' | | कुणबी म्हणतात ' गाय ' | |
| तानेद तोते बाबूलाल ! | | काहीच खरंऽऽ नाही बाबू ! | |
| कोलावार गोट्टी समजेना ! | १ | कोलामी बोली समजेना ! ! | १ |
| कुनबी मन्ते ' मैस ' | | कुणबी म्हणतात ' म्हैस ' | |
| कोलावार मन्ते ' सिर्रे ' | | कोलाम म्हणतात ' सिर्रे ' | |
| तानेद तोते बाबूलाल ! | | काहीच खरंऽऽ नाही बाबू ! | |
| कोलावार गोट्टी समजेना ! | २ | कोलामी बोली समजेना ! ! | २ |

## होळी ( शिमगा )

कोलामांची होळी बहुतेक इतर समाजांसारखीच होते. इतर लोक होळी गावात पेटवितात, तर कोलामांची होळी त्यांच्या वस्तीबाहेर पेटते. कोलामांची घरे जवळजवळ व गवतांची असल्यामुळे आगीचा धोका टाळण्यासाठी होळी वस्तीबाहेर पेटविण्याची रीत पडली असावी. होळीजवळच कोलाम लोक त्यांच्या एखाद्या देवतेची पूजा करतात व रात्रीच्या वेळी कोलमेतरांप्रमाणे हुतुतू, खो-खो, आट्यापाट्या इ. खेळ कोलाम मुले व तरुण खेळतात.

शिमग्याच्या दिवशी कोलाम लोक शिकारीचा कार्यक्रम अयोजित करतात. शिकार हे त्यांच्या निर्वाहाचे एक साधन असल्यामुळे त्यांच्या जीवनात शिकारीला फार महत्त्व आहे. जंगली भागात राहत असल्यामुळे भाला व काठी यांच्या साह्याने शिकार करण्याचा त्यांना नाद असतो. आपापले मोठमोठे सोटे घेऊन कोलाम लोक शिमग्याच्या दिवशी जंगलात जातात आणि शिकार करतात. आणलेली शिकार विशिष्ट जागी भाजून तिचे वाटे करतात आणि प्रत्येक कोलामाच्या घरी ते समप्रमाणात वितरित करतात. त्या दिवशी त्या पदार्थांवर त्यांच्या ' होळी'चे व त्यांचे भोजन होते !

देवतांप्रमाणेच सणांचेही वेगळेपण कोलामांच्या जीवनात बरेचसे आहे हे आतापर्यंत सणोत्सवांसंबंधी दिलेल्या माहितीतून निष्पन्न झालेले आहे. त्यांच्या नेहमीच्या जीवनातील प्रश्नांशी त्यांचे सण निगडित आहेत, हेही सहज कळण्याजोगे आहे.

**उपासतापास, व्रते इ.**

उपासतापास करण्याची प्रवृत्ती मूल्तः कोलामांमध्ये नाही. अर्धपोटी राहून नेहमीच उपवास काढण्याची पाळी ज्या कोलामांवर येते, ते उपासतापासाकडे न वळणे सहजशक्य आहे.

अलीकडे अल्प प्रमाणात निकटच्या परिसरातील ग्रामीणांचे अनुकरण करून काही धार्मिक बाबी कोलामांनी उचलल्या आहेत. आषाढी पौर्णिमेचा उपवास मात्र त्यांच्यापैकी बरेच लोक करतांना दिसतात. एकादशा, शिवरात्रीचे उपवास आता-आता काही लोक करू लागले आहेत. मारुतीच्या नावाचा शनिवार काही कोलाम अलीकडे करतात. 'भोवानी'च्या नावाने मंगळवार व शंकराच्या नावाने सोमवार करण्याकडेही आताआता त्यांच्यापैकी काहींचा कल दिसून येतो. श्रावण मासात सोमवार करण्याची रीतसुद्धा काहींनी उचलली आहे. ह्या महिन्यात कोलाम मांस खात नाहीत. महादेव आणि मारुती ह्या देवता मूळात आदिवासींना जवळच्या असल्यामुळे तर हे उपवास काही कोलामांनी उचलले नसतील ना? कोलामेतरांच्या आजच्या इतर देवतांपेक्षा ह्याच देवता त्यांच्या लक्ष्यात चटकन याव्या यात काही सूत्र असू शकेल काय? कोलामेतरांच्या बव्हंश देवता व त्यांचे उपवास कोलामांत आढळत नाहीत. एरवी गवोगाव प्रत्येक घरी असणारी तुळस कोलामांच्या वस्तीत शोधूनही सापडत नाही. तसेच संपूर्ण ग्रामीण जीवनाला व्यापून उरणारी भजनसंस्था समीपस्थ कोलामांना मुळींच अवगत असू नये, हे खरोखरीच विचार करण्यजोगे नाही काय? गावात आठपंधरा दिवसांतून एकदातरी वारकरी-भजन होते. वारकऱ्यांत दर एकादशीला होणारे भजन रात्रभर जागून केले जाते. काही ग्रामीण जन पंढरपूरची वारी करतात. अलीकडे तुकडोजी महाराजांच्या पद्धतीची खंजिरी भजनेही गावोगाव होत असतात. हे सारे शिवेत राहणाऱ्या कोलामांच्या शेजारी घडत असूनही त्यांपैकी एकसुद्धा गोष्ट कोलामांनी उचलू नये, हेही ध्यानात घेण्याजोगे आहे.

स्त्रिया उपासतापास करण्यात अधिक रुची घेत असतात. परंतु कोलाम स्त्रियांमध्ये तेही आढळून येत नाही. ग्रामीण स्त्रिया पौष महिन्यात रविवारी उपवास

करतात. त्यास ' पुषा इतवार ' असे म्हणतात. काही कोलाम स्त्रियांनी ' पुषा इतवार ' करण्याची ही रीत अंशतः उचललेली आहे. माडीपौर्णिमेचा सणसुद्धा असाच काही प्रमाणात काही कोलाम स्त्रियांनी शेजारच्या अनुकरणाने घेतलेला दिसतो. परंतु हे अपवादच आहेत.

उपासाच्या दिवशी ग्रामीणांप्रमाणेच काही कोलाम लोक थोडेसे गूळ-शेंगदाणे खातात. पण कित्येक तर तेसुद्धा खात नाहीत. उपवास कडक असावा; एरवी तो उपवास कसला ?

कोलामांमध्ये ' सत्यनारायण ' मुळीच माहीत नाही. हौस म्हणून यात्रा, गणेशोत्सव यांसारख्या ठिकाणी हे लोक जात असतात. आदिलाबाद जिल्ह्यातील ( उतनूर सडकेवर–) केसलापूर या गावी गोंडांची एक यात्रा हिवाळ्यातील एका अमावास्येच्या दिवशी भरते. या यात्रेत त्या भागातील कोलाम लोक बहुसंख्येने भाग घेतात. गोंडांच्या उत्सवांमध्येही काही कोलाम मिसळतात. पण एखाद्या देवतेच्या दर्शनाची भावना त्यात असतेच असे नाही. जवळ असूनही इतर हिंदूंच्या देवळात कोलाम लोक नियमितपणे वा आस्थेने गेल्याचे कधी दिसत नाही.

कोलामांमध्ये गुरू करण्याची वा करविण्याची प्रथा नाही.

卐 卐 卐



'गावबांधणी'साठी नटूनथटून आलेल्या ह्या कोलाम महिलांमध्ये दुसऱ्या क्रमाने उभी असलेली स्त्री उपसरपंचाची पत्नी असून लुगडे नेसण्याची तिची पद्धती इतर स्त्रियांपेक्षा काहीशी वेगळी आहे.

१ : :

# नृत्ये आणि गीते

नृत्यकला ही इतर आदिवासींप्रमाणेच कोलामांच्या जीवनातील वैशिष्ट्यपूर्ण बाब म्हटली पाहिजे. कोलामांचा कोणताही उत्सव आणि सण नृत्याशिवाय बहुतेक होतच नाही. सणोत्सवाची संपूर्ण रात्र जागून नाचण्यात घालविली जाते आणि रात्र अपुरी पडल्यास दिवसालाही तेच केले जाते. नृत्यात सर्वच कोलाम आलटूनपालटून भाग घेतात. अशा कार्यक्रमांच्या वेळीं काही तरुण कोलाम लुगडी नेसून स्त्रियांसारखा सुंदर शृंगार करतात. कोलाम स्त्रियाही नाचतात. पूर्वीच्या मानाने त्या अलीकडे नृत्यात कमी भाग घेतात, एवढेच !

नृत्यातील वेगवेगळे प्रकार कोलामांत नाहीत. त्यांच्या नावावर गाजणारा एकही नृत्यप्रकार नाही. त्यांच्या नृत्यांमध्ये त्यांच्याच जीवनातील दृश्ये कृतिपर करून दाखविण्यात येतात.

‘ दंडारी ’ ( दंडधारी ) हा नृत्याचाच एक प्रकार म्हणावा लागेल. कोलाम लोक यात प्रवीण असतात. हातभर लांबीचा एकएक दांडू रांगेत उभे असलेल्या ७–८ जणांनी उजव्या हातात घ्यावा व तालावर एकमेकांच्या दांडूवर दांडू मारीत नाचावे, ही दंडारीची कला कोलामांना चांगलीच अवगत आहे. दंडारीचा साधा प्रकार ‘ परसंगी ’ ( ‘ प्रसंगी ’ = कोणत्याही प्रसंगी विनासायासाने करता येणारी ) या नावाने विदर्भात ओळखला जातो. लेंढा, गोफ इ. कठीण प्रकारही आहेत. अशा दंडारींची

जोरदार तयारी कोलाम लोक दिवाळी व होळी या सणांपूर्वी करतात. ह्या दंडारी कोलामेतर शेतकरी व धनिक यांच्याकडे नाचवून कोलाम लोक त्यांना काही बिदागी मागतात. ती मिळाली नाही तरीसुद्धा कोलामांच्या दंडारी गावभर नाचतातच! पैशांच्या वा मोबदल्याच्या आशेने 'दंडारी'तील टिपऱ्यांचे खेळ मुळीच केले जात नाहीत. एका नारळावर रात्ररात्र नाचण्याची त्या लोकांची तयारी असते. थकवा वगैरेंची त्यांना तमा नसते. दिवस उजाडेपर्यंत ह्या दंडारी चालतात. ह्या दंडारी 'नाईकाच्या दंडारी' ह्या नावाने गावामधील लोकांच्या परिचयाच्या असतात.

नृत्यांसोबत गीते गायली जातात. स्त्रिया त्यात भाग घेतात. ही गीते मराठी, गोंडी, कोलामी, गोंडी-कोलामी आणि मराठी-कोलामी भाषेत असतात. त्यांतील काही समयस्फूर्त व स्वरचित असतात. मराठी, गोंडी व मिश्रगीते आधुनिकतेकडे झुकणारी असतात; तर बव्हंश गीते लोकगीते असतात. ती प्राचीन व पारंपरिक असतात. या गीतांपैकी कित्येक गीते संवादरूप असतात. नाचतानाचता मुख्य सोंग घेतलेला विचारतो, "बायांनो! कापूस वेचायला चलता काय?" बायांनी 'हो' म्हणताच सर्वजण नाचतानाचता चालण्याची आणि कापूस वेचण्याची प्रक्रिया करतात. गवत कापणे, भारे विकणे अशांसारखे कोलामांच्या नित्यजीवनातील अनेक प्रसंग रात्रीच्या नृत्योत्सवांमध्ये व दंडारींमध्ये उभे करून कोलाम लोक स्वजातीचे व इतरांचे मनोरंजन करतात. त्यात त्यांची कलादृष्टी दिसून येते. दोर, काठ्या, गोणपाट ह्यासारख्या साध्या वस्तूंचा उपयोग करून उत्तम सोंगे काढण्यात हे लोक पटाईत असतात. 'गावबांधणी-' सारख्या सणोत्सवांच्या दिवशी अशी नानाविध सोंगे काढून कार्यक्रमात रंगत भरली जाते. विनोद निर्माण करण्याची तर सोंगे घेणाऱ्यांत एकप्रकारे शर्यतच लागते.

नृत्ये आणि गीते यांचे कार्यक्रम संयुक्तपणे होतात. दंडारीत या दोहोंचा संगम अधिक चांगल्या प्रकारे होतो. रात्रभर टिपऱ्यांवर चालणाऱ्या या कार्यक्रमात पुढील नमुन्याची गीते गायली जातात—

| कोलामी | मराठी |
|---|---|
| कायेलाकड, मुयीलाकड | मासोळीवाले, वानरवाले |
| वात्तेर ए देवा! तुराठा! | आले रे देवा!...कचरा! |
| एंडेलाकड, पांदेलाकड | खेकडेवाले, बेडूकवाले |
| वात्तेर ए देवा! तुराठा! | आले रे देवा!...कचरा! |

नृत्यगीतांच्या कार्यक्रमात हे लोक नकलाही करतात. सापाचे घासणे, कावळ्याचे 'काको-काको' असे आवाज काढणे व दुसऱ्याने तसे आवाज काढणारास 'मला काका कशाला म्हणतोस?' असे विचारणे इ. नकली प्रसंगसुद्धा कोलामी मनोरंजनात मूर्तिमंत उभे ठाकतात!

'इतिहास' या नावाचा एक कार्यक्रम कोलामांच्या प्रत्येक सणोत्सवाच्या रात्री होतो. त्यात कोलामजीवनाचा संपूर्ण चित्रपट गीतनृत्यांच्या रूपाने साकार करण्यात येतो. ह्यातसुद्धा बऱ्याच नकला होतात. सोंग घेतलेली एखादी व्यक्ती दारुड्या म्हाताऱ्याची नक्कल करते. तो म्हातारा दारू पिऊन तर्र होतो. तो कोठेही झोपतो. कोठेही पडतो. तो जोराने ओरडतो, "मीच नाईक आहे! मीच महाजन आहे!" त्या म्हाताऱ्याला विंचू चावतो व तो 'ओय ओय' करीत ओरडत सुटतो. सोंग घेतलेल्यांपैकी काहीजण धावाधाव करून त्यास मंत्राने भारलेले पाणी देतात किंवा मांत्रिकाचे सोंग घेऊन एकजण विंचू उतरवतो! तो विंचवाचा मंत्र नक्कल करीत म्हणतो—

अवजी लकड
बवजी लकड
  शिवजी बंदुकदार
हागता हागता सई मारते
सवऱ्या पिंजरते
  तुझ्या लेकीनं जुलूम केला
  ×× लगडू दे!

## 'इतिहास' व 'इतिहास'-कथनकर्ते

कोलामजीवनाचे वार्षिक चित्रांकन गीतनृत्यात करणारा हा कार्यक्रम कसा असतो त्याचे वर्णन विवाह-प्रकरणात यापूर्वीच (प्र. ४, पृ. १४९–५०) आले आहे. इतिहास सांगणारी व्यक्ती प्रत्येक कोलामवस्तीत असतेच; पण वाकबगार 'इतिहास'-कथनकर्ते तुरळकच आढळतात. या लोकांना 'वेताळक' असे म्हणतात. (माहिती पाहा—प्रकरण ७–'न्याय, नीती आणि गुन्हेगारी') त्यांच्यापैकी काहीजण गावोगाव फिरून निरभिलाषपणे स्वजातिबांधवांचे मनोरंजन करतात. त्यांच्याजवळ सोंगांचे स्वतःचे सामान असते. स्वजातीतील कलाकार असल्याचा सात्त्विक अभिमान त्यांच्या ठायी वसत असलेला आढळतो. भिसनी (ता. यवतमाळ) येथील श्री. चंपतराव कृष्णा बोरकर हे कोलाम जातीतील 'इतिहास'– कथनकर्ते असून त्यांचे कार्यक्रम यवतमाळ तालुक्यातील बहुतेक सर्व कोलामवस्तीत झाले आहेत. हे लोक कोलामांचे भाट असतात, असे म्हणणे रास्त होईल.

## नैसर्गिक वस्तूंच्या आकृती

आषाढी पौर्णिमेच्या सणाला कोलाम लोक 'वाघाई' नामक देवतेची पूजा करतात व त्या दिवशी ते पळसाच्या पानांचा एक वाघोबा तयार करतात. निसर्गातील वस्तूंचा वापर करून कलात्मक, कल्पनात्मक व औचित्यपूर्ण आकृती तयार करण्याची या लोकांची ही कला वाखाणावी लागेल!

### इतर कलागुण

स्वतःला लागणारी शिकारीची बहुतेक शस्त्रे, फासे, लागाड्या, जाळी इ. साधने हे लोक स्वतः तयार करतात. खाटा विविध पद्धतींनी विणण्यात ते वाकबगार असतात. निसर्गातील गुंज-मण्यांच्या वा बियांच्या माळा करून ते शृंगारसाधनांमध्ये भर घालतात. मोरपिसांचे टोप, तसेच देवांचे व गुरांचे साज ते तयार करतात. दिवाळीमध्ये गायींना बांधावयाचे कवड्यांचे पट्टे, 'मोहाडया,' शिंगात घालावयाच्या मोरपंखी 'कुचाऱ्या' इ. अलंकार ते कुशलतेने विणून तयार करतात. शेतीकामातील व स्वधंद्यातील बऱ्याच वस्तू ते स्वतः तयार करतात. रानडुकरांची चातुर्याने शिकार करण्यासाठी कोलाम फार प्रसिद्ध आहेत.

## २ : :

## गोंदणे

शरीरावर गोंदून घेण्याची रीत कोलामांमध्ये आहे. सौंदर्यासाठी साधारणतः गोंदून घेतले जाते, ही वस्तुस्थिती ग्रामीणांच्या दृष्टीने असली तरी कोलामांमध्ये गोंदण्याच्या बाबतीत काही निराळ्या भावना आहेत. "मेल्यानंतर, जिवंतपणी अंगावर गोंदून घेतलेली चित्रे व अक्षरे विकून जगता येते" अर्थात "अमर होता येते" असे कोलामांमध्ये समजतात. मृत्यूनंतर सोबत न्यावयाची शिदोरी वा साठवण म्हणून गोंदून घ्यावयाचे असते, असे कोलाम मानतात. गोंदून घेणाऱ्या व्यक्तीस देवी निघत नाहीत, असेही कोलाम मानतात. देवीच्या रोगापासून दूर राहण्यासाठी आधीच घ्यावयाची खबरदारी, या धोरणाने गोंदण्याकडे या जमातीचा कल आहे! वस्तीत 'किनरीवाले' वा 'भराडी' लोक येतात. त्यांना हे चारदोन पैसे देतात आणि त्यांच्याकडून गोंदवून घेतात. हाच माणूस मुलांचे नाककानही टोचून देत असतो.

कोलाम पुरुष आपल्या हातावर आपले नाव गोंदवून घेतात. यात बहुतेक स्वनामच असते; पित्याचे, जातीचे आणि कुळाचे नाव नसते. स्त्री मात्र हातावर नाव गोंदवतांना स्वतःचे व स्वतःच्या पतीचे नाव लिहवून घेते. ही नावे बहुधा मनगटाच्या वर आणि कोपराखालील बाजूस, डाव्या हातावर, आतल्या दिशेने गोंदवून घेतली जातात. उजव्या हातावर गोंदण्याची प्रथा क्वचितच आढळते.

फक्त नाव गोंदवूनच या लोकांचे समाधान नसते; तर ते नावासोबत हातावर विंचू, बदक, फूल, झाड अशी चित्रेही चित्रित करून घेतात. हे गोंदण बरेचदा हातभर तर कधी कोपरापर्यंत, कधी दंडापर्यंत तर कधी फक्त दंडावर वाढत जाते. फार काय, कित्येक कोलाम कपाळ, बोटे, मनगट आदि शरीरावयवांवरही गोंदवून घेतात. स्त्रियांना कपाळावर गोंदवावयाचे असल्यास, त्या कपाळाच्या मध्यभागी कुंकवासारखे किंवा चंद्रकोरीसारखे गोंदवून घेतात. काही लोक पाठीवरसुद्धा गोंदवितात. छातीवर गोंदवून घेण्याची पद्धती काही वर्षांपूर्वी कोलामांतील स्त्रीपुरुषांत होती. आजकाल छातीवर गोंदवणे कमी झाले आहे.

## चित्रे आणि रांगोळ्या

कोलामांमध्ये स्वतःची चित्रकला नव्हती आणि नाही. त्यांच्या घरात चांदीच्या देवांच्या काही लहान प्रतिमा असतील किंवा गोंदवलेली चित्रे अंगावर दिसतील; एरवी त्यांच्या घरी कोणतेच चित्र आढळत नाही. आता शिक्षित जगाचे पाहून क्वचित काही कोलाम रद्दीतील कसलीही चित्रे फाडून ती काडीने, काट्याने किंवा डिंकाने आपल्या घराच्या कुडाला तुनूमुनू डकवून देतात ! पण हेही सर्रास नाही !

स्वतःचे छायाचित्र ( फोटो ) काढवून घेऊन ते घरी लावणे या लोकांना अशुभ वाटते. मरण जवळ येणे अशी भावना त्यामागे असते. तशी तर ही समजूत जुन्या ग्रामीण समाजात सगळीकडे आढळते. अलीकडे नव्या पिढीतून ही भावना नष्ट होत चाललेली आहे.

रांगोळ्या काढण्याची रीत कोलामांत नव्हती. आजही ती क्वचितच दिसते.

## ३ : :

## वाद्ये

कष्टकरी कोलामांच्या जीवनात सामूहिक सणोत्सव आणि रंजनाचे नृत्य-दंडारींचे कार्यक्रम हीच विरंगुळ्याची साधने प्रामुख्याने आहेत. त्यांच्या मनोरंजनाच्या वाद्यांचा विस्तार नाही. नाचणाराच्या पायांत घांगऱ्या वा लहान घुंगरूंचे चाळ ( वऱ्हाडात

त्यांना घोळ असेही म्हणतात ) बांधतात. प्रत्येक कोलामाच्या घरी गाठलेल्या घुंगरूंचा एखादा तरी जोड असतोच.

दंडारींमध्ये क्वचित चोणके व ढोलक वापरण्याची रीत अलीकडे काही नाईकांच्या दंडारींत पडली आहे. पण मूलतः कोलामांची मुख्य वाद्ये डफ व पावा हीच आहेत. टाळ, मंजिरा, पितळी बासरी इ. वाद्येसुद्धा काही भागात अपवादात्मक रीतीने कोलाम वापरू लागले आहेत.

### डफ

कोलामांचे हे प्रमुख वाद्य आहे. कोलामी भाषेत डफास 'ताप्पाटे' असे म्हणतात. कोलामांचा डफ मोठ्या आकाराचा असतो. तो अडीचतीन फूट व्यासाचा असतो. या डफाची गोलाई साधारणतः मोठ्या मोटारीच्या चाकाएवढी तरी असते. जमिनीपासून माणसाच्या कंबरेइतकी या डफाची उंची निश्चितच भरते. डफ व पावे ही दोन वाद्ये



डफ व पावा वाजविणारे कोलाम

दोन किंवा चार जणांच्या ताफ्याकडून लग्नसमारंभ, सण, उत्सव, सामुदायिक कार्यक्रम अशा वेळी धडाकेबाज पद्धतीने वाजविली जातात. ‘ दिडीदाम दिडीदाम ’ अशा डफ-नादावर ‘ तुही तुही तू, तुही तुही तू ’ अशी साथ पावे देतात. व्यक्तिगत हौसेसाठी आणि मन रमविण्यासाठीही ही वाद्ये काही कोलाम घरच्याघरी वाजवीत असतात. डफपाव्यांची हीच पद्धती गोवाऱ्यांमध्येही आहे. पण कोलामांमध्ये ती विशेष आहे.

ही वाद्ये कोणताही कोलाम वाजवू शकतो. प्रत्येकास डफ-वादनाची कला ठाऊक असते. मात्र सणोत्सवांमध्ये मान म्हणून एखाद्या व्यक्तीकडेच एकेका वर्षासाठी डफ वाजविण्याचे काम सोपविले जाते. तरीही लग्न, उत्सव, दंडारी, इ. कार्यक्रमांमध्ये विशिष्ट लोकांनीच ही वाद्ये वाजवावी असा काही नियम नाही. सर्वांच्याच घरी डफ नसले तरी ते अनेकांकडे असतात.

गोवारी या आदिवासी जमातीतील लग्ने कोलामांनी वाजविलेल्या डफ-पाव्यां-शिवाय लागत नाहीत. या दोन्ही जमातींत आढणाळरे डफ-पावे आकाराने सारखेच असतात. गोवऱ्यांच्या लग्नात डफ-पावे वाजविणारे कोलाम ‘ नाईक ’ या नावाने कोलामेतरांत ओळखले जातात.

## पावा

डफाबरोबर वाजवावयाचे पावा हे दुसरे प्रमुख असे कोलामांचे वाद्य आहे. कोलामी भाषेत त्यास ‘ वास ’ ( वंश—वास–बास–बासापासून झालेली–बासरी ) असे म्हणतात. वऱ्हाडातील काही भागात त्याला ‘ पाऊल ’ असे नाव रूढ आहे. कोलामांचा हा पावा आणि इतरेजनांची बासरी यांत आकाराचा फरक आहे. बासरी लहान तर ह्यांचा पावा लांब असतो. तो बासाचा असतो. त्याची लांबी अडीचतीन फुटापर्यंत असते. तेल वगैरे लावून त्याची निगा कोलाम लोक चांगली ठेवतात. बहुतेक कोलामांकडे पावा असतो. पावा वाजविणारास कोलामी भाषेत ‘ वासकारा ’ असे म्हणतात. हा माणूस वऱ्हाडात ‘ पाऊलकरी ’ म्हणून ओळखला जातो. कोलाम स्त्रियासुद्धा पावे वाजवायला कधीकधी शिकतात. पावा वाजविणाऱ्या स्त्रीला आणि पावा वाजविणाऱ्याच्या पत्नीला कोलामी भाषेत ‘ वासकाराल ’ असे म्हणतात. हा पावा कोणीही कोलाम वाजवू शकतो. तरीपण मान म्हणून उत्सवादिकांमध्ये पावा वाजविण्याचे काम एखाद्या व्यक्तीकडे वर्षासाठी सोपविण्यात येते.

## डफ तयार करण्याची रीत

डफ तयार करण्याची एक विशिष्ट रीत या जमातीमध्ये आहे. लाकडी वेटोळीवर बकरा, हरीण, सांबर यांचे कातडे लावले की डफ तयार होतो, असे मोघमपणे

इतरांना ठाऊक असते. पण डफ तयार करण्याकरिता कोलाम लोक अधिक मेहनत घेतात, असे एतद्विषयक प्रक्रियेवरून दिसून येईल.

डफाला लावण्यासाठी बकऱ्याचे कातडे वापरतात. मेलेल्या बकऱ्याचे कातडे पाण्यात भिजत घालण्यात येते. सणोत्सवांमध्ये बकरे मारणाऱ्या कोलामांजवळ अशा तऱ्हेची चामडी तयारच असतात. हे कातडे पाण्यात चांगले मुरू देतात.

दरम्यान एखाद्या पळसाच्या किंवा पांजऱ्याच्या झाडाची साल काढून आणतात. ती साल चांगली शिजवून कढवितात. ती साल शिजत असतांना त्या काढ्यात पाच माशा मारून टाकतात. काही फुटक्या बांगड्यांचे चूर्ण करून तेही त्या उकळत्या काढ्यात टाकतात. त्या मिश्रणाचा एकप्रकारचा घट्ट असा गोंद तयार होतो, असा कोलामांचा अनुभव आहे. या विशिष्ट गोंदात सिरसाप्रमाणेच चिकटपणा येतो. ठराविक चिकटपणा आला की, त्यातून फक्त त्या सालेची चिपाटे बाहेर काढून टाकतात. त्यानंतर केवळ चिकट गोंद उरतो. तो गोंद पुन्हा उकळविला जातो. एखाद्या सळईने तो गोंद वर उचलून पाहतात. त्याचे तार न तुटता अखंड राहिले तर तो गोंद चांगला तयार झाला असे समजतात. तार तुटल्यास पुन्हा गोंद उकळवला जातो.

डफाचे वेटोळे बनविण्यासाठी चिंच, सागवान यासारख्या मजबूत झाडाची एक लांब पाटी कापून काढतात. तासून किंवा शक्य तर रंधा वगैरे मारून ती पाटी गुळगुळीत केली जाते. ही पाटी कमीतकमी सहा इंच तरी ( कोलामांच्या भाषेत सहासात बोटे ) रुंद असते. बरेचदा ही रुंदी त्याहून मोठीच असते. ही पाटी ओलेपणीच उकिरड्यात बंद करून, दाबून ठेवली जाते. त्यामुळे ती मऊ होऊन वाकू शकते.

काही दिवसांनी ती पाटी काढून बैलगाडीच्या चाकावर गोलाकार बांधून ठेवतात. तशी ती दोनतीन दिवस ठेवली की, त्या पाटीची गोलाई तशीच राहते आणि मग तेथून ती काढली तरी गोलच राहते. या दोनतीन दिवसांत ती पाटी चांगली सुकते.

ही वेटोळी नंतर लोहाराकडे नेऊन तिचा जोड सांधून आणतात. कित्येकदा कोलामांमधील जाणते लोकच खिळे माठून सांधेजोड करतात.

बकऱ्याचे भिजत घातलेले कातडे त्यावरील केस काढून गुळगुळीत केले जाते. केसांचा थोडाही अंश त्या कातड्यावर राहू देत नाहीत. केस राहिल्यास डफात दोष राहतात म्हणून ते न राहू देण्याची खबरदारी घेतली जाते. गुळगुळीत झालेले कातडे वरील पद्धतीने तयार करून ठेवलेल्या गोंदाच्या साह्याने लाकडी वेटोळीवर चिकटवतात. एका दोराला फासे-सरकफासे देऊन त्या दोराने ते कातडे लाकडी वेटोळीवर, सुरकुत्या राहणार नाहीत अशा तऱ्हेने, घट्टपणे गुंडाळतात व चांगले आवळतात. दोराचे पाच-सहा वेटोळे देऊन ते कातडे जराही हलून ढिले होणार नाही याची काळजी घेण्यात येते.

अशा तऱ्हेने आवळून घट्ट केलेला हा नवा डफ आठदहा दिवस तसाच ठेवून देतात. पावसाळ्यात इतका अवधी तो डफ व्हायला लागतो. इतर ऋतूंत चारदोन दिवस अगोदरही तो तयार होतो. उन्हाळ्यात तर त्याला तयार होण्यास तीनचारच दिवस लागतात.

तयार झालेल्या या डफाचे कातडे पक्के झालेले असते. ते ढळत नाहीच. ते पक्के आवळले गेलेले असते. डफ पूर्ण सुकून झाल्यावर दोर सोडण्यात येतो. डफाच्या कातड्यावर अजून कुठे केस वगैरे उरले असल्यास ते चाकूने, सुरीने वा कुऱ्हाडीने हळूवारपणे साफ करण्यात येतात.

त्यानंतर त्या डफाचा आवाज कसा येतो ते पाहण्यासाठी चारदोन लोक तो वाजवून पाहतात. डफ कडक असला तर हात कापण्याचा संभव असतो. तो अधिक कडक होऊ नये अशी अपेक्षा असते.

डफासाठी फक्त बकऱ्याचे कातडे वापरतात. कधीकधी बकरीचेही कातडे वापरतात; पण कमीच! सांबर, हरीण या प्राण्यांची चामडी डफाला योग्य ठरत नाहीत; कारण ती पातळ असतात. हरीण, सांबर या प्राण्यांच्या कातड्यांनी लहान डफ मढविले जाऊ शकतात; पण कोलामांच्या डफाला बकऱ्याच्या कातड्याचीच आवश्यकता असते.

डफ तयार करण्याचा हा खटाटोप हौस म्हणून कोलाम लोक करतात. कोणत्याही फायद्यातोट्याचा विचार त्यांच्या मनाला असल्या गोष्टींच्या वेळी शिवतसुद्धा नाही.

卐 卐 卐



गप्पागोष्टींत रमलेल्या कोलाम महिला

१ : :

# स्वतंत्र आणि वैशिष्ट्यपूर्ण न्यायपद्धती

कोलामांच्या स्वतंत्र वस्तींप्रमाणेच त्यांची न्यायव्यवस्थाही अलग आहे. सर्वसाधारण सरकारी कायदेकानू त्यांनाही लागू आहेत. परंतु स्वतःच्या समाजाच्या सुधारू संचालनासाठी या जमातीने स्वतःची अशी जी न्यायविषयक व्यवस्था पूर्वीपासून करून ठेवली आहे, ती वैशिष्ट्यपूर्ण व वेगळी अशी आहे.

कोलामांच्या जमातीचे एक न्यायमंडळ त्यांच्या प्रत्येक वस्तीत असते. हे न्यायमंडळ कोलामांचे व्यवस्थापकमंडळही असते. 'पंचायत' वा 'पंचमंडळ' या सर्वसाधारण नावाने हे मंडळ ओळखले जाते. कोलामांच्या जीवनात या मंडळाचे महत्त्व फार आहे. कोलामांचे आपसातील न्यायनिवाडे त्यांच्या जातीच्या या पंचांकडूनच होत असतात. कोर्टकचेऱ्या या लोकांना जवळजवळ ठाऊक नाहीत. गावाच्या जवळ राहूनही पाटील, कोतवाल किंवा पोलीस यांच्यापर्यंत तक्रार नेण्याची पाळी कोलामवस्तीतील कोलाम नागरिकांवर बहुधा येत नाही. आपली तक्रार हे लोक आपल्या पंचायतीकडेच नेतात व तिचा निकाल त्या पंचायतीकडून लावून घेतात. कोलामांची ही पंचायत स्वतंत्र, निर्भीड आणि न्यायनिष्ठुर असून ती परंपरेने चालू आहे. तिचे स्वतंत्र नियम आहेत. ते अलिखित असले तरी परंपरागत आहेत. परंपरेमुळे या व्यवस्थेकडे कोलाम जमात आदराने पाहते. आजचे जीवन गुंतागुंतीचे होऊनही कोलाम लोकांच्या आपसातील तक्रारी न्यायालयात जात नाहीत, हे विशेष होय ! कोर्टाची पायरी चढणे हा अपमान मानण्याची रीत ग्रामीणांमध्ये रूढ आहे; परंतु असे कृत्य

कोलामांच्या पंचायतीला अपमानास्पद होय, असे कोलाम लोक आणि कोलामांचे पंचमंडळ मानते. फार कशाला, स्वजातिविषयक गुन्हा घडून जातपंचायतीपुढे, त्यांच्या नाईकापुढे किंवा त्यांच्या न्यायाधिकाऱ्यांपुढे उभे होण्याची पाळी येणे, ही बाब अत्यंत नामुश्कीची व लज्जास्पद असल्याचे मत कोलामांमध्ये रूढ आहे.

पंचायतीने दिलेले गुन्ह्यांचे निर्णय कोलामांवर बंधनकारक असतात. त्यांचे स्वरूपही अंतिम असते. त्या निर्णयांवर उजर चालत नाही. निर्णय न मानणारे शिक्षेस वा जातिबहिष्कृततेस पात्र ठरतात. त्यामुळे हे निर्णय मानले जातातच असे सर्वत्र दिसून येते.

## न्यायमंडळाचे पदाधिकारी

कोलामांच्या न्यायमंडळात पुढील यजमानांचा क्रमाने समावेश होतो. त्या त्या व्यक्तीची कामे व अधिकार यांची माहिती पुढीलप्रमाणे:—

(१) **नाईक:**—नाईक हा कोलामांचा अध्यक्षच असतो, असे म्हटल्यास उचित होईल. त्याला कोलामी भाषेत ' नेकुन ' असे म्हणतात. तो कोलाम जमातीचा गावापुरता सर्वप्रमुख असतो. कोलामांचे सामुदायिक सणोत्सव, सभा, बैठकी इत्यादिकांचे संचालन नाईक करतो. कोलामजीवनाच्या बहुतेक सर्व बाबींचे अंतिम अधिकार नाईकाकडेच असतात, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. पूर्वी जमिनीचे वाटे करून देण्याचा महत्त्वाचा हक्कसुद्धा नाईकास होता. वडील मेल्यानंतर मुलांमध्ये मालमत्तेच्या वाटण्या करून देण्याचा अधिकार नाईकाकडे होता; आजही तो काहीसा आहे. नाईकाने केलेल्या वाटण्या मान्य करणे कोलामांवर बंधनकारक असे. आजही ही स्थिती फारशी पालटलेली नाही.

नाईकाचा वचक स्वजातीवर फार असतो. लहान मुले तर नाईकापुढे उभीसुद्धा राहत नाहीत. स्त्रिया नाईकास आदर देतात आणि बैठक सुरू असल्यास चावडीपुढून जात नाहीत. बैठक सुरू असतांना स्त्रियांनी चावडीपुढून जाणे नाईकास खपत नाही! दिवाळीत दंडारीचे खेळ करणाऱ्या कोलामांचा ताफा नाईकाच्या नेतृत्वाखाली किंवा नाईकाच्या नावाने गावात फिरतो व नृत्यप्रकार दाखवितो. गावातील धनिकांच्या गायी दिवाळीत खेळविण्यासाठी वाद्ये वाजविण्याचा मान नाईकाला किंवा त्याच्या प्रतिनिधीला मिळतो. गोवारी या आदिवासी जमातीची लग्ने लागत असतांना नाईकाचे किंवा त्याच्या प्रतिनिधीचे डफवाद्य व बासाची मोठी बासरी आवश्यक असते. शेताच्या मशागतीची सुरुवात नाईक प्रथम करतो व त्यानंतर वस्तीचे कोलाम नाईकाचे अनुसरण करतात. जातीतील विवाह, ' पाट ' अशा कार्यक्रमांमध्ये तोच पुढाकार घेतो.

(२) **महाजन:**— कोलामांच्या न्यायपंचायतीचा व व्यवस्थामंडळाचा महाजन हा उपाध्यक्ष असतो. कोलामांमध्ये तो ' महाजन्याक ' या नावाने ओळखला जातो.

न्यायदानाच्या वेळी नाईकाच्या खालोखाल महाजनाच्या मतास मान असतो. महाजनालाही स्वजातीत फार मान दिला जातो. लहान मुले महाजनापुढे फारशी जात नाहीत. वर्षप्रतिपदेला कोलाम लोक ' फणमोडी ' नावाचा जो सण उत्साहाने साजरा करतात, तो महाजनाच्या मानाचा म्हणूनच कोलामांमध्ये ओळखला जातो. हा सण महाजनाच्या शेतातच प्रामुख्याने साजरा होतो.

( ३ ) **कारभारी** :—कोलामांच्या न्यायपंचायतीच्या आणि व्यवस्थामंडळाच्या व्यवस्थापकाची, कार्यवाहाची वा सचिवाची भूमिका पार पाडण्याचे काम कारभारी करतो. याचेही स्थान कोलामांच्या न्यायव्यवस्थामंडळात महत्त्वाचे असते. सूचकाची भूमिका कारभाऱ्यास त्याच्या पद्धतीने पार पाडावी लागते. कोणत्याही सामुदायिक सणोत्सवाची वर्गणी प्रत्येक कोलाम देतो. वर्गणीचा आकडा अधिक नसतो. या रकमेच्या वसुलीची व तिचा हिशेब ठेवण्याची जबाबदारी कारभाऱ्यावर असते. सामुदायिक सणोत्सवाच्या तिथीपूर्वी निदान आठ दिवस अगोदर वर्गणी गोळा झाली पाहिजे, अशी व्यवस्था कारभारी करतो. निरनिराळ्या वर्गण्या गोळा करून त्या जवळ बाळगणाऱ्या कारभाऱ्याचा स्वजातिसंपर्क अधिक वाढतो.

( ४ ) **घट्या** :—कोलामांच्या न्यायव्यवस्थामंडळातील घट्या हीही व्यक्ती महत्त्वाची मानली पाहिजे. कोलामांच्या न्याय आणि व्यवस्थामंडळांतर्गत तो आमंत्रक म्हणून कार्य करतो. वस्तीतील कोलाम मंडळी बोलावून तिला पंचायतीत बसविण्याचे काम याच्याकडे असते. खेड्यापाड्यात आमंत्रण देण्याचे काम पूर्वीपासून न्हाव्याकडे सोपविलेले असते. तशीच भूमिका घट्याची असते. न्यायव्यवस्थामंडळाचे हुकूम कोलामांपर्यंत पोचवणे, जातिसमाजास पाचारण करणे, त्यास एकत्रित करणे यांसारखी कामे करण्यासाठी त्याची नेमणूक असते. दंडवसुलीची जबाबदारी घट्यावर सोपविण्यात येते. सभेला कोणी आले न आले याची नोंद याच्या मनात वा डोक्यात असते. सभेला कोणी आला नसल्यास, तो का आला नाही, याबद्दलची माहिती पंचमंडळ व लोक घट्यास विचारतात. ' झाडपेरणी ' या उत्सवाच्या दिवशी कोलामाच्या प्रत्येक घरी सागाची पाने वाटली जावीत, याबद्दलची जबाबदारी घट्याची असते. एखादे घर चुकल्यास घट्यास जाब विचारला जातो व तसे ते चुकले तर घट्या झालेल्या प्रकाराबद्दल क्षमा मागतो. ' मोहडोंबरी ' या सणाच्या दिवशी प्रसादवाटपाच्या वेळी हा पुढाकार घेतो व त्याच्या पद्धतीचे एक छोटेसे भाषणही तो करतो.

लग्नामध्ये घटाचा तात्पुरता रक्षक म्हणून घट्याचा मान सर्वोच्च असा मानला जातो. त्यावरून त्याचे ' घट्या ' हे पद रूढ झाले आहे. लग्नात घट मांडण्याचा व अंशतः लग्न लावण्याचा मानही याचाच असतो. गोंडांमधील घट्यासुद्धा प्रमुखतया हीच भूमिका पार पाडतो.

## न्यायपद्धतीचे आकर्षक गुण

कोलामांच्या न्यायव्यवस्थेत वर वर्णिलेल्या ज्या व्यक्तींचा समावेश असतो, त्यांच्या कामांच्या वाटपावरून ही व्यवस्था समतोल व न्याय्य असल्याची खात्री तेव्हाच पटते. घट्यासारखा सेवाभावी सामान्य माणूसही या मंडळात असू शकतो, यावर निराळ्या भाष्याची वस्तुतः गरज नाही. या न्यायमंडळात नाईक, महाजन व कारभारी हे अधिक प्रभावी असतात हे खरे ! उरलेला एक घटक या तिघांवर अधिक भिस्त ठेवतो. तरीपण प्रघाताने असे दिसते की, हे पंचमंडळ एकदिलानेच निर्णय घेते. नाईक, महाजन व कारभारी या मुख्य न्यायकर्त्यांच्या व व्यवस्थाप्रमुखांच्या शेजारी बसून घट्या न्यायनिवाड्यात भाग घेऊ शकतो; याचा अर्थ या आदिवासींची न्याय-व्यवस्था समतोल आहे, एकांगी नाही ! तीत एकाधिकाराचे स्तोम वा प्राबल्य नाही. श्रमजीवी स्तरांचे प्रतिनिधी हे न्यायदाते कसे असू शकतात, याचा ही न्यायदानपद्धती एक उत्कृष्ट नमुना आहे.

एखाद्या गोष्टीचा, तक्रारीचा अथवा तंट्याचा निकाल काय द्यावयाचा, यावर विचार करून हे पंच आधी आपसात निर्णय घेतात आणि मंडळाच्या सर्व सदस्यांना तो मान्य झाल्यावर गुन्हेगारास व जातिबांधवांस सभेत जाहीर करून सांगतात. वेळप्रसंगी उपस्थितांची मते मागविली जातात. योग्य मतांचा विचार होतो. सारासार विचाराने निर्णय पक्का होतो. शिक्षा जाहीर करण्याचे काम नाईक करतो. इतर पंचांनी मान्य व पक्की केलेलीच ती शिक्षा असते. सारे निर्णय एकमुखी व अविरोध असतात.

## इतर व्यवस्थाकर्ते

कोलामांच्या न्यायव्यवस्थेत वरील व्यक्तींचा प्रमुख मान असतो, ही वस्तुस्थिती असली तरी न्यायाव्यतिरिक्त दैनंदिन जीवनाचे, उत्सवादिकांचे आणि धर्मकर्मादि बाबींचे व्यवस्थापन आणि मार्गदर्शन करण्याचे काम या न्यायप्रमुखांना पुढे दिलेल्या आणखी काही व्यवस्थाकर्त्यांना मदतीस घेऊन करावे लागते. कोलामांचे न्यायप्रमुख व्यवस्थाप्रमुखही असतात; परंतु त्यांच्या मदतीला आणखी व्यवस्थाकर्ते असतात. न्यायदानाशी संबंधित बाबींशी मात्र या व्यवस्थाकर्त्यांचा संबंध मुळीच नसतो.

या इतर व्यवस्थाकर्त्यांची माहिती अशीः--

( १ ) **तारमा अथवा भूमकः**— तारमा किंवा भूमक या व्यक्तीची भूमिका एकप्रकारे चपराशाची असते. एरवीच्या ग्रामव्यवस्थेतील कोतवालाची काही कामे कोलामवस्तीपुरती भूमकाच्या वाट्याला आलेली असतात. भूमकाला घरोघरी भाकरी मागून उदरनिर्वाह करण्याचा हक्क असतो. त्याला समाजातील लोक आत्मीयतेने बोलावतात आणि भाकरतुकडा वाढतात. समुदायाचा स्वयंपाक करणे, पंचायत-सभेच्या

वेळीं चहापाणी देणे, भांडी घासणे आणि विसळणे, चावडी व चावडीपुढचे अंगण सडासारवण घालून आणि झाडून साफ ठेवणे, बिछाईत अंथरणे व काढणे, चावडीच्या दिवाबत्तीची व्यवस्था करणे अशा तऱ्हेची सेवाकार्ये हा 'तारमा' करतो. भूमक हा स्वयंपाक–कामासारख्या स्त्रीसंबंधित कामासाठीच असल्यामुळे अर्धवट पुरुष असलेल्या व्यक्तीमधूनच बहुधा त्याची निवड केली जाते. कधीकधी भूमकाची कामगिरी एखाद्या स्त्रीवरही सोपविण्यात येते. तिला 'भूमकिन' असे म्हणतात.

( २ ) **देवकरी वा पुजारीः**— उत्सवादिकांमध्ये पूजेअर्चेच्या वेळीं सर्व कोलामांतर्फे हा पुढे असतो व तो देवांची विधिवत पूजा त्या त्या उत्सवात करतो. ( अधिक माहिती प्र. ५, पृ. १६७ वर पाहावी. )

( ३ ) **पाऊलकरी व डफकरी :**— पावा वाजविणारास कोलामी भाषेत 'वासकारा' व वऱ्हाडी भाषेत 'पाऊलकरी' असे म्हणतात. डफ वाजविणारा वऱ्हाडात 'डफकरी' या नावाने ओळखला जातो. कोलामांच्या सणोत्सवांमध्ये हे दोघे आपापली वाद्ये वाजवितात. तसे म्हटले तर सर्वच कोलामांना पावा व डफ उत्कृष्ट-पणे वाजविता येतो. परंतु काही प्रसंगी या दोन वादकांचाच मान या कामासाठी मुख्य असतो.

( ४ ) **सोंगाड्या वा वेताळक :**—कोलामांच्या जीवनात या व्यक्तीचेही फार महत्त्व आहे. हा या जातीत 'इतिहास' सांगणारा 'भाट' असतो. कोलाम-जीवनाचे गीतरूपाने चित्र उभे करून नाच करणे, हे या 'इतिहासा'चे यथार्थ स्वरूप असते. सोंगाड्याच्या प्रेरणेने लग्न, दंडारी किंवा सणोत्सव यातून हा 'इतिहास' व त्यासंबंधीचे कार्यक्रम होत असतात. रंजनाचा उद्देश ह्या कार्यक्रमांमध्ये असतो. सोंगाड्याकडे रंजकाची कामगिरी असते. दंडारीमध्ये तो मुख्य पात्र म्हणून काम करतो किंवा गीतनृत्यादि कार्यक्रमांमध्ये स्वतः भाग घेणे, मार्गदर्शन आणि दिग्दर्शन करणे ही कामे तो करतो. लग्नतिथी सांगणे, लग्नात मंत्राष्टके म्हणणे ही भटजीची कामेही तोच करतो. कोलामी भाषेत सोंगाड्याला 'वेताळक' हे समर्पक नाव आहे.

### न्यायमंडळाच्या बैठकी

कोलामांच्या न्यायमंडळाच्या बैठकी त्यांच्या चावडीत वा चावडीपुढील अंगणात गोलाकार बसून पार पडतात. पुढे पंच बसतात व त्यांच्यासमोरच वस्तीचे इतर कोलाम वर्तुळाकार बसतात. जोराजोराने बोलून साऱ्या गोष्टी घडत असतात. सर्वांनाच बोलायची संधी असते. आपले मत स्पष्ट व उघडपणे मांडण्याचा सर्वांनाच अधिकार असतो. मात्र मत अमान्य झाल्यास विरोध पत्करून कोणीच न्यायपंचायतीचा निर्णय उल्लंघीत नाही. तसे केल्यास जातीबाहेर व वस्तीबाहेर पडावे लागते !–आणि तसे काही होत नाही. कारण या न्यायमंडळाचे निर्णय बंधनकारक असतात व ते पाळले जातात.

'गावबांधणी', 'अतारी' यांसारख्या उत्सवांच्या तिथ्या ठरविणे, सामुदायिक श्राद्धाचा दिवस निश्चित करणे इ. कारणांसाठीही कोलामांच्या बैठकी होतात. त्यांचे निर्णय सर्वानुमते, पण नाईकादि पंचांच्या प्रेरणेने घेतले जातात.

## बैठकींची जागा : चावडी

कोलामांच्या पंचायती जेथे भरतात, ती जागा म्हणजे चावडी ! कोलामी भाषेतही 'चावडी' किंवा 'सावडी' असाच शब्द प्रचारात आहे. या चावडीची जागा २५-३० फूट लांबीची व तितक्याच रुंदीची चौरस अशी असते. चारसहा डेळींवर उभारलेल्या गवती छायेखाली ही जागा असते. ह्या चावडीच्या तीन बाजू बंद असतात. पुढील बाजू उघडी असते. बंद बाजू शेणामातीने लिंपून व सारवून काढलेल्या असतात. मागल्या कुडाला १-१।। फूट चौरस आकाराचा एक झरोका असतो. त्या झरोक्यात दोनतीन काड्या वा कामच्या आडव्याउभ्या फसविलेल्या असतात.

चावडीच्या पुढे अंगण असते. अंगणापेक्षा चावडी एकदोन पायऱ्यांनी उंच असते. चावडी व तिचे अंगण या दोहोंच्या दरम्यान शेकोटीचा लांबोळा खड्डा असतो. चावडीच्या अंगणात कोलामांची मुख्य देवता जी 'देवी', ती एका लहानशा उंचवट्यावर विराजमान झालेली असते. चावडीपुढील अंगणातही बैठकी भरत असतात. या चावडीत आणि तिच्या अंगणात बैठकींव्यतिरिक्त सामुदायिक सणवार व उत्सवही होतात. या चावडीचे स्वरूप एखाद्या धर्मशाळेचे, कार्यक्रम-भवनाचे वा सभागृहाचे असते. फरक एवढाच की, ही चावडी म्हणजे एक दरिद्री झोपडी असते आणि इतरेजनांची सभागृहे थाटमाट व श्रीमंती यांनी विनटलेली असतात ! ( चावडीची थोडी माहिती प्र. २ मध्ये पृ. ७८–७९ वर आली आहे. )

## न्यायमंडळाच्या निवडणुका

कोलामांचे कारभारीमंडळ नित्यासाठी एकच राहत नाही. तसे झाले असते तर हुकूमशाही पद्धतीचे वळण या मंडळास मिळण्याचा संभव होता. जणू या गोष्टीस आळा बसावा व लोकशाही खऱ्या अर्थाने रूढ राहावी, याच सद्हेतूने निवडणुका घेण्याची परंपरा या जमातीत प्राचीन काळापासून चालत आली असावी, असे वाटते.

चैत्र शुद्ध प्रतिपदा किंवा वर्षप्रतिपदा या दिवसाला वऱ्हाडात 'मांडवस' किंवा 'मांडोस' असे म्हणतात. या 'मांडोशी'च्या दिवशी प्रत्येक वस्तीतील कोलाम आपापल्या वस्तीच्या चावडीत जमतात. आधल्या वर्षी ज्या पदाधिकाऱ्याने वा व्यवस्थाकर्त्याने कामात कसूर केलेला असेल त्याचा आढावा घेतला जातो आणि सर्वांचे मत असल्यास त्याला त्या कामाच्या जबाबदारीतून मुक्त करण्यात येते. त्याच्या जागी नवा सदस्य सुचवून बहुमताने वा सर्वानुमते तो स्वीकृत करण्यात येतो. जो सत्कर्मी राहिलेला नाही, तो पदावर राहू शकत नाही, ही कोलामांची भावना आहे.

पानसुपारीचे पानदान पुढे करण्यात येते. त्यात एकेक विडा ठेवलेला असतो. 'पदाधिकारी होऊ इच्छिणाराने एक विडा उचलावा' असे आधीच सांगण्यात येते. जुनेच लोक पदांवर राहावेत असा सभेचा कल असला तर जुनेच पदाधिकारी त्या त्या पदाचे विडे उचलतात. ज्याला ते पद सोडावयाचे असते, तो त्या विडयाचा स्वीकार करीत नाही. नवीन व्यक्ती तो विडा स्वीकारून पदाधिकारी होते. एखाद्या पदावर जी व्यक्ती यावी असे बहुसंख्य लोकांना वाटते, त्याच व्यक्तीला ते बहुसंख्य लोक त्या पदाचा विडा उचलावयाचा आग्रह करतात. याचाच अर्थ असा की, बहुमत पाठीशी असेल तीच व्यक्ती विडा उचलते व निवडून येते !

आवश्यकतेनुसार न्यायव्यवस्था मंडळातील सर्वच सदस्य बदलविण्यात येतात. जुन्याच पदाधिकाऱ्यांना आपापली पूर्वपदे चालविण्याचा आग्रह कोलाम लोक करतात व तो आग्रह पुढारी लोक मान्य करतात. नाईक, महाजन, कारभारी व घट्या यांची तर निवड होतेच; परंतु तारमा ( भूमक ), देवकरी ( पुजारी ), पाऊलकरी, डफकरी व सोंगाड्या यांचीही निवड बहुमताने याच वेळी होते.

## पंचायतीशी मतभेद व परिणाम

कोलामांच्या जीवनात त्यांच्या न्यायपंचायतीचे प्राबल्य आहे. कोलामांची स्वतंत्र वस्ती म्हणजे त्यांचे एक राज्य असून या राज्याचा कारभार कोलामांची 'पंचायत' करते. हे सर्व जरी खरे असले तरी, कधीकधी पंचायतीच्या मुख्यांनी काहीशी अरेरावी केली किंवा इतरांना न जुमानता नको असलेले निर्णय घेतले तर त्यांच्यावर विश्वास न ठेवणारा, त्यांना न जुमानणारा एक विरोधी गट त्या वस्तीत एखाद्या वेळीं तयार होतो. त्यामुळे तेथील जातपंचायत अडचणीत येते. पंचायतीला अनुकूल असा एक गट असतो व दुसरा प्रतिकूल गट तयार होतो. हे दोन्ही गट तुल्यबल असले तर विरोधी गट अशा वेळीं समंजसपणाची एक भूमिका स्वीकारतो. तो गट त्या वस्तीचा त्याग तडकाफडकी करतो. त्यानंतर तो गट वस्तीत न राहता आपली स्वतंत्र वस्ती दुसऱ्या एखाद्या गावाजवळ, डोंगरालागत वा उतारापठारावर स्थापन करून आपल्या नव्या जीवनास कशी सुरुवात करतो, त्यासंबंधीची माहिती दुसऱ्या प्रकरणात ( पृ. ७५-७८ ) विस्ताराने आली आहे.

२ : :

## नीतिमत्ता

कोलामांचीच काय, पण कोणत्याही आदिवासी जमातीची नीतिमत्ता उच्च पातळीची असते, असे दिसून येते. नव्या व सुधारलेल्या संस्कृतीने विसंगत आणि

स्वार्थी भूमिका काही प्रमाणात व्यक्तिमात्रात येऊ लागते ! अशिक्षित व मागासलेला समाज स्पष्ट आणि सुसंगत जीवनाच्या चाकोरीतून जातो. त्यामुळे नीतिमत्तेपासून तो फारसा ढळत नाही. या दृष्टीने पाहिले असता कोलामांमध्ये नीतिमत्तेची पातळी उच्च असल्याचे आढळून आले आहे.

कोलाम लोक आपसात बहुतेक भांडत नाहीत. मूळात मारामारी, लावालावी अशा गोष्टींसाठी ते भितात. ते गावाजवळ राहत असले तरी कामाशिवाय गावात येत नाहीत. आले तरी मनाने मिसळत नाहीत. इतरांना ते बहुतेक भितात व म्हणूनच जंगलांच्या आश्रयाने राहतात. साहेबी वेषातील लोकांकडे बोलावूनही यायला ते कचरतात. 'गावबांधणी'चे धार्मिक नियम तोडू पाहणारांवर मात्र ते उलटतात. त्यांच्यात ऐक्य व संघटन कमालीचे असते. एखाद्या जातिबांधवाला कोणी विनाकारण त्रास दिला तर ते सामुदायिक रीतीने चवताळून उठतात. एरवी ते इतरांशी व स्वजातीशी अत्यंत प्रामाणिकपणे, इमानदारीने व सचोटीने वागतात. मालकांच्या नोकऱ्याही ते त्याच निष्ठेने करतात.

त्यांच्या जातीत स्त्रीविषयक अनीतीवरून फार तर आपसात भांडणे होऊ शकतात. एरवी ही जात भांडणादिकांच्या दृष्टीने अलिप्त व शांत आहे. पंधरा प्रश्न विचारा, ते एखाद्याच प्रश्नाचे उत्तर देतील किंवा मख्ख राहतील; फक्त तोंडाकडे पाहतील ! स्त्रीविषयक संशय वाढू नये, म्हणून यांच्या जमातीचा पुरुष सायंकाळनंतर मित्राच्या घरी जात नाही. मित्र घरी नसला व त्याच्या पत्नीबाबत कोणी संशय घेतला तर त्या स्त्रीला तर ते घातक ठरतेच; पण त्या पुरुषालाही येणारी बदनामी नको असते.

कोर्टकचेऱ्या व स्वजातीची न्यायपंचायत यांच्यापुढे जाण्यासही ते भितात; नव्हे असे घडणे हेच ते अपमानाचे मानतात. तुरुंगात जाणे ते नामुश्कीचे समजतात. गुन्हा कधी करू नये व न्यायमंडळाचे तोंड कधी पाहू नये ही यांची शिकवण असून ती मुलाबाळांना दिली जात असते. सर्व कोलाम एकोप्याने वागतात व निर्णय एकमुखी घेतात, यावरूनही त्यांच्या पारंपरिक उच्च मनोभूमिकेची कल्पना येऊ शकते.

त्यांचा विश्वास सर्वांवर असतो. उसने घेतलेले पैसे ते आठवणीने परत करतात. लेखी नसूनही ते उसना वा कर्जाचा पैसा पचवीत नाहीत. त्यांच्या घरांना कुलुपे नसत. कुलुपांचा प्रचार आजही त्यांच्यात नाही. दारांची रचनाच कुलुपे लावण्यासारखी नसते. त्यांच्याजवळ शिलकी पैसा नसतो, हे खरे असले तरी विश्वासामुळेही कुलुपे न वापरण्याचे त्यांचे धोरण असलेले दिसते. त्यांच्यातील वर्गण्यांच्या रकमेची अफरातफर झाल्याचे उदाहरण आढळत नाही.

मतभेदानंतर स्वतःच्या घरादारावर व स्थायी जीवनावर पाणी सोडून दूर जाण्याची तयारी ठेवणारी जमात मनोधैर्यात कुठेच मागे नसणार, हे पटायला अडचण पडू नये !

## गुन्हे व शिक्षा यांचे स्वरूप

कोलामांनी केलेले कोणतेही गुन्हे त्यांच्या जातपंचायतीपुढे येऊन निकालात निघत असल्यामुळे जमातीत सदाचार स्थिर राहण्यास मदत होते. व्यावहारिक गुन्हे हे सर्वसाधारण स्वरूपाचे मानले जातात व त्यांचे प्रमाण गंभीर गुन्ह्यांपेक्षा थोडे जास्तच असते. चोरीचा गुन्हा व्यावहारिक स्वरूपाचा समजला जातो; तर स्त्रीविषयक अनीतीचा गुन्हा गंभीर मानला जातो.

## चोरीचा गुन्हा

कोलामांकडूनही चोरीचा गुन्हा घडतो. छोटेमोठे चोर सर्वच जातींत, सर्वत्र आढळतात. उलट चोऱ्या करू नये अशी शिकवण देण्याचे व त्या होऊ नयेत म्हणून गुन्हेगारांना शिक्षा करण्याचे कार्य कोलामांच्या पंचायतीने सुरू ठेवले आहे. कोलामांची प्रसिद्धी शेतातील कापूस चोरण्यासंबंधी अधिक झालेली आहे.[1] परंतु प्रसिद्धीइतके ते चोर नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. शेतातील उभ्या झाडांवरील कापसाची चोरी त्यांच्यापैकी काहीजण करतात; पण ती चोरी जातिबांधवांमध्ये उघडकीस आली की, त्यांची जातपंचायत चोराला लगेच शिक्षा ठोठावते ! अर्थात चोऱ्या राजरोसपणे किंवा धंदा म्हणून करण्याची उजागरी कोलामांना नाही, हे स्पष्ट आहे. म्हणून त्यांना अप्रामाणिक ठरविण्यात स्वारस्य नाही. चोरी करून ती उघडकीस आली तर त्या कोलामास जातपंचायत १५-२० रुपये दंड करते. चोरी लहान असली तर दंड ५-१० रुपयांपर्यंत कमी करण्यात येतो. दंडाच्या वसुलीतून सर्व जातवाल्यांना चहापाणी, दारू ( – बंदी नसल्यास ) किंवा गुळाचे पाणी, शक्य तर भोजन दिले जाते. कोणत्याही दंडाच्या रकमेचा उपयोग प्रामुख्याने हाच केला जातो.

चोरी हा या जातीत विटाळच मानला जातो. अट्टल व बदमाश चोराला क्वचित दोनदोनशे रुपये दंड जातपंचायत मागते. दंड देणे भागच असते. दंड न दिल्यास त्या कोलामाला त्याच्या वस्तीतील सर्व कोलाम मिळून, सामुदायिक निर्णय घेऊन हद्दपार करतात. त्याला मारतात, झोडपतात आणि हाकलून देतात. असा चोर व बदमाश माणूस गुन्हेगार असूनही वस्तीत ठेवून तसले वातावरण जगवणे हे अप्रतिष्ठेचे मानले जाते ! ‘ पंचांचे माना ’ असाच आग्रह गुन्हेगारांना एकप्रकारे होतो. मानत नसल्यास त्याला वस्तीबाहेरच राहावे लागते. वस्तीबाहेर राहिल्यामुळे जातिनियमांची बंधने त्यास लागू होत नाहीत. तो निर्वासितासारखे एकाकी जीवन जगतो.

या संदर्भात माहूरकडील डाकू व लुटारू म्हणून लौकिक मिळविलेल्या शामा कोलामाचा उल्लेख करणे आवश्यक वाटते. या शामराव कोलामाच्या उदाहरणावरून संपूर्ण

---

१. Russell—Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III ( London, 1916 ), पृ. ५२६

कोलाम जमात डाकू व लुटारू आहे, असा बऱ्याच अनभिज्ञ शिक्षितांचा गैरसमज झाला आहे. हा शामा कोलाम आता अमरावती येथील तुरुंगात आहे. या व्यक्तीबद्दल अनेक उलटसुलट वार्ता पसरल्या व पसरवल्या गेल्या असल्या तरी त्यामुळे कोलाम जातीच्या वैशिष्ट्यांविरुद्ध त्या वार्तांचा कल फारसा झुकत नाही. एके काळी हा शामा कोलाम असाच त्याच्या जातपंचायतीने बाहेर काढलेला 'निर्वासित' होता, असे सांगितले जाते. परंतु, तरीही त्याने नंतर चोरी व लुटारूपणाचा आपला धंदा मोठ्या प्रामाणिकपणे केल्याची अनेक उदाहरणे दंतकथांच्या रूपाने किनवट, पांढरकवडा, यवतमाळ इ. भागात प्रचलित आहेत. हा जंगलात लपून राहत असे. जंगलात कामे करावयास आलेल्या कोलाम स्त्री-पुरुषांना तो भाकरी आणि पोळ्या आणावयास सांगत असे. त्याची भीती वाटून म्हणा, जातीच्या आस्थेने म्हणा वा पैशांच्या मोहाने म्हणा, कोलाम लोक त्यास चुपचाप अन्न पुरवीत असत. गव्हाच्या एकेका पोळीचे दहादहा रुपये व एकेका भाकरीचे दोनदोन रुपये तो कोलामांना देत असे. दानतीचा हा प्रकार हीन आहे, असे म्हणता येईल काय? एकदा तर या शामरावने झाडावर बसून राहून, खालून जाणाऱ्या फौजदाराच्या घोड्यावर उडी मारली! फौजदारास दाटले व खाली उतरावयास सांगितले. पायी चालणाऱ्या हुजऱ्याचा वेष त्या साहेबास दिला. साहेबाचा वेष हुजऱ्याला चढविला. हुजऱ्याचा साहेब झाला व साहेबाचा हुजऱ्या झाला! दोघांनाही हुकूम दिला की, खऱ्या साहेबाने घोड्यावर बसलेल्या खऱ्या हुजऱ्याच्या हुकमाने घोड्याचे लगाम धरून पोलीसठाण्यापर्यंत गेलेच पाहिजे! दोघांनीही भीतीने शामरावचा हुकूम पाळल्याची ऐकीव कथा यवतमाळ–किनवट भागातील बहुसंख्य जमातींत आजही प्रचारात आहे. कित्येक रझाकारांचे मुडदे पाडून हिंदूंना अभय देण्याचे कार्य या शामाने केले होते. दुष्ट धनिकांना लुटून शामाने गरिबांना धन वाटले. शामाने व्यक्तिगत स्वार्थ लुटालुटीतून मुळीच साधला नाही!

चोरीपेक्षा लहान गुन्हा करणाऱ्या कोलामास जातपंचायत पाचसहा रुपये दंड करते. उदा. सर्व कोलामांनी मिळून एखाद्या गरीब शेतकरी कोलामाच्या शेतात करावयाचे काम ('अतारी') ज्या दिवशी ठरले असेल त्या दिवशी गैरहजर असणारास तीनचार रुपये दंड होतो. स्वतःचे किंवा स्वतःच्या मालकाचे काम पाडून त्या दिवशी 'अतारी'ला हजर राहिले पाहिजे, अशी अपेक्षा असते. दंडासोबत पंचायतीच्या व जातभाईंच्या सामूहिक भोजनासाठी ऐपतीनुसार कोंबडेबकरे पण गुन्हेगाराने द्यावयाचे असते!

कोलामांना पोलिसांची भीती वाटते. त्यामुळेही यांच्यात चोऱ्यांचे प्रमाण कमी आहे. पूर्वीची कापूस–चोरीची प्रकरणे आता अगदीच कमी होण्याच्या कारणांमध्ये हेही एक कारण आहे. एखादा कोलाम पोलिसांद्वारा पकडला जाऊन त्याच्यावर कारवाई झाली आणि ती योग्य असली तर त्या गुन्हेगार कोलामाला जातपंचायत पुन्हा दंड

करते व त्याच्यावर जरब बसविते. अशा स्थितीत कोलामांवर अप्रामाणिकपणाचा आरोप करणे योग्य होणार नाही. 'चोऱ्या व गुन्हे करणारी जमात' म्हणून कोलाम जातीची प्रसिद्धी नाही. वन्य व शेतकरी म्हणूनच ही जमात ज्ञात आहे. शिवाय चोरी करणारे कोलाम तुरळकच असतात.

चांदा जिल्ह्यात वरोऱ्याकडे एका साहेबाला मारून त्याचे पैसे पळविणाऱ्या एका कोलामगटाला मध्ये जबरदस्त शिक्षा झाल्याची बातमी आहे. शामा कोलामाच्या विचित्र गुन्हेगारीचे स्वरूप वर आलेले आहे. वरोऱ्याकडील घटना अपवादरूप आहे आणि दारिद्र्याची पार्श्वभूमी तिला आहे. चोऱ्या किंवा अशासारखे गुन्हे करणारा वर्ग पोटाच्या खळगीसाठी असा वाममार्गी होतो. आदिलाबाद जिल्ह्याच्या उतनूर भागात इतर भागांतील काही गुन्हेगार कुटुंबे जाऊन स्थिर झाली, अशी माहिती मिळाली. त्यांत सर्वच जाती आहेत. कोलामांचाही त्यांच्यात समावेश आहे. एकतर, इतर जातीही त्यांत आहेत आणि फक्त काही कोलामकुटुंबेच अशी आहेत. यावरून संपूर्ण जमातीला ह्या घटना नियमरूप ठरत नाहीत. पारवा (ता. यवतमाळ) येथे खुनाच्या संदर्भात एक कोलाम मुलगा इतर जातींच्या मुलांसह पकडला जाताच तेथील कोलाम रात्रीतून 'तुलुर' (पळा!) म्हणून पळाले! या घटनेतून कोलाम लोक गुन्हेगार ठरण्यापेक्षा 'गुन्ह्याचा आरोप येऊन उपस्थित होणाऱ्या नसत्या भानगडींना कमालीचे भिणारे' ठरतात.

ही थोडीफार उदाहरणे वगळली तर कोलाम जात गुन्हेगारीच्या मनोवृत्तीची नाही. उलट इतर बऱ्याच जमाती भांडकुदळ व गुन्हेगार असतांना कोलाम त्या मानाने गरीब ठरतात!

## 'गावबांधणी'त शिरण्याचा गुन्हा

कोलामांच्या 'गावबांधणी'त इतर लोक शिरल्यामुळे कोलामांच्या धार्मिक भावना दुखविल्या जातात व ते त्यासाठी दंड मागतात, हे आपण देवदेवता व सणोत्सवांसंबंधीच्या प्रकरणातील 'गावबांधणी'च्या वर्णनात सविस्तरपणे (प्र. ५, पृ. २०६–११) पाहिले आहे.

## मुलगी पळविण्याचा गुन्हा

कोलाम जमातीतील तरुणाने कोलाम जातीतील तरुण मुलीला फूस लावून पळवून नेणे, हा गुन्हा या जातीत अनैतिक म्हणून फार मोठा मानला जातो. तसेच एखाद्याच्या घरी रखेली म्हणून कोलाम स्त्री राहिली तर तिला किंवा तिच्या घरातील लोकांना गुन्हेगार ठरविले जाते. असे गुन्हे मोठ्या स्वरूपात असल्यास त्यांचा निकाल जवळ-पासच्या तीनचार गावांतील कोलामांची पंचमंडळे एकत्र बसून लावतात. कारण अशा

गुन्ह्यांमध्ये नाजूक व महत्त्वपूर्ण प्रश्नांची गुंतागुंत असते. असे मोठे गुन्हे करणाऱ्या कोलामास दोनअडीचशे रुपयांपर्यंत दंड मागतात. दंड न दिल्यास त्यास जातीबाहेर तर टाकतातच; पण त्याला सर्वांसमक्ष फटके मारतात अथवा चांगलेच झोडपून काढतात. घोटी ( ता. जि. यवतमाळ ) या खेड्याच्या परिसरात एक कोलाम तरुण व एक कोलाम तरुणी पळून गेली. ते दोघे काही दिवस एकत्र राहिले. कोलामांच्या पंचायतींनी ह्या गंभीर गुन्ह्याची दखल घेतली व त्या दोघांना जातीतील लोकांकरवी पकडून आणले. त्यांना प्रत्येकी पन्नास-पन्नास रुपये दंड करून तो वसूल तर केलाच; परंतु दोघांनाही खांबाशी बांधून जाहीर रीतीने मार देण्यात आला. अशा अनैतिक बाबींना आळा घालण्यासाठी कोलामांची पंचायत नेहमीच जागरूक असते.

ज्या स्त्रियांना अनैतिक संबंधांतून संतती झाली असेल, त्यांनाही ही पंचायत दंड करते व शिक्षा ठोठावते. अशा तऱ्हेने निर्माण झालेल्या अकुलीन संततीची लग्ने होतांना फार अडचणी येतात. अशी संतती हा समाजात चर्चेचा, टीकेचा व उपेक्षेचा विषय होतो. तसेच, ज्या मुलीला कुमारी अवस्थेत मूल होईल तिला आपल्या मुलाच्या पित्याशी ' पाट ' लावावा लागतो. जातपंचायत त्या दोघांना तसे करण्यास भाग पाडते. प्रकरण उघडकीला आले नसल्यास गोष्ट वेगळी ! इतर काही अशिक्षित समाजांप्रमाणेच कोलाम जमातीतील क्वचित काही बाया मुसलमानांकडे रखेली म्हणून जाऊ लागल्या. त्यामागे दरिद्री कोलाम स्त्रियांच्या पैशांच्या लोभाची भावना असते, असेच प्रामुख्याने दिसून आले आहे. परंतु अशी अपवादात्मक उदाहरणेसुद्धा का घडावी याची दखल कोलामांच्या न्यायपंचायती घेऊ लागल्या आहेत.

## ' चप्पलमारी '

साधारणतः बऱ्याच आदिवासींमध्ये ' चप्पलमारी'चा गुन्हा असाधारण व सार्वत्रिक समजला जातो. गोंड–गोवारी या लोकांमध्ये तो रूढ आहे. एखाद्या कोलामास दुसऱ्या कोलामाने किंवा इतर जातीच्या कुणाही व्यक्तीने ' जोडा मारतो ' ' चप्पल मारतो ' असे म्हटले तरी ज्याला म्हटले त्या कोलामाला विटाळ पडतो ! तो विटाळला म्हणून त्यास अलगच राहावे लागते. त्या ' विटाळा'ने तो तसाच गावात शिरला तर त्याचे संपूर्ण घरच वाळीत पडते ! घर वाळीत पडू नये म्हणून ज्यास 'जोडा वा चप्पल मारतो' असे म्हटले तोच स्वतःस गुन्हेगार म्हणून जाहीर करतो. ' चप्पल-जोडा मारतो ' म्हटले तरी विटाळ होतो व चप्पल-जोडा मारला तरी विटाळ होतो !

चप्पल–जोडाच काय, पण कोणताही रबरी किंवा कातडी पदार्थ यांचा विटाळ कोलामांमध्ये मानला जातो. त्यांच्या वस्तीत इतरांनी सायकल घेऊन किंवा चप्पल-जोडा घालून जाऊ नये, असे त्यांचे म्हणणे असते. हे नियम आता शिथिल होत चालले असले तरी कोलामांच्या सार्वजनिक चावडीत चप्पल-जोडा मुळीच नेता येत नाही.

कोलाम नाहीतरी पूर्वी पादत्राणे वापरीत नसतच ! आता त्यांच्यात पादत्राणांचा प्रचार होऊ लागला आहे.

ज्याच्या बाबतीत ' चप्पलमारी'चा विटाळ घडतो, तो कोलाम-वस्तीच्या सीमेवर वस्तीबाहेर उभा राहतो व वस्तीतील जातभाईंना ओरडून जाहीर करून सांगतो, " मला अमक्याने जोडा वा चप्पल मारली " किंवा " अमक्याने मला जोडा वा चप्पल मारतो म्हटले. " तो विटाळल्याची माहिती या पद्धतीने वस्तीच्या जाति-बांधवांना कळते. ती माहिती मिळताच वस्तीतील कोलाम स्त्रिया ताटलीत वा थाळीत हळद, कुंकू, अक्षता व पाण्याने भरलेला तांब्या घेतात. ते पूजासाहित्य घेऊन त्या सामोऱ्या येतात आणि त्या माणसाला ओवाळून त्याची दृष्ट काढतात ओवाळून काढलेला कुंकू अक्षतांचा तो भाग गावाबाहेर फेकून देतात. त्यानंतर तो माणूस वस्तीत प्रवेश करू शकतो.

परंतु एवढ्यानेच तो दोषमुक्त होतो असे नाही. त्याला ' पोस्ता ' करून ' शुद्ध ' व्हावे लागते ! त्याशिवाय तो जातीत राहू वा मिसळू शकत नाही. या निमित्ताने जात-भाईंना ' पोस्ता ' देणे आवश्यक असते. शेतमालकाने शिवी दिली तरी त्याचा विटाळ हे लोक मानतात व ती शेती सोडतात. कधीकधी वस्ती पण सोडतात. ' चप्पल-मारी'तील प्रायश्चित्ते व नियम याही वेळीं लागू पडतात.

## ' पोस्ता '

अशा विटाळाच्या कोणत्याही गुन्ह्यातून मुक्त होण्याचा जाहीर समारंभ म्हणजे ' पोस्ता. ' या पोस्त्याच्या कार्यक्रमास फार महत्त्व आहे. तो झालाच पाहिजे ! पोस्त्या-साठी ठरलेल्या वेळेवर वस्तीतील सर्व कोलाम त्यांच्या चावडीत एकत्र जमतात. दोषी व्यक्तीने भरलेल्या दंडाच्या रकमेतून गूळ विकत आणलेला असतो. प्रथम देव धुतात व ते देवाचे ' तीर्थ ' ( पाणी ) गुळाच्या पाण्यात मिसळतात. ते तीर्थपाणी प्रथम त्या दोषी व्यक्तीस पाजतात आणि त्याच्या संसर्गाने वा आणखी प्रत्यक्षाप्रत्यक्ष कारणांनी दोष घडलेल्यांनाही ' शुद्ध ' करण्याचा सोज्ज्वळ हेतू ठेवून सर्वच कोलामांच्या हातावर ते तीर्थपाणी देण्यात येते. सर्व कोलाम ते तीर्थ पितात आणि नकळत कधीकाळी घडलेल्या विटाळापासून वा त्या पापापासून स्वतःस मुक्त करून घेतात. आता आपण, आपले जातिबांधव आणि विटाळ पडलेली व्यक्ती यांपैकी कुणीच दोषी उरले नसल्याची भावना सर्वांना सुखद वाटते. उरलेला गूळ ' सेरणी ' ( प्रसाद ) म्हणून वाटला जातो.

## प्रायश्चित्ताचे स्वरूप

गुन्हा घडलेल्या कोलामांना दंड करण्याचे प्रकार आहेत; तद्वतच जातिबहिष्कृत करून वाळींत टाकण्याचेही काही प्रकार आहेत. उदा. गुन्हा करूनही तो मान्य न करणाराचे समाजातील चिलीमचुट्टा वा चिलीमपाणी बंद केले जाते. जातीच्या

विहिरींवर पाणी ओढू देण्यास मनाई करण्यात येते. अशा व्यक्तींशी संबंध ठेवण्यास जातभाईंना बंदी करण्यात येते. कधीकधी शिवीगाळ व मारहाण करून अशा गुन्हेगारास अपमानित करण्यात येते.

जातिबहिष्कृत कोलामांना प्रायश्चित्त देऊन विधियुक्त जातीत परत घेतले जाते. ज्याला जातीबाहेर टाकले असेल तो सर्वांसमक्ष नदीवर जातो. तेथे नदीच्या पाण्यात तो आपले डोके भिजवतो व नंतर नदीकाठी क्षौर करवून घेतो. दाढीमिशी बोडून तो तेथे जवळच पेटत ठेवलेल्या विस्तवाजवळ येतो. तेथे बसून तो सर्व कोलामांना, आपला पूर्ण दोष जळून गेला, असे जोराने ओरडून सांगतो. त्यानंतर तो नदीच्या पाण्यात डुंबून स्नान करतो. परत येऊन जातीच्या लोकांच्या पायांचे ' तीर्थ ' घेतो आणि ते ' तीर्थ ' स्वतः पिऊन ' पूर्ण शुद्ध ' होतो ! पुरुषांप्रमाणेच जातीबाहेर टाकलेल्या स्त्रियांनाही विधिपूर्वक जातीत घेण्याची प्रथा कोलामांमध्ये आहे. वरीलप्रमाणेच सर्व विधी तिला करावे लागतात. इतकेच नव्हे, तर तिलाही पुरुषाप्रमाणे क्षौर करावे लागते !

कुत्रा आणि मांजर हे दोन प्राणी मारण्याची कोलामांना त्यांच्या परंपरेची मनाई आहे. कुत्रा किंवा मांजर मारण्याचा गुन्हा करणाऱ्या कोलामास जातपंचायत जातिबहिष्कृत करते. त्याला जातीत येण्यासाठी वरीलप्रमाणे प्रायश्चित्त घ्यावे लागते !

卐 卐 卐



कोलामांची ' चावडी '

१ : :

कोलाम ही जमात इतर बहुतेक आदिवासींप्रमाणे ' वन्य ' आहे. तिचा उल्लेख ब्रिटिश राजवटीच्या कागदपत्रांमध्ये ' वन्य जमात ' म्हणूनच केला जात असे. ' यवतमाळ जिल्हा गॅझिटिअर'मध्ये ' जंगली जमातींचा ( Forest Tribes ) जो एक वर्ग पाडला आहे, त्यांत गोंड, कोळी, आंध आणि प्रधान यांच्याबरोबर कोलामांचाही समावेश करण्यात आला आहे. रसेल-हिरालाल यांनीही या जातीचा उल्लेख ' वन्य व शेतकरी ' असा केलेला आहे.[१] प्राचीन काळापासून जंगलांच्या सान्निध्यात जंगली उत्पन्नावर जगण्याची या जमातीची धडपड आजही चाललेलीच दिसते ! आज मात्र केवळ जंगली उत्पन्नावर जगणे अशक्य असल्यामुळे बहुसंख्य कोलाम शेती किंवा शेतमजुरी करून जगतात. सुरुवातीच्या जंगली कामांकडून ते हळूहळू शेतीकडे वळत गेले. शेती व शेतमजुरी करताकरता आज त्यांचा तो उपजीविकेचा मुख्य धंदा झाला आहे.

कोलामांमध्ये कोणत्या व्यवसायाचे लोक आज आढळसात, त्याची कल्पना १९६१ च्या शिरगणतीमधील महाराष्ट्रासंबंधीच्या पुढील आकडयांवरून येईल.[२]

---

१. Russell–Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, अनुक्रमणिका

२. Census of India ( 1961 ), Vol. X, Maharashtra : Part V-A; [ 1964, Edited by—B. A. Kulkarni ]

# महाराष्ट्र राज्यातील कोलामांच्या व्यवसायांची आकडेवारी ( १९६१ )

| जिल्हा | | शेतकरी | शेतमजूर | जंगलकामगार | गृहोद्योग, तत्सम | व्यापारधंदा | बांधकाम, तत्सम | वाहतुकीच्या व्यवसायात | तांत्रिक काम व तांत्रिक नोकऱ्यांत | इतर नोकऱ्यांत | एकूण व्यवसायी | रिकामे ( काम न करणारे ) | एकूण संख्या ( कोलामांची लोकसंख्या ) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| यवतमाळ | पुरुष | ५,०४८ | ७,६३४ | ४०९ | १७२ | ९ | ५ | २ | १० | १४९ | १३,४३८ | ६,६४८ | २०,०८६ |
| | स्त्रिया | ३,७७३ | ९,७३८ | ४२ | ७ | १ | ० | ० | ० | ५१ | १३,६१२ | ७,३१५ | २०,९२७ |
| | एकूण | ८,८२१ | १७,३७२ | ४५१ | १७९ | १० | ५ | २ | १० | २०० | २७,०५० | १३,९६३ | ४१,०१३ |
| चांदा | पुरुष | ३४५ | १०८ | २४ | ३१ | ० | ० | ३ | ० | १ | ५१२ | २६६ | ७७८ |
| | स्त्रिया | २९५ | १२० | ० | ५ | १ | ० | ० | ० | १ | ४२३ | ३१५ | ७३८ |
| | एकूण | ६४० | २२८ | २४ | ३६ | १ | ० | ३ | ० | ३ | ९३५ | ५८१ | १,५१६ |
| नांदेड | पुरुष | ११८ | १४४ | १४ | ३३ | ३ | ५ | ० | ० | १५ | ३३२ | २३७ | ५६९ |
| | स्त्रिया | ५४ | २३२ | ० | ३९ | ० | ० | ० | ० | ० | ३२५ | ३५७ | ६८२ |
| | एकूण | १७२ | ३७६ | १४ | ७२ | ३ | ५ | ० | ० | १५ | ६५७ | ५९४ | १,२५१ |
| उस्मानाबाद | पुरुष | २ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | २ | १ | ३ |
| | स्त्रिया | २ | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ३ | २ | ५ |
| | एकूण | ४ | १ | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ५ | ३ | ८ |
| वरील चार जिल्ह्यांमिळून | पुरुष | ५,५१३ | ७,८८६ | ४४७ | २३६ | १२ | १० | ५ | १० | १६५ | १४,२८४ | ७,१५२ | २१,४३६ |
| | स्त्रिया | ४,१२४ | १०,०९१ | ४२ | ५१ | २ | ० | ० | ० | ५३ | १४,३६३ | ७,९८९ | २२,३५२ |
| | एकूण | ९,६३७ | १७,९७७ | ४८९ | २८७ | १४ | १० | ५ | १० | २१८ | २८,६४७ | १५,१४१ | ४३,७८८ |
| शे. प्रमाण | पुरुष | ३८·६० | ५५·२१ | ३·१३ | ३·०६ | | | | | | ६६·६४ | | |
| | स्त्रिया | २८·७१ | ७०·२४ | ०·२९ | ०·७६ | | | | | | ६४·२९ | | |
| | एकूण | | | | | | | | | | ६५·४७ | | |

यवतमाळ जिल्ह्यातील व्यवसायविषयक आकडे १९६१ च्या शिरगणतीत पुढीलप्रमाणे आहेत:—

| व्यवसाय | एकूण लोक | कोलाम |
|---|---|---|
| शेतकरी | २,०३,५९४ | ८,८२१ |
| शेतमजूर | ३,०३,९६७ | १७,३७२ |
| जंगलकामगार, तत्सम | ९,३७८ | ४५१ |
| गृहोद्योग | १४,७९६ | १७९ |
| व्यापारधंदा | १५,८३९ | १० |
| बांधकाम, तत्सम | ३,२०१ | ५ |
| वाहतूक-व्यवसाय | ३,५८५ | २ |
| गृहोद्योगासारखे काही व्यवसाय | ९,३१० | १० |
| इतर | ३०,९९३ | २०० |
| एकूण व्यवसायी | ५,९४,५६३ | २७,०५० |
| काम न करणारे | ५,०३,४१० | १३,९६३ |
| एकंदर | | ४१,०१३ |

वरील आकडे न्याहाळून पाहिल्यास, जिल्ह्यातील व्यवसायी व्यक्तींइतकेच, किंवा त्यांच्यापेक्षा थोडे कमी लोक विनाव्यवसायी आहेत. कोलामांमध्ये व्यवसायींच्या अर्धे लोक विनाव्यवसायी असल्याचे दिसते. जिल्ह्यातील अर्धे लोक रिकामे असतांना कोलामांत फक्त ⅓ लोक रिकामे दिसतात, याचा अर्थ कोलाम लोक अधिक कष्ट करतात, हे स्पष्ट आहे. परंतु अधिक कष्ट करणारा हा वर्ग आर्थिक दृष्ट्या सुखी नाही, हा विरोधाचा भाग लक्ष्यात घेणे आवश्यक आहे. इतर कोणत्याही समाजापेक्षा ते अधिक दरिद्री आहेत. अधिक कष्ट आणि कमी अर्थार्जन हे त्यांच्या जीवनातील अर्थ-समीकरण आहे.

कोलामांची प्रसिद्धी कष्टासाठी आहे. कोलाम स्त्रिया त्यांच्यातील पुरुषांपेक्षाही कष्टिक असतात. कष्ट उपसण्याचे व्रत त्यांची मुलेही घेतात. पृ. २५८ वरील तक्त्यात स्त्रिया आणि पुरुष यांचे श्रमकर्त्यांच्या संदर्भातील प्रमाण जवळजवळ सारखेच ( ६४·२९; ६६·६४ ) आहे असे दिसेल. कोलामांमध्ये शे. ६५·४७ इतके लोक काम करतात. उरलेल्या शे. ३४·५३ ची नोंद रिकामे किंवा काम न करणारे म्हणून केलेली आहे. कोलामांतील धडधाकट माणूस क्वचितच 'बेकार' राहतो. त्यांच्यातील धडधाकट माणूस कष्टाची कामे करतो. आजारी, अपंग, अधू यांचाच फार तर अपवाद असू शकतो. मग ही शे. ३४·५३ ही संख्या रिकाम्यांची कशी संभवते ? कोलामांमध्ये ० ते १४ या वयाचे कोलाम ( म्हणजे कोलाम मुले ) शेकडा ४१·२६ आहेत.

रिकामे कोलाम त्यापेक्षा कमी (शे. ३४·५३) आहेत. याचाच अर्थ असाकी १४ पेक्षा कमी वयाची मुलेही कामधंद्याला लागलेली आहेत. एवढे कष्ट करणारा वर्ग आर्थिक दृष्ट्या हलाखीचा असण्याची कारणे शोधणे आवश्यक असून त्यांच्या व्यवसायांच्या स्थितीतच ती निहित आहेत. त्यांच्या व्यवसायांचे विश्लेषण व विवरण केल्यास काही निष्कर्ष हाती लागू शकतात.

## शेती

कोलाम लोक प्रथम डोंगरांच्या उतरणीवर ३–४ घरांनिशी स्थिर होत गेले तेथेच त्यांनी उतरणीच्या डोंगराळ आणि पठारी जमिनीवर शेती करण्याची सवय लावून घेतली. परंतु ही शेती ते विशिष्ट पद्धतीनेच करीत असत. भूमातेवर यांचे अपार प्रेम! भूमातेचा अनादर करणे त्यांना खपणार कसे? तिच्या पोटात औजार खुपसून वार करणे त्यांना आवडणे शक्य नव्हते. म्हणूनच त्यांची आरंभीची शेती नुसते बी पिस्कारून दिले की होत असे. बी फेकले की पुन्हा जंगली व इतर कामांसाठी हे लोक मोकळे असत. तीळ, मटकी, मूग यांसारखी हलकी धान्ये उगवण्यासाठी उतरणीची जागा चांगली असते. आलेल्या पिकांची राखण करून वर्षाच्या शेवटी हाती लागलेले धान्य घरी आणावयाचे! पण या पद्धतीने धान्य पिकून पिकून किती पिकणार? केवळ शेती करून व पिके पिकवून जगणे कठीणच!

पुढे काही कोलामांनी धरणीवर औजारे चालविण्यास अप्रत्यक्षपणे सुरुवात केली. लोखंडी हत्यारे वापरण्यासाठी त्यांची भावना तयार नसल्यामुळे फक्त काठ्या व स्वतःचे हात यानी ते जमीन उकरून तिची अशी मशागत करू लागले. पूर्वीपेक्षा थोडे अधिक धान्य या रीतीने ते मिळवू शकत असले तरी दारिद्र्यातून त्यांना बाहेर काढण्यासाठी या रीतीचा उपयोग नव्हताच! जोडधंदे करून जगण्याचे उपाय त्यांना शोधावे लागत.

पुढेपुढे कुदळी, फावडी अशा हलक्या अवजारांनी खणण्यासाठी हे लोक तयार झाले. कुदळी-फावडी यांनी जमीन खणून शेती करावयाची रीत काही कोलामांत गेल्या शतकापर्यंत रूढ होती. मात्र, एका जमिनीला इतर आदिवासींप्रमाणेच हेही लोक कधी चिकटून राहत नसत. धरतीमातेला पुन्हापुन्हा फाडून-खणून त्रास देणे यांच्या भावनेला पटेना! २-३ वर्षांनी आपली जमीन सोडून दुसऱ्या जमिनीचा हे शोध घेत व तेथे शेती करीत. पहिल्या वर्षी कोणतीही नवी जमीन पीक भरपूर देते. पण मशागत नसलेली जमीन २–३ वर्षांनी पीक कमी देऊ लागते. नव्या जमिनीचा शोध भावनेने होत असला तरी पहिल्या वर्षी ती नवी जमीन थोडी फायद्याची पडत असे. तरीही औजारांवाचून करण्यात येणाऱ्या शेतीत फायदा असा कितीसा होणार? शिवाय जमीन डोंगराळ! अशा स्थितीत जमीन बदलूनही कोलामांची शेती फायद्यात पडत नव्हती.

निरुपाय म्हणून हे शेतकरी पुन्हा पहिल्या जमिनीवर येत. तोपर्यंत त्या जागेवर दुसऱ्याने शेती सुरू केली तर मात्र तीही जमीन जात असे. अशा तऱ्हेने परिवर्तन-पद्धतीने सोडलेली शेती पुन्हा वाहिली जाई. शेती बदलविण्याची ही पद्धती 'शिफ्टिंग कल्टीव्हेशन' या नावाने ओळखली जाते. या पद्धतीला आसामात 'झुम' आणि ओरिसात 'पोडु' असे नाव आहे.[१] ही 'पोडु' शेती करण्यात कोलाम ही जात आरंभापासून अग्रेसर असावी, असे वाटते. कारण त्यांची शेती व घरे जवळजवळ असत आणि (त्यांच्या शेतीजवळच्या –) त्यांच्या वस्तीला 'पोड' असे अजूनही म्हणतात. कोलामांची वस्ती त्यांच्या शेतीवर ओळखली जाते, यातच त्यांच्या कृषि-वैशिष्टयाची ओळख आहे. 'नाईकपोड'सारख्या जाती कोलामांमधल्याच असतील तर 'पोड' हे नावसुद्धा 'पोडु'शेतीच्या संबंधातच असले पाहिजे, असे म्हणावे लागेल.

इ. स. १९४१ पर्यंत तरी कोलाम लोकांत बरेचजण 'पोडु' पद्धतीची शेती करीत होते.[२] ही जुनी पारंपरिक 'पोडु'पद्धती कोलामांमध्ये क्वचित आजही आढळते. सेतुमाधवराव यांनी आदिलाबाद भागातील काही गावात 'पोडु'शेती असल्याची माहिती दिलेली आहे.[३] धानोरा, तिळणी (ता. आसिफाबाद), घाबा (ता. उतनूर), मारकाल-मेट्टा (ता. राजुरा) येथे 'पोडु'शेती करतांना काही कोलाम आढळतात. कोलामांच्या जुन्या पद्धतीचे हे अवशेष अलीकडे अगदीच कमी झाले आहेत. भावनेपेक्षाही या पद्धतीच्या अस्तित्वाला कोलामांचे दारिद्र्यच अधिक कारण होते. कोलामांची डोंगरी शेती पिकत नव्हती त्यामुळे पैसा नव्हता. बैल व अवजारे घेण्याची शक्ती नव्हती. अज्ञानामुळे शेतीची नवी पद्धती स्वीकारण्याची प्रवृत्ती नव्हती. त्यामुळे 'पोडु' पद्धतीच सुरू राहिली. काहींजवळ बैल असले तरी औजारे नसतात व औजारे असली तरी बैल नसतात. यांच्या ह्या दारिद्र्यामुळे गोंडांइतकीही चांगली शेती ते कधी करू शकले नाहीत. आदिलाबादेकडील जंगली भागातच 'पोडु' शेतीचे अवशेष आहेत. काहीशा सपाट व थोड्या सुधारलेल्या भागात 'पोडु' शेतीचा आढळ होत नाही. फार काय, कोलामांची घनता अधिक असलेल्या यवतमाळ जिल्ह्याच्या कोणत्याही भागातील कोलामांमध्ये 'पोडु' शेतीचा वापर असल्याची माहिती नाही. आज तर 'पोडु' शेती या भागात नाहीच; पण मागे केव्हा असल्याचेही कोलामांनी किंवा जवळच्या भागातील लोकांनी पाहिल्याचे आठवत नाही. यवतमाळ जिल्हा आदिलाबादेच्या मानाने थोडा पुढे असल्यामुळे इकडील कोलामांनी 'पोडु'ऐवजी शेजारातील कुणबी-शेतकरी करतात तशी शेती करण्याची प्रथा कधीच सुरू केली असली पाहिजे, असे अनुमान निघते.

१. व २. Dr. Verrier Elwin : Report of the Committee on Special Multipurpose Tribal Blocks (Ministry of Home Affairs, New Delhi, March 1960), पृ. (अनुक्रमे) ४८ व ३७८

३. P. Setu Madhao Rao : A Grammar of the Kolami Language (1950), प्रस्तावना

'पोडु' पद्धतीत तांदळाची शेती सुलभतेने होऊ शकते. म्हणूनच की काय कोलामांना आजही धानाची शेती उत्तम प्रकारे करता येते. परंतु सर्वच कोलामांच्या बाबतीत तसे दिसणार नाही. आदिलाबादेचा थोडा उत्तर भाग सोडला तर त्या जिल्ह्यातील बाकीच्या भागात भातशेती प्रमुख आहे. त्यामुळे तिकडील कोलामांना ते सहजशक्य आहे. वणी, चांदा व किनवट या भागात तळ्यांच्या सान्निध्यातील जमिनीत तांदूळ पिकू शकतो. तेथे हे लोक भातशेती करतात. त्या भागातील कोलामांचा कल धान पिकविण्याकडे होता आणि आहे. पोटासाठी धान्ये लागतात, या भावनेने व गरजेने ही पिके काढली जात. कापूस पैसा देतो. पैशापेक्षा कोलामांना धान्ये महत्त्वाची वाटत. यवतमाळ भागातील कोलामच काय; पण इतरही लोक पूर्वी ज्वारीच अधिक पिकवीत असत. परंतु पैसा देणारी पिके गरजेतून पेरली जाऊ लागली. आता कोलाम लोकसुद्धा कापूस पेरू लागले आहेत.

आज यवतमाळ भागातील कुणबी-शेतकरी आणि कोलाम पुरुष यांच्या वेषभूषेत फारसा फरक नसल्यामुळे त्यांना एकमेकांपासून अलग ओळखणे काहीसे कठीण जाते. कोलाम ही 'वन्य' जमात खरी; पण 'शेती करणारी वन्य जमात' म्हणूनच ही जमात पूर्वीपासून जास्त ओळखली जात असावी. 'पोडु' शेतीपद्धतीचे नाव यांच्या वस्तीला व अंशतः जातीला (१, नाईकपोड) आहे. यावरून शेतीशी त्यांचे नाते जुन्या काळापासून निगडित आहे. 'पोडु' शेती सुलभ व्हावी म्हणूनच डोंगराच्या उतरणीवर हे लोक राहू लागत. 'पोडु' शेती करणाऱ्या लोकांचे 'पोड' वसत असत.

आदिलाबाद जिल्ह्यातील तेलगू लोक कोलामांना 'मन्योड' असे म्हणतात. 'कोलाम' हे नाव तेलगू लोकांच्या तोंडी बहुधा नसतेच. शिरपूर व चिन्नूर तालुक्यातील कोलाम अगदी तेलगू झाले आहेत. त्यांनी भाषा तर तिकडची घेतलीच; पण वेषही तिकडील 'मन्नेपोड' लोकांचा घेतला. मन्नेपोड हे तेलगू शेतकरी आहेत. 'मन्योड' म्हणजे 'मन्नेपोड' नव्हत. तरीही या दोन नावांतील साम्यावरून असे दिसते की, 'मन्नेपोड'प्रमाणेच शेती करणारे ते 'मन्योड'! यावरून तेलगू भागात कोलामांची ओळख शेतकरी म्हणूनच होत आलेली आहे, हे दिसून येते. शिरपूर तालुक्यातील कोलामांत शेतकरी जास्त आढळतात. कोलामांना काही भागात 'भूमक' असे म्हणतात. 'भूमी कसणारे' या अर्थानेही हा शब्द रूढ झालेला असावा.

कोलाम लोकांची भाषा द्राविडी असून ती अतिप्राचीन आहे. त्यांच्या भाषेत कृषिजीवनाशी संबंधित असे अनेक शब्द आहेत. त्यावरून त्यांचा कृषिव्यवसायही प्राचीनच ठरतो. शिस्त व शिक्षण यांच्या अभावी त्यांचे कृषिजीवन त्यांना सुखाकडे नेणारे उत्साहवर्धक असे साधन ठरले नसले तरी त्यांच्या कृषिव्यवसायाच्या प्राचीनतेला त्यामुळे बाध येत नाही. शेत, कुंपण, पात, मेढ, लावणी, पेरणी, जमिनीचे प्रकार, निंदण, बी, बी फेकणे, कणसे, खळे, ज्वारी, हरभरे, बरबटी, तूर, मूग, वाल, चवळी,

बाजरा, तीळ , कापूस, मका, माळा वा मचाण, मचाणाच्या पायठुण्या, तास वा पिकांची रांग, औत, नांगर, बैल, गायीगुरांच्या गळ्यातील घंटा, कुटार, भूस, उफणणे, तिवा इ. कृषिजीवनातील शब्दांसाठी कोलामी भाषेत अर्थवाही व समर्पक प्रतिशब्द आहेत. यावरून ही जात बऱ्याच काळापासून कृषिसंबंधातील असली पाहिजे, असे वाटते.

कोलामांचे जे बहुविध सणोत्सव आहेत त्यांतून त्यांची कृषिभक्ती प्रकट होण्याजोगे कार्यक्रम काही वेळा करण्यात येतात. फणमोडी हा सण तर यांच्या भूमिपूजनाचा म्हणूनच प्रसिद्ध आहे. वर्षप्रतिपदेस शेतीची मशागत सुरू करण्याचा तो सण आहे. भीमाय्याक देवतेला बी अर्पण करण्याचा उत्सव हे लोक करतात. नवधान्ये, नव्या शेंगा, शेतीतील नवे वाण देवाला अर्पण करण्याचे विशेष उत्सव या जातीत होतात. झाडपेरणी सण, बायबाकी सण हे अशाच स्वरूपाचे आहेत. मळणीच्या वेळी तर ‘ मेढदेवने’ची पूजा मोठ्या थाटाने हे लोक करतात. ‘ अखरपखा’लाही देवाला ‘ नवे वाण ’ दिले जातात. शेतीला उपयोगी असलेल्या बैलांच्या व गायींच्या पूजेचे पोळा आणि दिवाळी हे सण इतर कृषकांप्रमाणे कोलामही धडाकेबाज पद्धतीने साजरे करतात.

तेव्हा, आरंभी वन्य असलेली ही जमात शेतकऱ्याचा व्यवसायही पूर्वीपासूनच करीत आलेली आहे, असे दिसते. मग ती ‘ पोडु ’ शेती असो की शेजारातील कुणबी-शेतकरी यांच्या पद्धतीने केलेली शेती असो !

‘ पोडु ’ शेती किंवा शेती हलविण्याची पद्धती कोलामांना फारशी फायदेशीर ठरलेली नाही. एका गटाचे दुसऱ्या गटाशी पटले नाही, तर एक गट ती वस्ती सोडून दुसऱ्या गावी जाऊन शेती आणि शेतमजुरी करी. शेतमालकाने शिवी दिली तरीही वस्तीचा व शेतीचा त्याग हे लोक करीत. अल्पसंतुष्ट वृत्तीमुळे व वस्तीचा त्याग करून नवे जीवन घडविण्याची यातायात करण्यामुळे या लोकांचे अर्थ-जीवन सुधारण्यास फारसा वाव नव्हता. वस्तीला नव्या गावी गेल्यावर बरडखरड, कुंध्याने भरलेली, पडीत, झाडाझुडपांची अशी हलक्या प्रतीची जमीन जमीनदार देई. अशी शेती परवडणार कशी ? कष्टात मात्र हे लोक मागे नसायचे.

नवीन वस्ती वसल्यावर शेती करतांना या लोकांचा उत्साह उधसून वर येतो, हे त्यांच्या गीतांवरून दिसते. शेतीवर अपार प्रेम असल्याचे ते द्योतक आहे. अशा गीतांमध्ये, पावा वाजविणारा नक्कल करीत हिंडतो असे दाखविले जाते. तो डोंगरी शेत शोधतो. ‘ झाडी असली तरी सोन्याची खाडी आहे ’ असे एकजण समजावून देतो. शेतासाठी लोहार व सुतार औजारे करून देतात. कुऱ्हाडी, पासा परजल्या जातात. विळे तयार करतात. अशा रीतीने शेतीसंबंधीच्या प्रक्रिया व तयाऱ्या झाल्याचे वर्णन या गीतांमध्ये येते. कोलामांच्या ‘ इतिहास’-कार्यक्रमाचा अर्धापाऊण भाग शेतीवाडीच्या

वर्णनांनी भरलेला असतो. 'इतिहास' हा कोलामांच्या भावजीवनाचा जुना ठेवा आहे. जुन्या काळापासून शेती करणाऱ्या कोलामांनी तो जपून ठेवला आहे. तसेच, 'इतिहासा'तून कोलामांच्या पूर्वापार कृषिव्यवसायाचा व त्या व्यवसायावरील प्रेमाचा परिचयही मिळतो.

स्वराज्यापूर्वी यवतमाळ जिल्ह्यातील कोलामांच्या शेतीची स्थिती कशी होती याची कल्पना ग्रिक्सन यांच्या माहितीवरून येते. ग्रिक्सन यांनी या भागातील गोंड, आंध, कोलाम, बंजारा, गोवारी, गवळी इत्यादि लोकांच्या शेतीसंबंधी जी माहिती दिली, तीवरून कोलामांच्या वाहितीची जमीन घटत गेलेली दिसते. बंजारा व गवळी यांची जमीन स्वतःची होती. कोलामांकडे स्वतःची जमीन होती किंवा बरेच जण ती मक्त्याने वाहत असत. बरेचसे आदिवासी आपल्या जमिनी पुढेपुढे गमावत गेल्याचे दिसते.[1] यावरून कोलामांमध्ये आधी बरेच लोक शेतकरी असले पाहिजे, असे अनुमान निघते. शेती बदलणे, शेती न परवडणे चांगली जमीन नसल्यामुळे पीक तोट्यात पडणे इ. कारणांनी तर कोलाम शेतकऱ्यांची शेती कमी होती गेलीच; परंतु अज्ञान व फसवणूक यांमुळेही इतर आदिवासींप्रमाणेच कोलामही नागवले गेले. ग्रामीण जीवनातील सावकार-संस्थेने अज्ञानी शेतकऱ्यांना कफल्लक केल्याची असंख्य उदाहरणे त्या काळी घडत. ग्रिक्सन यांनी पुसद भागाकडील दोनतीन उदाहरणे कर्जाच्या संदर्भात दिली आहेत.[2] ही उदाहरणे त्यावेळच्या जिल्हाधिकाऱ्याने घेतलेल्या मुलाखतींच्या आधारे दिली असून आंध, कोलाम व बंजारा या जातींच्या संदर्भातील आहेत. जरी कोलामांच्या दाट वसतिभागातील उदाहरणे नसली तरी ती पाहण्यालायक आहेत. एकाने वीस वर्षांपूर्वी बापाच्या नावे ६० रु. व स्वतःच्या नावे २० रु. कर्ज घेतले. त्या कर्जाची फेड तो वीस वर्षांपासून भिकूसेठ सावकाराकडे पैसे नेऊन करीतच होता. त्याने भिकूसेठकडे नगदी ५० रु., गाडीभर कापूस आणि खंडीभर ज्वारी नेऊन दिली तरी १७५ रु. देणे आहेत असे भिकूसेठचे म्हणणे होते. दुसऱ्या एकाने ४८ रुपये कर्ज घेऊन १२५ तोळे चांदी व १ तोळा सोने गहाण ठेवले. त्या गहाणाची कोणतीही पावती त्यास मिळाली नाही. ही उदाहरणे पाहून व इतर निरीक्षण करून ग्रिक्सन यांनी 'वस्तुतः येथील आदिवासींची परिस्थिती काहीच सुधारली नाही' असे उद्गार काढले आहेत.

१९६१ च्या शिरगणतीवरून ४३,७८८ कोलामांपैकी ९,६३७ कोलाम शेती करतात असे दिसून येते. त्या ९,६३७ तून ५,५१३ पुरुष व ४,१२४ स्त्रिया आहेत. कोलामांची शेती कमी आहे. त्या शेतीत त्यांचा उदरनिर्वाह नीट होत नाही. त्यामुळे पुरुष शेतीत राबतात व मजुरीच्या कामासाठी स्त्रिया बाहेर जातात. त्या दुसऱ्या

---

१ व २. W. V Grigson : The Aboriginal Problems in the C. P. and Berar ( 1944 ), पृ. ( अनुक्रमे ) १३३-३४ व १६८

लोकांच्या शेतकामावर मजुरीने जातात त्यामुळे १७,९७७ मजुरांपैकी १०,०९१ स्त्रिया असून पुरुष फक्त ७,८८६ आहेत. स्वतःच्या शेतीत पुरेशी कामे नसल्यामुळे पुरुषच तर दुसऱ्यांची कामे कधीकधी करतात; मग स्त्रियांना स्वतःच्या शेतीची कामे न पुरून त्या दुसरीकडे कामाला गेल्यास नवल नाही. एकूण काम करणाऱ्यांपैकी शे. ३८·६० पुरुष शेतीत राबतात; तर शे. २८·७१ स्त्रिया शेतीत असतात, असे हे प्रमाण दिसण्यामागेही आर्थिक परवड हेच कारण आहे.

जांभोरा (ता. दारव्हा), भिसनी, बाभूळगाव, नांदुरा खु., कळंब, मोहदरी (ता. यवतमाळ), झाडगाव, पंगडी, बोथ (ता. केळापूर) या गावांतील एकाही कोलामाचा शेती हा व्यवसाय नाही. तेथील सर्व कोलाम मजूरच आहेत. पाहणी केलेल्या ४८ गावांपैकी ही ९ गावे आहेत.

कोलामांमध्ये जितके शेतकरी म्हणून नोंदविलेले आहेत, त्यांच्यापैकी बहुतेकांची शेती स्वतःची नाही. स्वतःची जमीन नसलेल्या लोकांची आर्थिकता जेमतेमच असणार, हे उघड आहे. गेल्या १५ वर्षांपासून सरकारने त्यांच्यापैकी काहींना जमीन दिलेली आहे; काही भूदानात मिळाली आहे; तर काहीजण सहकारी शेतीत राबत आहेत. इ. स. १९६४ मध्ये शेतीच्या दृष्टीने ४८ गावांची पाहणी केली असता १,१२५ कुटुंबांपैकी ४९६ कुटुंबे शेती करणारी आढळली. २४९ कुटुंबांजवळ स्वतःची शेती असल्याचे दिसून आले. सरकारकडून मिळालेली जमीन किंवा स्वतःची जमीन दर कुटुंबामागे सरासरी १२ एकर असून मक्त्याबटईची शेती सरासरी १५ एकर आहे. एका औताची ही जमीन दिसत असली तरी यवतमाळ भागातील जंगली जमिनीचा दर्जा चांगला नसल्यामुळे ती अर्थार्जनाला पुरेशी ठरलेली नाही. कोलाम स्वतःच्या शेतीला पूरक म्हणून मक्त्याची शेती वाहतात; तर काहीजण आपल्या शेतीत कष्ट करून पुन्हा दुसऱ्याच्या कामाला जातात. मोहदा (ता. केळापूर) या गावी १२५ कोलाम-कुटुंबे असून जवळजवळ अर्ध्या लोकांजवळ २ बैलांची शेती आहे. तरीही ते वर्षातून काही दिवस मजुरीवर येतात, असा त्या गावातील कोलामांचा अनुभव आहे. महारथड (ता. यवतमाळ) येथील एका कोलामाजवळ स्वतःची २५ एकर बरड जमीन आहे. तीत वर्षाला ५ मण ज्वारी व मणभर कापूस पिकतो हा त्याचा अनुभव आहे. बोरगाव (ता. यवतमाळ) येथील सरपंच म्हणतात, “ येथे दोन कोलाम मक्त्याने शेती करतात; पण अजून मक्ता देण्याची त्यांची ऐपत नाही. ” धनोडी (ता. यवतमाळ) येथील कोलामांच्या नाईकाकडे स्वतःची १० एकर जमीन आहे. पण घरातील चार जणांचा निर्वाह होत नाही, म्हणून तोही मधूनमधून मजुरी करतो.

भूदानात मिळालेली जमीन ‘ मिळाली ’ याचा आनंद देणारी ठरली असली तरी ती जमीन देणाराने बरेचदा टाकाऊ, जंगली व बरडखरड पाहून दिलेली असते. यवतमाळ ता. तील सरपधरीची जमीन अशीच आहे. भोयर (ता. यवतमाळ)

येथील जमीन उत्पादनक्षम नसल्याचा अभिप्राय तेथील मुख्याने व्यक्त केला असून तो अगदी बरोबर आहे. भूदानात मिळालेली ५½ एकर जमीन वाहण्यासाठी पुरत व परवडत नाही. आधीच जंगली भागात राहणाऱ्या कोलामांच्या जमिनी नीट नाहीत; मग दानात मिळालेल्या जमिनींची कथा न वर्णिलेली बरी !

मेटीखेडा ( ता. यवतमाळ ) येथील पाहणीत मिळालेली माहिती उद्‌बोधक आहे. ४० कुटुंबांपैकी १२ जणांजवळ जमीन आहे. प्रत्येकी १२ एकर असे तिचे प्रमाण पडते. ती जमीन अगदीच हलकी आहे. लागवडीसाठी तगाई काढूनही पुरत नाही. ती काढण्यासाठी त्रासही बराच होतो. त्यामुळे सावकारी संस्थेकडे आजही वळावे लागते. असे सावकार अलिखित रूपात आज गावोगाव असून कोलामांना त्यांच्याकडे जावेच लागते. एक मण कापूस सावकारास द्यावा व त्याच्याकडून अर्धा मण सरकी आणावी, असे देवाणघेवाणीचे प्रकार करणे भाग असते. मेटीखेड्याच्या कोलामांचे हे अनुभव बोलके आहेत. शेती करणारा कोलाम आजही कर्जबाजारी आहे. त्याची शेती त्याला तुनूमुनू चालवावी लागते व तो एक आतबट्ट्याचा व्यवहार वर्षानुवर्षे ठरत जातो !

नांझा व पिंपरी ( ता. यवतमाळ ) येथील शेती ट्रस्टची आहे. तरीही कोलाम लोक स्वतःच्या मालकीतील जमिनीप्रमाणेच ती जमीन कसतांना दिसले. भालेवाडी ( ता. वणी ) येथील जमीन सरकारने दिलेली असून सहकारी पद्धतीने ती किती यश मिळविते हे अजून ठरावयाचे आहे. कारण ही योजना नुकतीच सुरू झाली आहे. सरकारने व्यक्तिगत वाहितासाठी दिलेली जमीन आयुष्यातील फार मोठा लाभ समजून आत्मीयतेने कसणारे कोलाम बरेच आढळले. गेल्या काही वर्षांत सरकारने त्यांना दिलेल्या जमिनीमुळे त्यांना कृतज्ञता वाटते. अलीकडे कोलाम लोक स्वतःही शक्य तेवढा जमिनीचा तुकडा विकत घेऊ लागले आहेत. पण अशी उदाहरणे तुरळकच दिसतात. नायगाव, पिंपरी ( ता. यवतमाळ ), कोल्हापूर ( ता. वर्धा ) अशा सुखवस्तू सुपीक प्रदेशाकडेच अपवादात्मक स्वरूपात हे घडते. सरकारने पुरविलेली औते, बैल, बी-बियाणे यांनीही त्यांचा काही वेळा फायदा होतो. नांझा येथे औते ( लोखंडी नांगर ) पुरविल्यामुळे कोलाम शेतकऱ्यांचा उत्साह अधिक वाढल्याचे दिसून आले.

परंतु अशी ही उदाहरणे कमी आहेत. कोलामांची शेती त्यांना फारशी परवडलेली नाही. कोलामांतील सर्वांत मोठा असा व्यवसाय असूनही या ' मोठ्या ' व्यवसायातील कोलाम ' श्रीमंत ' असल्याचे कधीच दिसणार नाही. २–३ गावांचा अपवाद वगळला तर कोठलाही कोलाम श्रीमंत नाही किंवा त्याचे घर झोपडीशिवाय मातीचुन्याचे, कौलांचे वा टिनाचे बहुतेक आढळणार नाही. शिलकी रक्कम, दागिने किंवा संपत्ती यांचा संचय या लोकांमध्ये दिसणार नाही. शेती असलेले शेतकरीही बव्हंश दरिद्रीच दिसतील ! काही वेळा तर या दारिद्र्याची कमाल उदाहरणे आढळतात. रासा ( ता. यवतमाळ ) येथे एका कोलाम शेतकऱ्याजवळ बैल आहेत; पण प्रयत्न

करूनही त्याला शेती करता येत नाही. तेवढा पैसाच त्याला उभा करता आलेला नाही. बैल भाड्याने देऊनच त्याला गुजराण करावी लागते. दोन भाऊ एकाच जमिनीच्या लहानशा तुकड्यावर राबतांना काही भागात दिसतात. जमीन कमी पडली तरी उपाय नसतो. अर्थात ती शेती दोघांनाही लाभप्रद ठरत नाही, हे आलेच !

अडचणींचे डोंगर असले किंवा कष्टापेक्षा मिळकत चालचलाऊ व कमी असली तरी कोलाम शेतकरी निराश झाला नाही. 'यंदा नाही, तर पुढे पिकेल' या आशेने धरतीमातेची सेवा तो प्रसन्नपणे करीत आहे. दरवर्षी येणारे सणोत्सव तो करतो. धरतीमातेचे पूजाप्रकार तो चुकवीत नाही. चैत्र आला की मशागत करतो. पाऊस सुरू झाला की यवतमाळ व वर्धा जिल्ह्यातील कोलाम शेतकरी कापूस पेरतो. नंतर ज्वारी पेरतो. बाजरी, तुरी पेरतो. बरडीवर तो उडीद, तीळ, मूग, मटकी यांसारखी पिके पेरीत असतो. किनवट, आदिलाबाद, वणी, चांदा या भागात वरील पिकांपेक्षा शक्य तेथे तांदळाची लावणी-पेरणी तो करतो. उतनूर ता.तील कोलाम शेतकरी तिळाचे पीक उत्तम काढतो. तिळाचे पीक घरी आणतांना उतनूर भागात कोणे एके काळीं नरबली देण्याची रीत होती, असे म्हणतात. कोलाम शेतकरी शेतात 'पाटा' ( एक विशिष्ट ओळ ) टाकून चवळी, काकडी, वाळूक, बरबटी, भेंडी अशा भाज्या तयार करतो. आंबाडी लावून खाण्याची, भाजीची व तागाची सोय तो करतो. भर पावसात कामे करतो. पावसाची 'झड' सुरू असली तर दोर-कासरे तयार करतो. बैल चारतो. घोंगडी डोकीवर घेऊन शेताची राखण करतो व बैलासाठी गवत कापतो. पिकातील हरळी, कुंधा अशासारखे गवत काढतो. निंदायला बाया सांगतो. डवरण करतो. पीक फुलोरले की मचाणावर बसून जागली करतो. पीक बहरते. हिवाळ्यात ज्वारी सोंगली जाते. कापूस आधीच निघू लागतो. भात तर निघालेलाच असतो. ज्वारी, तूर यांचे पीक खळ्यातील मळणीनंतर घरी येते. एकंदरीत, कष्टात तो कसूर करीत नाही. वऱ्हाडच्या सर्व शेतकऱ्यांचा हा स्वभाव आहे. तरीही शेती परवडत नाही; निदान बहुसंख्य कोलामांना तरी ती परवडत नाहीच, हे सत्य आहे !

कोलाम शेतकरी किती अगतिक असू शकतात, याचे प्रत्यंतर त्यांच्यातील 'अतारी' नामक उत्सवप्रथेवरून येते. वस्तीतील कोलाम शेतकऱ्याला शक्य होत नसल्यास, त्याची अडलेली कामे वस्तीचे इतर कोलाम सामुदायिकपणे त्याच्या शेतात कामाला जाऊन उरकवून देतात. एका वस्तीत अशा 'अताऱ्या' वर्षाकाठी २–३ तरी होतात. १०–१२ कुटुंबांत २–३ शेतकरी अगतिक व अतिदरिद्री असतात, असेच ही उत्सवप्रथा सिद्ध करते !

## शेतमजूर

कोलामांचा संबंध मुख्यतः शेतीशी अधिक येतो; मग तो शेती करण्याच्या निमित्ताने असो, शेतमालकाच्या नोकरीच्या निमित्ताने असो की शेतमजुरीच्या निमित्ताने

असो. स्वतः शेती करणाऱ्या कोलामांपेक्षा शेतमजूर कोलामांची संख्या अधिक आहे. इतर जातींतही हे प्रमाण तसेच आहे. १९६१ च्या शिरगणतीनुसार ४३,७८८ कोलामांपैकी १७,९७७ कोलाम शेतमजूर आहेत. काम करणाऱ्यांमध्ये हीच संख्या अधिक आहे. याचा अर्थ असा की कोलामांमध्ये मजुरी हा सामान्य व्यवसाय करणारे लोक जास्त असून त्यांची आर्थिक स्थिती समाधानकारक नाही ! १७,९७७ कोलाम शेतमजुरांमधून ७,८८६ पुरुष आहेत. पुरुषांपेक्षा स्त्रियांची संख्या जास्त म्हणजे १०,०९१ आहे. एकूण काम करणारांपैकी शे. ७०·२४ स्त्रिया व शे. ५५·२१ पुरुष शेतमजुरीच्या व्यवसायात गुंतलेले आहेत. स्वतःची शेती कसणारे कोलाम पुरुष आपल्या शेतीत राबतात. रिकाम्या वेळीं त्यांच्यापैकी काहींना दुसऱ्याची मजुरी करावी लागते. शेतकरी कोलामांच्या घरातील स्त्रियांना खुद्द त्यांच्या घरच्या शेतीतही पुरेसे काम नसते. त्यामुळे त्या इतरांच्या कामावर मजुरीने जातात. म्हणून कोलाम पुरुषांपेक्षा स्त्रियांमध्ये शेतमजुरांची संख्या अधिक आढळते.

शेतमजुरांचा प्रश्न खेड्यापाड्यात अलीकडे कठीण झालेला असल्यामुळे कोलामांनाही काहीशी रोजमजुरी मिळू लागली आहे. मात्र रोजमजुरीचे दर गरजेनुसार कमीजास्त होतात. रोजमजुरी सर्व वेळीं सारखी मिळत नाही. शिवाय बाराही महिने शेतीची कामे सर्वांना मिळत नाहीत. पेरणीच्या हंगामात पेरण्यासाठी काही स्त्रीपुरुषांची गरज असते. त्यानंतर निदाईच्या वेळीं मात्र स्त्रियांची जरुरी असते. निदणाच्या कामी पुरुष क्वचित येतात. गवताचे पुंजे सावडण्यासाठी निंदणाऱ्या बायकांमागे एखादा माणूस रोजाने असतो. याच वेळीं पुरुष डवरे हाकलण्यासाठी रोजाने जातात. नंतर जागलीसाठी काही पुरुषांना रात्रीचे काम मिळते. कापूस वेचण्यासाठी बायकाच मजुरीने येतात. पीक कापण्यासाठी ( सोंगणीला ) पुरुष व स्त्रिया मिळून मजुरीला जातात. ज्वारीची कापणी पुरुष करतात; तर तुरींचे सोंगण साधारणतः स्त्रियांकडे येते. मूग, मटकी, तीळ यांचे सोंगण संयुक्तपणे होते. खळे शिंपण्यासाठी पुरुष असतात, तर शिंपावयाचे पाणी आणण्यासाठी स्त्रिया असतात. ज्वारीची कणसे खुडण्यासाठी स्त्रियाच हव्या असतात आणि खुडलेली कणसे डाल्यात भरून खळ्यावरील फडाकडे आणण्यासाठी काही पुरुष आवश्यक असतात. आंबाडी सोंगण्याचे आणि सडकण्याचे काम बहुधा पुरुष करतात. खळ्यात कणसे घालून मळणीसाठी काही पुरुष लागतात तर उफणावयाच्या वेळीं काही स्त्रिया हव्या असतात. ज्वारी निघाल्यावर तुरीच्या 'पेन्या' गोळा करणे, कडबा जमा करणे ही कामे पुरुष करतात; तर 'पेट्या' खळ्यात टाकून त्यांना झोडपून तुरी काढण्याचे काम स्त्रियाच करतात. तुरीचे 'मदन' (फलकटासह असलेली तूर) खळ्यात पडले की मळणीचे काम पुरुष करतात. खळ्यावरील मळणीची कामे संपली की मातीसह पिकाचे दाणे गोळा करून ते धुण्याचे काम स्त्रिया करतात. त्या धान्यास 'मातीरा' असे म्हणतात. पुरुष कुटार, कडबा गोळा करून भरून ठेवतात. शेते 'उलंगत' येतात. (= उजाड होतात.) स्त्रिया 'मेंगी'चा (= मागाहून उरलेला)

कापूस वेचून काहीशी मिळकत करतात. त्यानंतर शेतीची कामे कमीकमी होत जातात. चैत्रात शेते वखरून-नांगरून तयार केल्यावर बायकांना रोजाने सांगून फणकटे वेचली जातात. वेचलेल्या फणकटांचे ढिगारे जमवून पेटवून देतात. एरवी उन्हाळ्याच्या हंगामात स्त्रिया बहुतेक शेतकामातून रिकाम्या होतात. पुरुषही शेतमजूर असल्यास या हंगामात शेतकामातून बहुतेक मोकळे असतात. स्त्रियांपेक्षा त्यांना कामे मात्र या हंगामात थोडी जास्त असतात.

रोजंदारीने शेतकामावर जाणाऱ्या स्त्रियांना सर्व भागात सारखी मजुरी नसते. महारथड (ता. यवतमाळ) या गावात १९६४ च्या पावसाळ्यात स्त्रीला १४ आणे रोजमजुरी मिळाली; तर सायखेड भागात (ता. यवतमाळ) मजुरीचा दर १। रुपया तर कधी १२ आण्यांच्या वर होता. बेलोना (ता. यवतमाळ) येथेही १२ आणे दर आढळला. नरसापूर (ता. यवतमाळ) येथे ८ आण्यांपासून १२ आण्यांपर्यंत रोजमजुरी या पावसाळ्यात कोलाम स्त्रियांनी मिळविली. कोपरा (ता. यवतमाळ) येथे १० आणे रोज होता. राशा (ता. यवतमाळ) या खेड्यात हा रोज ८ आण्यांपर्यंत घसरला होता. मेटीखेडा (ता. यवतमाळ) येथे हाच दर १९६३ मध्ये ४ ते ८ आणे एवढा होता. सालोड (ता. यवतमाळ) येथे १९६४ मध्ये १२ आणे रोज स्त्रीला मिळत असे. १९६४ इतकी रोजमजुरी त्यापूर्वी कोणत्याही वर्षी मिळालेली नव्हती.

काही वेळा ग्रामीण भागात पैशापेक्षा धान्यादि वस्तूंच्या रूपात मजुरी घेतली जाते. जीवननिर्वाहाच्या दृष्टीने ते बरेचदा उपयुक्त ठरते. ज्वारीच्या कणसांचे खुडण संपले की सायंकाळी मालक ५-५ च्या गटांनी (याला ‘फाडा’ वा ‘पाढा’ असा शब्द वऱ्हाडात आहे.) काही कणसे काम करणाऱ्या स्त्रीला देतो. ह्या मजुरीला ‘वण’ असे म्हणण्याचा प्रघात वऱ्हाडात आहे. धान्ये निघण्याच्या हंगामात स्त्रिया अशा तऱ्हेने वर्षाला लागणाऱ्या काही धान्याचा संग्रह करतात. हे धान्य फार कमी असते, हे मात्र खरे ! ही ‘वणे’तील कणसे ती स्त्री रात्री किंवा पहाटे घरी कांडते व पाखडून, साफ करून धान्य भरून ठेवते.

खेड्यापाड्यात कोलामेतर शेतकऱ्यांकडे एखाददुसरा नोकर शेतीकामासाठी असतो. कोलामांमधील स्वतःची शेती नसलेले कोलाम अशा शेतकऱ्यांकडे नोकरीला राहतात. कोलाम शेतकरी गरीब असल्यामुळे त्यांच्याकडे नोकरांची गरज नसते. पण गावातील कोलामेतर शेतकऱ्यांकडे कोलाम तरुण नोकरीला राहिलेले दिसतात. हे नोकर बहुतेक वेळा ‘सालाने’ राहतात. ‘सालाने’ नोकर ठेवण्याची ज्वारी व पैसे देण्याची एक पद्धती असून दुसऱ्या एका पद्धतीत फक्त पैसे दिले जातात. केवळ पैशांपेक्षा ‘ज्वारी आणि पैसे’ घेण्याचा करार बहुतेक नोकर करतात. कारण पैसे कपड्या-लत्त्यास हवे असतात, तद्वतच जगण्यासाठी डाळदाणाही हवा असतो. म्हणूनच धान्याचा करार उपयुक्त ठरतो. पावसाळ्यात धान्ये महाग होतात. कधीकधी ती दुर्मिळ

होतात. अशा वेळी ' धान्य-पैसे ' यांचा करार असला तर वर्षभर नोकराला ठरीव धान्य पुरविण्याची जबाबदारी मालकावर असते. रासा ( ता. यवतमाळ ) येथे १९६३ मध्ये एक कोलाम ' ५ कुडव महिना व २०० रु. साल ' घेऊन नोकरीस राहिला. ५ कुडव ज्वारी, तूर ही धान्ये दरमहा मालकाने त्या गड्यास द्यावयाची व शिवाय वर्षाला २०० रुपयेही द्यावयाचे, असे या कराराचे स्वरूप होते. त्याच गावात दुसरा नोकर त्याच वेळी केवळ ४५० रुपये सालाने राहिलेला होता. कोपरा ( ता. यवतमाळ ) येथे १९६४ साली एक कोलाम ५०० रुपये सालाच्या बोलीने मालकाकडे नोकरीस राहिला होता. अशा नोकरांनी लेखी करारमदार केलेले नसतात. तोंडी व सद्भावनेचे व्यवहार असतात. नोकरास सकाळपासून सायंकाळपर्यंत काम करावे लागते. शेतीकाम मुख्य असते. नोकराला सुट्या नसतात. गैरहजेरीचे पैसे कापले जातात.

## मजुरीची इतर कामे

काही कोलाम शेतीच्या कामांवर रोजंदारीने जातात. त्यांना सरासरी १।। ते २ रुपये मजुरी मिळते. कोलाम जमातीत शेतमजूर अधिक असले तरी ते केवळ शेतमजूर म्हणून बाराही महिने जगू शकत नाहीत. अशा वेळीं इतर व्यवसाय करणे त्यांना भागच असते. तेव्हा वर नोंदविलेले १७,९७७ शेतमजूर दुय्यम व्यवसाय करीत असतात, हे निश्चित समजावे. एरवी त्यांना उपासतापासच पडावयाचे ! आजही कामांची धावाधाव करूनसुद्धा उपवास काढण्याची पाळीं त्यांच्यावर येते. शेतीत कामे ज्यावेळीं मिळत नाहीत, त्यावेळी हे मजूर दुसरी कामे करतात. त्यांच्या या जोड-कामांचे स्वरूपही विविध असे आढळते. कोलामांच्या अशा जोडमजुरीचे व व्यवसायांचे प्रकार साधारणतः पुढे वर्णिल्याप्रमाणे आढळतात—

**गुरे वळणे:**— शेतकऱ्यांच्या गायी, म्हशी व शेळ्या जंगलात चारावयास नेण्यासाठी गुराखी असतात. निरनिराळ्या मालकांची गुरे एकत्र करून चारायला नेण्याचे काम वऱ्हाडात गोवारी लोक प्रामुख्याने करतात. काही कोलामसुद्धा ही कामे करतात. शेळ्या वळणारा शेळकी, गायी वळणारा गायकी व म्हशी वळणारा म्हसकी या नावाने ओळखला जातो.

**शेतीतील ' खोडे ' काढणे:**— पडीत जमिनीला प्रथम मशागत करून लागवडीला आणणे हे दुस्तर कर्म होय. त्या जमिनीत अनेक झाडे वाढलेली असतात. अशी झाडे कापून त्यांची मुळे ( = ' खोडे ' असा शब्द वऱ्हाडात प्रचारात आहे ) जमिनीतून काढावी लागतात. हे काम अंगमेहनतीचे असते. कोलाम लोक या कामावर जातात.

**बांध घालणे:**— अलीकडे शेतीत बांध घालण्याचे व त्यासाठी जमीन खणण्याचे काम सरकारी पद्धतीने होऊ लागले आहे. या कामावर काही कोलाम जातात. शेताच्या बांधाच्या एरवी होणाऱ्या कामांवरही हे लोक जातात.

**बैलगाडी-भाडे:—** शेतीत व शेतमजुरीत जम न बसलेले क्वचित काही कोलाम भाडयाने स्वतःच्या बैलगाडीतून लोकांच्या मालाची ने-आण करतात. पेठेच्या गावातून गरजू माल स्वग्रामी आणणे व गावातील कापूस-ज्वारी यांसारख्या वस्तू पेठेवर नेणे अशी कामे क्वचित काही कोलाम करतात.

**खोदकाम, दगड-फोडाई व तट्टे विकणे:—** दगड फोडणे, गिट्टी फोडणे, विहिरी खोदणे, घराचे पाये खोदणे व भरणे अशा तऱ्हेची कामे काही कोलाम करतात. काही हंगामांत शेतकरी आणि गावकरी यांना घरांसाठी व मांडवांसाठी तुराट्यापराट्यांचे 'कडे' किंवा तट्टे हवे असतात. ते तयार करण्यासाठी तुराट्या अथवा पराट्या पाण्यात काही दिवस मुरू देणे आवश्यक असते. मुरल्यावर 'कडे' (=तट्टे) विणता येतात. असे 'कडे' तयार करून ते विकण्याचे काम कोलाम कतरात. अशा कडयांचे ढोले (=कणग्या) तयार करून तेही हे लोक विकतात. हे लोक मचाणावर किवा लहान झोपडयांवर ठेवावयाचे इरलेसुद्धा तयार करून विकतात.

**खाटा, दोर, वाख, इ.कांची कामे:—** पूर्वी खेड्यापाडयात खाटा विणण्याची कला बहुतेकांना अवगत असे. आजकाल ही कला कोलामेतर विसरत चालले आहेत. खाटा ही खेडयांची आजही गरज आहे. खाली झोपणे अपमानाचे आहे असे खेडूत समजतात. खाटा सुलभतेने साध्य होतात व जागा भरपूर असते हेही कारण आहे. खाटा विणण्याचा साधा प्रकार 'पटाडी' या नावाने गावकीत ओळखला जातो. त्याशिवाय अनेक गुंतागुंतीचे व कलापूर्ण प्रकार आहेत. हे प्रकार कोलामांना अवगत असल्यामुले ते गावात भटकून अशी कामे करून देतात व लोकांकडून काही मजुरी मिळवितात. हेच कोलाम पावसाळ्यात पळस व भोसा या झाडांची मुळे खणून आणतात आणि त्यांचे वाख काढून बैलांची 'खोटरे' (=एक अलंकार), मुसकी (= तोंडास बांधावयासाठी केलेली) इ. वस्तू तयार करतात. शेतकरी त्या वस्तू विकत घेतात. आंबाडीच्या तागाचे 'पोड' (=पीळदार तंतू) विणून त्यांचे दोर करतात. जनावरांना उपयोगी पडण्याच्या दृष्टीने दोरांचे कासरे, दावे अशासारख्या वस्तू तयार करून कोलाम लोक शेतकऱ्यांना व गायीगुरे पाळणारांना विकतात. अशा तऱ्हेने काही रोजमजुरी मधूनमधून हे लोक मिळवितात. गावात काम मिळाले नाही तर दूरच्या किंवा शेजारच्या गावी काम शोधण्यासाठी जायची तयारी अलीकडे हे लोक ठेवतात. बेलोना व मडकोना (ता. यवतमाळ) येथील कोलामांनी 'मजुरी पोटापुरती मिळत नसल्याची' तक्रार केली असून बेलोना येथील कोलाम बाहेरगावी कामास जातात. एकदोघे तर नागपूरपर्यंत कामाला जाऊन येतात. बेलोना या गावातील कोलाम कमालीचे दरिद्री आढळले. कोलामांच्या वस्तीत सर्वत्र असणारी 'चावडी' बेलोन्यात नाही. परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळे तेथील कोलाम चावडीसाठी कष्ट आणि पैसा देण्यास अजून समर्थ नाहीत.

शेतमजुरीव्यतिरिक्त रिकाम्या दिवशी पुरुषांप्रमाणेच स्त्रियाही कष्टाची अनेक कामे करतात. किंबहुना स्त्रिया अशी कामे अधिक करतात. काही कामे स्त्रिया आणि पुरुष हे दोघेही करतात. आदिलाबाद जिल्ह्यात टोपल्या विणण्याचे काम कोलामांमध्ये फार चालते. उतनूर तालुक्यातील कोलाम स्त्रीपुरुष सुंदर टोपल्या विणतात. इंदरवल्ली ( ता. उतनूर ) या खेड्यातील कोलाम स्त्रीपुरुष बांबूच्या टोपल्या व चटया विणण्यात वाकबगार असून त्या गावी तो या लोकांचा जोडधंदाच असल्याचे दिसते.

## जंगली वस्तूंचे उत्पन्न

१९६१ च्या शिरगणतीत जंगल-कामगार म्हणून एकूण लोकसंख्येपैकी फक्त ४८९ कोलाम नोंदविलेले आहेत. त्यांत पुरुष ४४७ असून स्त्रिया फक्त ४२ आहेत. जंगलातील लाकूड तोडणे, मालठेले भरणे, लाकडी कोळशांच्या भट्ट्यांवर राबणे इ. कामे कोलाम पुरुष प्रामुख्याने करतात. लाकडी कोळशांच्या भट्ट्यांवर लाकडे जमविणे, पाणी आणणे अशी कामे कोलाम स्त्रिया करतात. पूर्णपणे जंगलकामाच्या या व्यवसायावर फार कमी लोक जगतात, हे खरे आहे ! कोलामेतर ठेकेदार लिलावात जंगल ठेक्याने घेतो. त्या भागात लाकूडतोडाई, लाकडी कोळशांच्या भट्ट्यांवरची इतर कामे यांसाठी जवळपासचे जंगली भागात राहणारे कोलामच मिळू शकतात. जंगलांचे अज्ञात भाग माहीत असलेले व जंगली जनावरांना भीक न घालणारे कोलाम ही कामे चांगल्या प्रकारे करू शकतात.

जंगली कामांवर राबणाऱ्या लोकांचे प्रमाण पुरुषांच्या बाबतीत शे. ३·०६, तर स्त्रियांच्या बाबतीत शे. ०·७६ आढळते. हे प्रमाण अत्यल्प दिसते, म्हणून जंगली कामांत हे लोक मागे आहेत, असे मुळीच नाही. आदिकाळापासून ही जमात सर्वप्रथम ' वन्य ' असून नंतर ती अन्यव्यवसायी आहे. त्यांच्या गीतरचनेवरून दिसते की, जंगलातील कामांवर त्यांचे प्रेम आहे. जंगली उत्पन्नावर सर्वांशाने जगणे केवळ अशक्य म्हणून बहुसंख्य कोलाम शेती व शेतमजुरीकडे, सुलभतेच्या टप्प्यातील म्हणून वळले. परंतु त्याही क्षेत्रात पोट ' जळत ' नाही, म्हणून ते अन्य कामे रिकाम्या वेळात करतातच. त्याशिवाय जगणेच शक्य नसते. या अन्य कामांमध्ये जंगली कामांना अग्रक्रम आहे. कोलाम लोक पूर्वीपासून ही जंगली कामे करीत आले आहेत. त्या कामापैकी काही कामे केवळ पुरुष करतात; काही कामे केवळ स्त्रिया करतात तर काही स्त्रीपुरुष मिळून करतात.

जंगलातील गवत कापणे व त्या गवताचे भारे तयार करून ते शेजारच्या मोठ्या गावी नेऊन विकणे हा या लोकांचा सर्वात आवडता असा पारंपरिक व्यवसाय आहे. स्वतःची घरे छावण्यासाठी तर यांना गवतकाडी आणावी लागतेच; पण विकण्यासाठीही हे लोक गवत कापून आणतात. कधीकधी ठेकेदारांनी जंगल घेतल्यास त्यांच्या कामावर गवत कापतात. ह्यांची जी गाणी आहेत त्यांतील बरीचशी मराठी, मराठी-गोंडी,

मराठी-कोलामी, गोंडी-कोलामी अशा विविध स्वरूपाची आणि गवत कापण्याच्या-सामूहिक आनंदाची द्योतक आहेत. जंगलातील गवताचे भारे भल्या पहाटे तयार करून कोलाम स्त्रिया जवळच्या मोठ्या गावी विकायला आणतात. भारे विकून ह्या बायका सकाळी १० वाजेपर्यंत स्वग्रामी परत जातात. जातांना मीठ, मिरची, दाळ, दाणे, तेल अशा आवश्यक जीवनोपयोगी वस्तू घेऊन जातात. पहाटे गवत कापतांना त्यांना कुणी अडविले तरी त्या ते काम सोडीत नाहीत. त्यांचे गवताच्या भाऱ्यांवर फार प्रेम असते ! कधीकधी जंगलाचा ठेकेदार किंवा गार्ड त्यांना अडवून परवाना किंवा पैसे मागतो. परंतु कोलाम स्त्रिया जुमानीत नाहीत. मात्र, पुढच्या खेपेला गवताची जागा त्या बदलवतात व अनुमतीच्या भागात गवत कापतात.

मोठ्या गावात गवताचे भारे विकण्याचे काम कोलाम करीत असले तरी हे लोक इंधनाच्या मोळ्या, शेण्या यासारख्या जळणाच्या वस्तू कधीच विकीत नाहीत. ह्या वस्तू महारमांग लोक विकतात म्हणून कोलाम लोक त्या विकत नाहीत. ह्या वस्तू विकणे ते कमीपणाचे व अशुभ मानतात.

उन्हाळ्यात चारे व टेंभरे ही वन्य फळे जंगलातून आणून मोठ्या गावांमध्ये विकण्याचे काम कोलाम करतात. ह्या वस्तू त्यांना फुकटात गोळा करता येतात. हीच स्थिती डिंकाची आहे. बाभूळ, धावडा, आजन, खैर अशा अनेक झाडांचा डिंक या जमातीतील स्त्रिया गोळा करतात. कोणत्या झाडांचा डिंक किमती असतो, याची माहिती यांना अनुभवाने झालेली असते. डोंगरी परिसरात डिंक गोळा करणे यांना सुलभ असते. हा डिंक मोठ्या गावी बाजारात नेऊन ह्या स्त्रिया विकतात. उन्हाळ्यात डिंक चांगला मिळतो, म्हणून त्याच वेळीं हे काम कोलाम स्त्रिया करतात. १९६४ च्या एप्रिल महिन्यात जोडमोहा ( ता. यवतमाळ ) येथील बाजारात शेजारच्या डोंगरी भागातील स्त्रियांनी १॥ रु. किलो या भावाने व्यापाऱ्यांना डिंक विकला. हा डिंक व्यापारी पुढे ४–४॥ रुपये भावाने विकतात असे समजले.

चारांची चारोळीं तयार करण्यात व बिब्यांची गोडंबी काढण्यात कोलाम स्त्रिया उन्हाळ्यात गुंतलेल्या दिसतात. ह्या वस्तू बाजारात किंवा मोठ्या गावी नेऊन त्या विकतात. चारोळीं ३ रुपयाला १०० तोळे याप्रमाणे व्यापारी घेतांना दिसतात व नंतर व्यापाऱ्यांना बराच फायदा होतो.

मोह वेचून हे लोक त्यांचा उपयोग खाण्यासाठी आणि दारूसाठी करीत असत. आता बंधने आल्यामुळे दारू काढण्याचा कोलाम पुरुषांचा एक धंदा बंद झालेला आहे. मोहाच्या झाडाखालून मोह वेचून आणण्याचे काम भल्या पहाटे घरून निघणाऱ्या कोलाम स्त्रिया करीत असत. तसेच उदरभरणासाठी कंदमुळे व वनस्पती यांचा वापर हे लोक कधीकधी करतात. जंगली वनस्पतींचे औषधी उपयोगही यांच्यापैकी अनेकांना अवगत असतात.

जंगली भागात राहत असल्यामुळे मधाच्या पोळ्यांचे अनेक प्रकार (झाडे-मोहोळ, आगेमोहोळ, कोतेमोहोळ, सातपुडे मोहोळ इ.) कोलामांना ठाऊक असतात. त्यामुळे ते कुशलतेने मधाच्या पोळ्यातून मध जमा करतात व मोठया गावी नेऊन विकतांना मध्येमध्ये आढळतात. ही कामे कोलाम पुरुष करतात. नुकतेच काही आदिवासी विदर्भाच्या विभिन्न विभागातून नागपूर येथे सत्याग्रहाला गेले होते. त्यांत राशा (ता. यवतमाळ) येथील एक कोलामही होता. त्याने आपल्या अनुभवांत सांगितले, "आम्ही नागपूरला पायी गेलो. अंतर सुमारे ८० मैलांचे होते. तेथे पोहचेपर्यंत आम्ही जंगलात मोहळे झाडली व मधावर भूक भागवून नागपूर गाठले!"

विडीचे व्यसन सर्वत्र असल्यामुळे आजकाल हा धंदा मोठ्या प्रमाणात चालतो. विड्या वळण्यासाठी कारखान्यांना टेंभुर्णीच्या झाडाची पाने पुरविण्यासाठी जंगली भागात ही पाने गोळा करण्याचा व्यवसाय काही लोक करतात. टेंभुर्णीची पाने गोळा करण्याची कामे जंगली भागात राहणाऱ्या कोलाम स्त्रिया मधूनमधून करीत असतात.

अशी ही जंगली कामे करून मोठ्या गावांच्या मदतीने आदिवासी जगतात. गावांपासून दूर राहूनही त्यांचे गावांशी जवळचे नाते असते व तेही आर्थिक संदर्भात! ह्यावर डॉ. इरावती कर्वे यांनी लिहिले आहे-"हे जरी अरण्यात असले तरी गावढ्यांशी त्यांचे शतकानुशतके साहचर्य आहे. 'गावांवर अवलंबून असलेले शिकारी' असे ह्यांचे वर्णन एका समाजशास्त्रज्ञाने केलेले आहे.[१]" हे वर्णन कोलामांनाही लागू असून गावांशी त्यांचे अशा बाबतीत तरी काहीसे साहचर्य आहे.

## शिकार

रिकाम्या वेळात शिकारीस जाणे हे कोलामांचे एक आगळे वैशिष्ट्य आहे. सामुदायिक शिकार करण्याची कोलामांची परंपरा आहे. सामुदायिकपणे शिकारीस जावयाचे असल्यास आधी वस्तीत दवंडी पिटून 'चावडी'पुढे सर्व पुरुषांना जमविले जाते. पुरुष शिकारीसाठी वस्तीबाहेर जाईपर्यंत स्त्रिया बाहेर निघत नाहीत. शिकारीला गेलेले कोलाम कधीकधी दोनदोन दिवस शिकारीत गुंतून राहतात. कधी रानातच शिकार भाजून खातात व पुनश्च शिकार साधतात. शिकारीशिवाय कोलामांनी गावात येऊ नये, असा संकेत आहे. शिकारीला या जातीत एवढे महत्त्व आहे. कोलामांच्या काही सणांमध्ये शिकारीचे कार्यक्रम अंतर्भूत आहेत, यावरून या महत्त्वाचे मापन करता येईल. 'फणमोडी' हा कोलामांचा सण भूमिपूजा आणि शिकार या दोन कार्यक्रमांनी साजरा होतो. शेती, शेतमजुरी आणि जंगलातील कामे या कोलामांच्या मुख्य व्यवसायांशी फणमोडी सणाचे असे जवळचे नाते आहे. 'मोहडोंबरी' या सणात मोह व चारोळी या वन्य वस्तूंचा मान असतो आणि शिकारही सामुदायिकपणे

---

१. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. १०६-१०७

केली जाते. होळीच्या सणालाही कोलाम लोक शिकारीस जातात. सामुदायिक शिकारीत मिळालेले मांस समान वाटप करून वस्तीतील प्रत्येक घरी देण्यात येते. बरेचदा शिकार सामुदायिकपणे शिजविण्याची यातायात मात्र हे लोक करीत नाहीत. कोलामांची 'पारध्याक' ही देवता शिकारीची म्हणून प्रसिद्ध आहे. शिकारीस जातांना या देवतेचे पूजन करण्यास कोलाम चुकत नाहीत. वनदेवता 'वाघाई' हिचाही या संदर्भात उल्लेख करता येईल. एकंदरीत, सणोत्सव आणि देवता ह्यासुद्धा कोलामांच्या शिकारीच्या जुन्या काळापासूनच्या आवडी सिद्ध करणाऱ्या बाबी आहेत.

कोलाम जमातीइतकी रानडुकरांच्या मागे सुसाट पळून शिकार करणारी जात दुसरी नाही. गोंडांचा क्रम डुकरांमागे पळण्यात दुसरा लागतो. कपड्यालत्त्यांची आणि जीवाचीसुद्धा पर्वा न करता सामुदायिकपणे डुकरामागे भरधाव पळून त्याला हे लोक मारतातच ! काही वेळा ह्यांना रानडुकरे इजाही पोचवतात. परंतु ह्यांनी त्याची पर्वा केलेली नाही. फार काय, रानडुकरांप्रमाणेच वाघाच्याही मागे लागून हे लोक त्याला मारू शकतात. अशी काही उदाहरणे घडली आहेत. वाघांनी इजा केल्यास तिला हे महत्त्व देत नाहीत. झाडपाले लावतात, काढे पितात व पुन्हा ठीक होतात. वर्षातून १५–२० डुकर एका वस्तीचे कोलाम मारतात. लहान वस्तीत ४–५ डुकर मारण्यात येतात. डुकराचे मांस सर्व कोलाम खातात. जयतुर हा देव तर डुकरांचा म्हणूनच यांच्यात लोकप्रिय आहे. यांच्या जातीच्या नावातही 'डुकर' ('कोल') आहे आणि डुकरांची शिकार हे यांच्या शिकारीचे एकमेव असे धाडशी वैशिष्ट्य आहे. मारलेल्या डुकराचे केस हे लोक पेठेच्या गावी नेऊन विकतात. बाहेर हे केस महाग मिळत असले तरी, कोलामांकडून व्यापारी हे केस डुकरामागे ४ रुपये या भावाने खरेदी करतात.

डुकरांच्या शिकारीची मुख्य आवड या जमातीस असली तरी डुकरे नेहमीच आढळणे कठीण जाते. अशा वेळीं इतर जंगली प्राण्यांची शिकार हे लोक करतात. रोही, हरणे, सांबरे, ससे, घोरपडी, खारी, उंदीर, बाटरे, लावे, भोऱ्या, मोर, देवचिमण्या, रानचिमण्या अशा अनेक पशुपक्ष्यांची शिकार करून त्यांचे मांस ते खातात. व्यक्तिशः पण हे लोक शिकार करीत असतात.

विकण्यासाठी मांसाचा वापर हे लोक करीत नाहीत. मात्र, रानडुकरांचे मांस कळंब येथील बाजारात सरपधरी, शिवनी या जंगली खेड्यांतील कोलाम विकावयास आणतांना व ते कळंबच्या कोलाम, गोंड आणि इतर जातींच्या लोकांनी विकत घेतांना अनेकांनी पाहिले आहे. दर मंगळवारी होणाऱ्या या बाजारात एका तरी डुकराचे मांस विकावयास येतेच, असा अनुभव आहे. एरवी शिकारीचे सर्व मांस हे लोक वाटून घरी शिजवितात व खातात.

शिकारीसाठी कोलामांना कोणतीही मोठी शस्त्रे नको असतात. बंदुकी, धनुष्यबाण किंवा शिकारीस उपयुक्त असे तीरकामठे ह्या वस्तू त्यांच्यापैकी एकाजवळसुद्धा शोधूनही

सापडणार नाहीत. तीरकामठा हे त्यांचे शस्त्र नाहीच! डुकरांसारख्या प्राण्यांचीही शिकार ते केवळ टेणप्यांनीच (टेणपे = जाडी काठी) करतात. प्रत्येकाजवळ हा सोटा असतो व त्यायोगे ते प्राणी मारतात. गुलेरी त्या मानाने त्यांना अगदीच भुक्कड वाटतात. डुकरांच्या शिकारीच्या वेळी फक्त एकदोघांजवळ एक 'बल्लम' (= भाला) असतो. रानडुकर अंगावर चवताळून येतो, त्यावेळी भालाकार कोलाम एका हातातील सोट्यावर उंच उडतो आणि त्याच क्षणी दुसऱ्या हातातील 'बल्लमा'ने त्याच्या अंगाखालून पळणाऱ्या रानडुकराच्या पाठीत वार करतो. बरेचदा हा शिकारी भाल्यावर उभा राहतो व सोट्याने डुकराचे मुस्काट फोडतो. ची ऽ ची ऽ करीत २–३ कोलांच्या घेत तो रानडुकर उताणा पडतो. साध्या शिकारीच्या वेळी यांच्याजवळ कधी-कधी साध्या व परशूच्या आकाराच्या कुऱ्हाडी असतात.

ससे, बाटरे यांसारख्या लहान प्राण्यांना पकडण्यासाठी 'लागाडी' नावाचे गुंतवळे हे लोक तयार करतात आणि ते हरभरे, धान, गहू यांसारख्या पिकात मांडतात. त्यांत ससे, लावे, तित्तिर यांसारखे प्राणी येऊन अडकतात. सणांच्या वेळी सामुदायिक-पणे आलेली शिकार कापून वाटे करण्यासाठी किंवा एरवीसुद्धा शिकारीचे मांस कापण्या-साठी लहान सुऱ्या, कुऱ्हाडी व विळे यांचा उपयोग हे लोक करतात.

कोलामांना शिकार मिळवून देण्यासाठी त्यांचे पाळीव शिकारी कुत्रे मदत करतात. शिकारीस निघतांना हे कुत्रे सोबत घ्यायला कोलाम विसरत नाहीत. दऱ्याखोऱ्यातून डुकरे, रोही, हरणे यांना पिटाळून काढणाऱ्या माणसांना या कुत्र्यांची फार मदत होते.

कोलामांच्या जीवनात शिकारीचे अनन्यसाधारण महत्त्व विशद करणारे एक प्राचीन गीत या जमातीत रूढ आहे. गीताची भाषा जुनी आहे. या जमातीची शिकारीच्या वेळची विनोदबुद्धी व खेळीमेळीचे वातावरण यांचा त्या गीतातून प्रत्यय येतो. (ते गीत ११ व्या प्रकरणातील गाण्यांत आले आहे.)

## मुख्य गृहोद्योग : सुतारकाम

शिरगणती-अहवालात महाराष्ट्रामध्ये गृहोद्योग करणारे कोलाम २८७ दाखविले आहेत. त्यांत स्त्रिया ५१ आहेत व पुरुष २३६ आहेत. काम करणारांमध्ये शे. ३·०६ पुरुष व शे. ०·७६ स्त्रिया या व्यवसायात येतात.

कोलामांचा गृहोद्योग फक्त सुतारकाम हा असून तो पूर्वापार चालत आलेला आहे. स्त्रिया या कामास फारशा पूरक नसतात. बहुतेक कोलाम-वस्तीत एखादा सुतार असतो. कधी तो त्याचा मुख्य धंदा असतो; तर कधी दुय्यम! कोलामांचे शेतीवाडीशी संबंध असलेले बहुतेक सारे सुतारकाम हा कोलाम सुतार करतो. कोलामेतर शेतकरीसुद्धा चांगल्या कोलाम सुताराकडे नांगरवखर इ. औते दुरुस्तीला व तयार करायला आणतात.

भोयर, शरद, गणोरी, घोडखिंडी, काप्रा-महारथड, मोळोना पोड, बोरगाव, घोटी, मडकोना ( ता. यवतमाळ ), बोथ, कृष्णापूर, सुभानहेटी-वर्धे ( ता. केळापूर ), चाणी, जांभोरा, नारकुंड, बोरीअरब ( ता. दारव्हा ), भालेवाडी, खेकडवाई ( ता. वणी ) या खेड्यांमध्ये कोलामवस्तीत एकेक कोलाम सुतार आढळला. जवळगाव व ढवळसर ( ता. दारव्हा ) येथील कोलाम-वस्तीत सुतार नाहीत. कळंब ( ता. यवतमाळ ) येथील जयतुर नामक कोलाम सुतारकी करीत होता. आता तो मेल्यानंतर कुणीच कोलाम त्या वस्तीत सुतारकी करीत नाही. भिसनी ( ता. यवतमाळ ) येथील सुतार दोन शेतांचा मालक झाला, म्हणून सुतारकी करीत नाही. कोल्हापूर ( ता. वर्धा ) पिंपरी, मादणी, मेटीखेडा ( ता. यवतमाळ ) व सखी खुर्द ( ता. केळापूर ) या गावी दोनदोन कोलाम सुतार आहेत. चिखलधरा ( ता. केळापूर ) व चिचबर्डी ( ता. यवतमाळ ) येथे तीनतीन कोलाम सुतार आढळले. कोलाम सुतार साधारणतः दोन रुपये रोजी कमावतो.

लाकूडफाट्यांशी जंगलांमुळे संबंध येणाऱ्या कोलामांच्या विश्वात सुतार वैपुल्याने आढळत असले तरी लोहार मात्र तुरळक आढळतात. धातूंशी या जमातीचा संबंधच एकंदरीत कमी येतो असे दिसते ! नाही म्हणावयाला काही वस्तींमध्ये सुतारकी करणारे कोलाम थोडेसे लोहारकाम करतात व काम भागवतात. एरवी लोहाराकडे जाऊनच कोलाम आपल्या विळ्यासारख्या वस्तूंना धार लावून घेतात ! भोयर या यवतमाळ-जवळच्या गावात मात्र एक कोलाम लोहारकाम करतो.

कपडे शिवण्याचे यंत्र क्वचितच एखादा कोलाम चालवतो आणि लोकांचे कपडे शिवून देऊन उपजीविका करतो. पण हा उद्योग अलीकडचा आहे. आष्टी ( तां. यवतमाळ ) येथे एक कोलाम तरुण हे काम करतो. तसेच, शहरात दूध नेऊन विकण्याचा धंदा क्वचित करण्यात येतो. शहराजवळच्या खेड्यांतच अशी उदाहरणे आढळतात. यवतमाळपासून ५ मैलांवर असलेल्या भारी या खेड्यातील एक कोलाम सायकलीवर दूध घालून यवतमाळला पोचवतो.

## व्यापारधंदा

व्यापारधंद्यात कोलामांना रस नाही. ४३,७८८ कोलामांत फक्त १४ लोक व्यापारात आहेत आणि हा आकडा अगदीच क्षुल्लक आहे. हे १४ लोकसुद्धा दुकानदाराकडे नोकरीला आहेत. दुकाने चालविणे यांच्या बाबतीत शक्यच दिसत नाही. वस्तुतः यांच्या स्वतंत्र वसाहतींमध्ये एखादे दुकान कोलामानेच चालवायला हरकत नाही. परंतु कोलामाचेच काय, पण इतराचेही कोणतेच दुकान यांच्या वस्तीत नसते. भारी ( ता. यवतमाळ ) तेथे यांच्या वस्तीत एक दुकान आहे. पण ते कोलामाचे नाही. कोल्हापूर ( ता. वर्धा ) येथे तर कोलामांनी दुसरा एक दुकानदार परगावाहून आणला.

## बांधकाम, वाहतूक, तांत्रिक व इतर व्यवसाय

४३,७८८ कोलामांतून बांधकामांत १०, वाहतूक व्यवसायांत ५, तांत्रिक कामांत १० व इतर व्यवसायांत २१८ व्यक्ती आहेत. इतर व्यवसायांत १६५ पुरुष व ५३ स्त्रिया आहेत. बांधकामांत दहापैकी दहाही पुरुषच आहेत. साधारणतः सडकांवरची कामे आणि घरे बांधण्याची कामे या संदर्भातील हे नोकर असावेत, हे उघड आहे. चिचबर्डी ( यवतमाळजवळ ) येथील एक कुटुंब सडकनिर्माणकार्यात राबत आहे. वाहतुकीच्या व्यवसायात जे पाच लोक आहेत, ते ड्रायव्हर व कंडक्टर असावेत. कोलाम जमातीचा एक ड्रायव्हर यवतमाळला आहे. तांत्रिक कामात असलेले दहा कोलाम जीनफॅक्टरीतील नोकर असण्याची शक्यता आहे. यवतमाळजवळच्या खेड्यांचीच ही संख्या असावी. यवतमाळजवळ असलेल्या भोयर या गावातील पाच कोलाम दरवर्षी हिवाळ्यात यवतमाळच्या कापसाच्या जीनफॅक्टरीत कामाला जातात.

इतर व्यवसायांतील लोक पहिलीदुसरी किंवा चौथीसातवी शिकलेले आहेत. शिक्षणाचे प्रमाण अगदीच अल्प आहे. त्यामुळे मोठ्या व चांगल्या नोकऱ्यांत कोलाम नाहीत. पोलिसात एकही कोलाम गेल्याची माहिती नाही. लासीन्याचा ( ता. दारव्हा ) एक तरुण पोलीस व्हायला गेला व प्रशिक्षण सोडून आला, असे सांगतात. नांझा ( ता. यवतमाळ ) येथे कोलामांची फार मोठी वस्ती आहे. तेथून सातवी उत्तीर्ण असलेले दोन शिक्षक निघाले. एकजण अजून नोकरीत आहे. येरंडगाव, डोळंबा ( ता. यवतमाळ ), चाणी ( ता. दारव्हा ) व मोहदा ( ता. केळापूर ) येथेही एकेक कोलाम शिक्षक असून त्यांचे शिक्षण सातवीपर्यंत झालेले आहे. ह्यांपैकी एकजण प्राथमिक शाळेवर मुख्याध्यापक आहे. बोथ व घुबडी ( ता. केळापूर ) येथे एकएक शिक्षक कोलाम जातीतील असून त्यांचे शिक्षण नववीपर्यंत झाले आहे. एका मुलीची निवड शिक्षकिणीच्या प्रशिक्षणासाठी झाली होती. पण तो योग हुकला. या जातीत अजून एकही शिक्षिका किंवा तत्सम स्त्री नाही. कोलाम जातीतील एकमेव कारकून कोल्हापूर (ता. वर्धा) येथील असून त्याचे शिक्षण मॅट्रीकपर्यंत झाले आहे.

पुणे येथे साबणाच्या कारखान्यात या जातीचा एक २२ वर्षांचा तरुण काम करतो. तो नांझा ( ता. यवतमाळ ) येथील असून बोरीअरब ( ता. दारव्हा ) व भोयर ( ता. यवतमाळ ) येथील एकेक तरुण सेनादलात नोकरीस गेला आहे. संगमसावंगी येथे वनरक्षकाचे काम करण्यासाठी एक कोलाम तरुण नोकरीस लागलेला असून टिपेश्वर ( ता. केळापूर ) येथे एक ग्रुपसेक्रेटरी पण आहे. मोदाटी येथे एक कोलाम वनरक्षक असून तो मराठी चौथी उत्तीर्ण आहे. पहिलीदुसरी शिकलेले काही युवक चपराशाच्या नोकऱ्या विकासखंडासारख्या कार्यालयांतून करू लागले आहेत.

अशा नोकऱ्यांमध्ये जाणारी ही मंडळी अगदी अलीकडची व तरुण आहे. इतर जमातींच्या मानाने अशा लोकांची संख्या अगदीच निराशाजनक आहे, ही मात्र वस्तुस्थिती आहे.

## २ : :

कोलामांच्या व्यवसायांचा जो आढावा आतापर्यंत घेण्यात आला, त्यावरून ही जमात आर्थिक दृष्टया कमालीची मागासलेली आहे, हे सहज दिसून येईल. वर्धे (ता. केळापूर) येथील एका सर्वोदयवादी कार्यकर्त्यांचे मत असे आहे की, "भटक्या जमाती सोडल्या तर या भागात कोलाम ह्याच जमातीचा क्रम आर्थिकतेत व सुधारणेत शेवटचा लागेल." हे मत वास्तव असेच आहे.

कोलामांची आर्थिक स्थिती समाधानकारक नाही. त्यांची घरे बहुतेक बुराची व कुडाची आहेत. पक्की घरे नाहीत. त्यांच्या घराची जागा फारशी मोठी नाही. स्वतःची शेती फारशी नाही. मिळकत विशेष नाही. कष्ट करूनही उपवास अधिक पडतात. म्हणून शिकार व जोडव्यवसाय यांच्या शोधात ते असतात. त्यांच्यापाशी राखीव धान्य नसते. थोड्याफार लोकांजवळ असले तर ते अंगणात एक ढोली (=लहान कणगी) करून साठवून ठेवतात. पेवे यांच्या जमातीतील लोकांच्या मालकीची नसतात. विकावयाचे उत्पन्न हे लोक शेतीवाडीतून फारसे काढीत नाहीत. जगावयाचे उत्पन्न (उदा. ज्वारी, तूर इ.) शेतीतून काढण्याकडे त्यांचा कल असतो. शिवाय त्यांच्या डोंगरी जमिनीत कापूस फारसा चांगला पिकत नाही. बरडी जमिनीवर जगणे शक्य होत नाही. कंदमुळांवर जगण्याची मधूनमधून पाळी येते. परंपरेपेक्षा आर्थिक दुरवस्था हेच कारण यांच्या शेतीतील व जंगलातील विविध व्यवसायांच्या पद्धतींमागे आहे. माणिकगड (जि. चांदा), उतनूर (जि. आदिलाबाद) या भागातील कोलामांचे जीवन अधिक खडतर आहे. यवतमाळ जिल्ह्यातील डोंगरी भागातील कोलामांचीही हीच स्थिती आहे. सपाट भागातील (वर्धा, बोथ इ. तालुके, यवतमाळ ता. चा उत्तर भाग) कोलामांचे आर्थिक जीवन काहीसे बरे आहे. पण फारसे अंतर नाही, हेही सत्य! कोलामांजवळ सोने आणि सोन्याचे दागिने नसतात. त्यांचे दागिने चांदीचे व तेही ५–६ नगांपुरते मर्यादित असतात. त्यांचे अर्थजीवन मर्यादित आहे. गोंड लोकांच्या मानाने ते खडतर आहे. खालचे जीवनमान असलेले हे लोक मेंढरे, गाव-डुकरे इ. प्राणीही पाळीत नाहीत. शेळ्या आणि गायी यांच्यापैकी काहीजणांजवळ असतात. वस्तीत २–३ जणांजवळ एकदोन गायी असतात आणि अर्ध्याहून अधिक घरी एखादुसरी शेळी असल्याचे दिसते. स्थानपरत्वे कोलामांचे आर्थिक जीवन बदलते असल्यामुळे त्यांच्याजवळची शेळ्या आणि गायी ही गुरेही कमीजास्त असतात. मात्र त्यामुळे यांच्या आर्थिक स्थितीत सुधारणा या पशूंमुळे होते असे नाही. संख्येने ही गुरे आगदीच कमी असतात. कोंबड्या व पाळीव कुत्रे हे मात्र यांच्याजवळ भरपूर असतात. परंतु कोंबड्या आणि कोंबड्यांची अंडी यांचा व्यापार हे लोक करीत नाहीत. घरगुती खाण्यात त्या वस्तूंचा वापर ते करतात.

## अंक, मापे आणि बाजार

मर्यादित अर्थ-जीवनामुळे कोलामांच्या जीवनात अंकांचीही गरज जणू फारशी पडत नसावी. म्हणूनच की काय, यांच्यात फक्त पाचपर्यंतच आकडे आढळतात. आदिलाबादेकडे हे अंक दहापर्यंत असल्याचे अंशतः आढळत असले तरी तेलगू भाषेच्या प्रभावाने ते स्वीकारलेले दिसतात. वीसचा आकडा मात्र कोलामांच्या भाषेत आहे. वीसवीसचा गट करून दोरीला गाठी माराव्या व आठवणी ठेवाव्या, अशा स्वरूपाचे व्यवहार खेड्यांतून चालतात. कोलामांतील वीसचा आकडा अशाच गरजेनून निर्माण झालेला असावा.

धान्य मोजण्याच्या मापांशी खेडुतांचा जास्त संबंध येतो. त्यामुळे 'चिट्टे' हे लहान शेराचे माप व पायली हे माप त्यांना आधीपासून माहीत आहे. त्यांच्या भाषेत पायलीला 'मुत्ता' असे नाव आहे. लांबी मोजण्यासाठी हात, दीडहात, वीत, आव, बोटे अशी मापे ग्रामीण भागात वापरण्यात येतात. वीत, हात व बोटे या मापांना कोलामी भाषेतही नावे असल्यामुळे लांबी मोजण्यासाठी हात, वीत आणि बोटे यांचाच वापर कोलाम लोक आधीपासून करीत असले पाहिजेत, असे दिसून येते. एरवी, इतर मापांचा प्रचार फारसा यांच्यात नसावा. अलीकडे ग्रामीण भागातील अंक व मापन यांच्यातही गरजेप्रमाणे आलेले आहे.

कोलाम लोक बहुधा लहान खेड्यांत व जंगली भागात राहतात. अशा खेड्यांतून बाजार भरत नसतात. बहुधा ५–२५ गावांमिळून एका मोठया गावी आठवडी बाजार भरतो तेथे हे लोक जाऊन आठवड्याचे गरजेपुरते पदार्थ विकत आणतात. बाजाराचा दिवस यांना आनंदाचा वाटतो. हा आनंद त्यांच्या 'इतिहास' नामक प्रकरणातील नृत्यगीतांमध्ये स्पष्टपणे रंगविण्यात येतो. विवाह, उत्सव इ. प्रसंगी रात्रीच्या वेळीं होणाऱ्या गीतनृत्यांच्या कार्यक्रमात जी अनेक गीते होतात, त्यांत बाजाराचे गीत चांगलेच रंगते. हे गीत संवादरूपाने नाचतानाचता म्हटले जाते. त्यात, बैलगाडी जुंपण्याची तयारी करायला स्त्रिया सुचवितात. पुरुष बैलगाडी तयार करतो. स्त्रियांच्या मताने बाजाराच्या गावाची वाटचाल होते. बाजारात आल्यावर पानविडे तयार करून स्त्रीपुरुष त्यांचे सेवन करतात. ज्वारी, मीठ, मिरची, तेल असले पदार्थ विकत घेऊन सायंकाळच्या आत हे लोक गावाला परततात.

आठवडी बाजारात क्वचित डुकराचे मांस, डिंक असले पदार्थ विकायला काही कोलाम येतात. परंतु बहुसंख्य लोक आठवड्याचे खाद्यपदार्थ विकत घ्यायला येत असतात. सायंकाळी ५-५॥ च्या दरम्यान बाजाराच्या गावाहून हे लोक बोलतबोलत स्वग्रामी परततात, त्यावेळीं डाळ, दाणे, मीठ, मिरची अशा सामानाने भरलेले एक फाटक्या चिरगुटांचे गाठोडे यांच्या डोक्यावर असलेले दिसते व एका हातात खायच्या तेलाची बुधली आढळते. कधीकधी एरंडेलाची दुसरी बुधली आढळते.

卐 卐 卐

इ. स. १९६१ च्या जनगणनेत एकूण ४३,७८८ कोलामांचे पुढील गट नोंदविले आहेत—

| ० ते १४ वयाचे | १५ ते ४४ वयाचे | ४५ च्या वर | वयाची नोंद नसलेले |
|---|---|---|---|
| ४१·२६% | ४३·६४% | १५·१०% | — |
| पु. ८,८९७ | ९,२३९ | ३,२९७ | ३ |
| स्त्रि. ९,१६३ | ९,८६० | ३,३१३ | १६ |
| ए. १८,०६० | १९,०९९ | ६,६१० | १९ |

मी १९६४ मध्ये घेतलेल्या नोंदींमध्ये सालोड, धनोडी, सायखेड बु., नरसापूर, नांदुरा खु. आणि नांझा या खेड्यांतील १,०९५ कोलामांचे निरनिराळे वयोगट पुढीलप्रमाणे आढळले—

| वय वर्षे | पु. | स्त्रि. | ए. | शे. प्र. | पूर्ण महाराष्ट्राचे शे. प्र. |
|---|---|---|---|---|---|
| ० ते १४ | २१८ | २३१ | ४४९ | ४१ | ४१ |
| १५ ते ३४ | १४० | १५१ | २९१ | २७ | ३२ |
| ३५ ते ५९ | १६० | १३७ | २९७ | २७ | २१ |
| ६० च्या वर | २८ | ३० | ५८ | ५ | ६ |
| एकूण | ५४६ | ५४९ | १,०९५ | | |

**म्हातारपण**

ग्रामीण जीवनात म्हातारपण कुचकामी ठरत नाही, हा अनुभव आहे. सत्तरीच्या घरातील म्हाताऱ्या व म्हातारे स्वकष्टावर जगतांना आढळतात. तरुणपणातील कष्टाचे शरीर म्हातारपणी दगा देत नाही. कोलामांतही तसेच आढळते. शिकारीच्या कामात कोलाम म्हातारे पुढे असतात. घरात एकटीच असलेली ८५ वर्षे वयाची म्हातारी मजुरी करून जगतांना आढळते. आयुष्यभर कष्ट केल्यामुळे म्हातारपणी कठीण कामे करण्याची सवय राहते. यासंबंधी एक मजेदार उदाहरण आढळले. नांझा ( ता. जि. यवतमाळ ) या गावी पाऊणशे वर्षांचा एक म्हातारा कोलाम होता. तो एवढ्यातच मरण पावला. जुन्या पिढीतील कर्ता व धीरगंभीर माणूस म्हणून त्याचा जातीमध्ये लौकिक होता. एकदा हा म्हातारा पहाटे उठला आणि आपल्या गोठ्यातील गुरांचे शेण काढण्यास गेला. गोठ्यात जाताच त्यास एक भयानक दृश्य दिसले. गोठ्याच्या बाहेरल्या

बाजूने ' कडगळा'शी ( = काटक्यांच्या तकलादू कुंपणाशी ) एक वाघ बसला होता. त्या वाघाचे तोंड गोठ्याच्या उलट बाजूस होते. त्याची लांब शेपटी ' कडगळा'तून गोठ्यात आली होती. गुरे भयभीत झाली होती. म्हातार्‍याने परिस्थितीचा अंदाज घेतला. लपतछपत जाऊन त्याने त्या वाघाची आत आलेली शेपटी आपल्या दोन्ही हातांनी पकडून घट्ट धरली. वाघ जोराने ओरडून पळण्यासाठी धडपडू लागला. परंतु म्हातार्‍याने शेपटीची पकड मुळींच ढिली होऊ दिली नाही. म्हातार्‍याने ओरडून लोकांना हाका दिल्या. काही लोक आले, पण वाघ पाहून दुरूनच पळाले ! म्हातार्‍याचा अखेर निरुपाय झाला. सुमारे अर्ध्या तासानंतर त्याने वाघाची शेपटी सोडून दिली. आधीच घाबरलेला वाघ सुटका होताच जोराने गावाबाहेर पळत गेला !

७५ वर्षे वयाचे किंवा त्यापेक्षा अधिक वयाचे कोलाम २२ गावांत शोधले. त्या गावांमधील ३,५३३ कोलामांमध्ये ६० जण ७५ किंवा ७५ वर्षे वयाच्या वरचे आढळले. कोलामांमध्ये शे. १·७ स्त्रीपुरुष ७५ किंवा ७५ वर्षे वयाच्या वर जगणारे आहेत, असे यावरून दिसते. पुरुषांचे व स्त्रियांचे वेगवेगळे प्रमाण पाहिले असता या वयाच्या स्त्रिया पुरुषांपेक्षा थोड्या कमी आढळल्या. जंगली भागातील गावांत ( उदा. मोहदरी, शरद पोफळणी, खैरी, गांढा, वर्धे ) या वयाचे अधिक लोक आढळले. हे प्रमाण अशा भागापुरते तरी शे. १·९ पर्यंत दिसले. सरासरीपेक्षा हे प्रमाण थोड्या अंशाने अधिक आहे.

## २ : :

## रोगराई

प्रत्यक्ष रोगराईने मृत्यू येतो, या गोष्टीवर कोलामांचा विश्वास नाही. एखाद्या देवाच्या प्रकोपाने रोग येतात, म्हणजेच ' देवाच्या करणी'ने लोक मरतात, असे ते मानतात. बहुतेक लोक देवाच्या कोपाने, बाहेरचा देव किंवा भूत ' लागल्या'ने अथवा जादूटोणा केल्याने मरतात, ही त्यांची मनोमन धारणा आहे. त्यामुळे दवाखाने व नवी औषधे यांवर त्यांचा विश्वास नाही. उलट, दावाखान्यांच्या आगमनाने रोग वाढले, असे त्यांच्यापैकी अनेकांचे म्हणणे आहे. मोठमोठ्या रोगांच्या बाबतीतही दवाखाने जवळ करण्याची त्यांची इच्छा नसते. त्यामुळे अकाली व अनाठायी मृत्यू ओढवल्याची असंख्य उदाहरणे या जमातीत सापडतात. ' भगत ' हा त्यांचा वैद्य आहे व तो सांगेल त्याप्रमाणे मंत्रतंत्राचे, गंडेदोर्‍याचे प्रकार करायला ते लोक तयार असतात. रोग आला की देवाला कोंबडीचे पिलू द्यावे, नवस करावा असले मार्ग ' भगत ' सांगतो व ते मार्ग

कोलाम लोक श्रद्धेपोटी अनुसरतात. याचा परिणाम अकाली मृत्यूचे प्रमाण वाढण्यात होतो. एकीकडे धडधाकट शरीरे, कष्टाचे जीवन, उघड्यावरचे जगणे, मुबलक व ताज्या हवेचा लाभ, शिकारीचे पदार्थ सेवन करणे इ. घटकांमुळे कोलामांचे आयुर्मान वाढत असते, तर दुसरीकडे अचानक व आगंतुक अशा रीतीने येणाऱ्या रोगराईनी, विशेषतः साथीच्या रोगांनी त्यांच्या आयुष्याला कात्रीही लागते. अशा दुहेरी चक्रात त्यांचे आयुर्मान कधी घटते, तर कधी वाढते व ते संतुलित राहते.

### वनस्पती-औषधी

जडीबुटी, कंदमुळे व झाडपाले यांची माहिती कोलामांना बरीच असते. यांपैकी काहींचा उपयोग औषधी म्हणून ते काही वेळा करीत असतात. कारण जंगलात वावरतांना जखमा होणे, जनावरांशी झगडतांना इजा पोचणे असले प्रसंग त्यांच्यावर नेहमी येतात. अशा वेळी तेथल्या तेथे झाडपाले लावून जखमांचे तात्पुरते निवारण करतात. एवढे मात्र खरे की, अनुभवाने माहीत असलेल्या कित्येक वनस्पतींनी त्यांना हटकून गुण येतो. परंतु ही माहिती सर्वच कोलामांना नसते. स्त्रियांना ती माहिती कमी असते; तर वृद्धांना त्यात बरेच गम्य असते, असे आढळून आले आहे. 'भगता'पेक्षा अशा वनस्पती-औषधींना काहीसे कमी दर्जाचे स्थान त्यांच्या जीवनात असते, ही वस्तुस्थिती मात्र विसरता कामा नये.

### साथीचे रोग

साथीचे व वेगाने पसरणारे रोग आले म्हणजे तो देवीचा प्रकोप आहे, असे हे लोक मानतात. त्यामुळे त्यांवर खरी उपाययोजना ते करीत नाहीत. अलीकडे रोगराईचे प्रमाण निरनिराळ्या उपायांनी कमी झाल्याचे सगळीकडेच आढळते. पण कोलामांना ही विचारपद्धती अजूनही आकलन होत नाही.

माता-रोगाची साथ आली की 'आया' या देवतेची पूजा ते करतात. ( इतर समाजांतही त्यासाठी 'आई' पूजली जाते. ) पटकी आल्यास लोक पटापट मरतात आणि तरीही ते इतर अडाण्यांप्रमाणे देवीलाच पूजत राहतात. नांझा ( ता. जि. यवतमाळ ) येथे कोलामांचे सहा 'पोड' आहेत. त्यांतील 'गव्हाणकडी पोड' ३०-३५ घरांचा होता. परंतु मध्ये एकदा कॉलरा आला व सुमारे २५ घरांतील बहुतेक कोलाम पटापट मरून गेले. प्रेतांची दुर्दशा झाली. त्यांची विल्हेवाट लावणे कठीण गेले. आता त्या 'पोडा'वर फक्त चार घरे उरली आहेत. त्या साथीच्या वेळी काही घरे दुसरीकडे वस्तीला गेली. तात्पर्य हे की, कोलामांमध्ये साथीच्या रोगांच्या वेळी अधिक मृत्युसंख्या आढळून येते.

### महारोग

समाजापासून महारोग लपवून ठेवण्याची प्रवृत्ती सगळीकडेच आढळून येते. कोलामही या गोष्टीस अपवाद नाहीत. उघडकीस आल्यानंतरही कोलाम महारोगी

अलग राहत नाहीत. ते वस्तीमध्ये स्वतःच्या घरातच राहतात आणि घरातील मुला-माणसांत मिसळतात. शेजारच्या थोड्या मोठ्या गावी दवाखान्याच्या सोयी-सवलती उपलब्ध असल्या तरी त्यांचा फायदा ते घेत नाहीत. 'भगता'च्या व देवदेवतांच्या 'ठाणक्याठुणक्यां'च्या (जादूटोण्यांच्या) मार्गानेच आपण बरे होऊ हे त्यांना स्वतःला तर वाटतेच, परंतु वस्तीतील इतर जातिबांधवसुद्धा त्याच मार्गांनी ते बरे होतील असे समजून तसेच वागत असतात. त्यामुळे अशा मोठ्या रोगांचे प्रमाण या लोकांमध्ये अधिक आढळून येते.

ह्या दृष्टीचे पुढील तक्ता अभ्यसनीय ठरेल. इतरांच्या तुलनेने कोलामांत महारोगाचे प्रमाण किती आहे, हे त्यावरून ताडून पाहता येईल. यवतमाळ तालुक्यातील पुढील गावांच्या पाहणीत आढळलेले हे आकडे आहेत.

| गाव | एकूण लोकसंख्या | कोलामांची लोकसंख्या | एकूण महारोगी | कोलामेतर महारोगी | कोलाम महारोगी | इतरांतील महारोग्यांचे शे. प्रमाण | कोलामांतील महारोग्यांचे शे. प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| कळंब | ५,६६५ | १४० | ६७ | ६३ | ४ | १·१४ | २·८६ |
| चापर्डा | ३२५ | २७० | ३ | ० | ३ | ०·०० | १·१० |
| नरसापूर | ५०८ | ८५ | ४ | ३ | १ | ०·७० | १·१८ |
| रासा | १६२ | १०० | ३ | २ | १ | ३·२३ | १·०० |
| धनोडी | ५७ | ४५ | १ | ० | १ | ०·०० | २·२२ |
| सरपधरी | १५६ | ८८ | १ | १ | ० | १·४७ | ०·०० |
| नांदुरा खुर्द | ४३८ | ७ | १ | ० | १ | ०·०० | १४·२९ |
| पिंपरी | ५८० | ४२१ | ६ | ० | ६ | ०·०० | १·४२ |
| नांझा | १,३०२ | ६८५ | ४ | २ | २ | ०·३२ | ०·२९ |
| बेलोना | १२३ | ५९ | ३ | ३ | ० | ४·६९ | ०·०० |
| घोटी | २४७ | १३० | ३ | २ | १ | १·७१ | ०·७७ |
| दत्तापूर | १९९ | १६० | ४ | २ | २ | ५·१३ | १·२५ |
| राजर | २८६ | ६० | ६ | ५ | १ | २·२१ | १·६७ |
| पोडगव्हाण | ६५१ | १६० | २ | ० | २ | ०·०० | १·२५ |
| पिंपळगाव होरे | ७६१ | ६० | ९ | १ | ८ | ०·१४ | १३·३३ |
| आष्टी | ८७८ | १४० | १० | ६ | ४ | ०·८१ | २·८६ |
| एकूण | १२,३१८ | २,६१० | १२७ | ९० | ३७ | ०·९३ | १·४२ |

वरील आकड्यांवरून हे निश्चित दिसते की, महारोग कोलामांमध्ये अधिक आहे आणि इतरांमध्ये कमी आहे.

**देवी आणि गोंदणे**

अंगावर गोंदवून घेतल्यास देवी निघत नाहीत, असा समज या लोकांत आहे. अशा तऱ्हेच्या श्रद्धांमुळे योग्य उपायांकडे त्यांचे दुर्लक्ष होते, हे ओघानेच आले.

३ : :

# मृत्यू आणि प्रेतसंस्कार

मृत्यूचा समय अगदी जवळ आला की, मरणोन्मुख व्यक्तीला खाटेवरून काढून खाली टाकतात. एखादे फडके, धोतर किंवा गोणपाट यासारखी वस्तू अंथरुणाला असते. मरणाऱ्या व्यक्तीच्या दुःखाने मरणकाळ आल्यापासूनच नातेवाईक आणि शेजारी मोठमोठ्याने गळा काढून रडू लागतात.

खाली टाकलेली व्यक्ती मरण पावताच सर्व नातेवाईकांना बोलावतात. जवळपासच्या गावांमध्ये नातेवाईक असल्यास त्यांनाही निरोप धाडून बोलावून घेतात. ज्या वस्तीतील व्यक्ती मरते, त्या वस्तीतील सगळे कोलाम मयताच्या घरापुढे जमा होतात. त्या दिवशी वस्तीतील लोक कोणतेच काम करीत नाहीत. वस्तीतील सगळी कामे त्या दिवसासाठी बंद असतात. मयताचे दुःख साऱ्या वस्तीला होते. त्या दिवशी शिळे पदार्थ कोणी खात नाहीत. मयताची सारी निरवानिरव झाल्याशिवाय कोणीच जेवत नाही. स्मशानातून पुरुष परत आल्याशिवाय बायका झाडझूड करीत नाहीत, पाणी आणीत नाहीत आणि स्वयंपाक करीत नाहीत. तोपर्यंत त्या बसूनच राहतात.

मृत्यूनंतर लगेच मयताच्या अंगणात जमा झालेल्या लोकांना गूळपाणी पाजण्याची प्रथा या लोकांमध्ये आहे. मयताची पुढील व्यवस्था लावण्याच्या कामी म्हातारी माणसे आणि म्हाताऱ्या स्त्रिया अनुभवी म्हणून पुढाकार घेतात. तरुणतरुणी व मुलेमुली यांना प्रेताची भीती वाटते, म्हणून व्यवस्थेत त्यांना फारसे सहभागी करून घेतले जात नाही.

सोने बहुतेक कोलामांजवळ नसते. क्वचित एखाद्याजवळ सोन्याचा मणी असल्यास मृताच्या तोंडात टाकतात. परंतु प्रतिकूलतेमुळे तेही बरेचदा शक्य होत नाही. फार

कशाला, तिरडी करण्याची रीत यांच्यात असली तरी बरेचदा तिरडीशिवाय, घरातील खाटेवर प्रेत टाकून ते स्मशानात नेण्याचा प्रसंग यांच्यावर येतो. यामागे दारिद्र्य हेच कारण आहे. तिरडीसाठी लागणारे बांबू वेळेवर विकत आणायचे कसे आणि कोठून? यवतमाळ जिल्ह्याच्या ज्या भागात कोलाम राहतात, त्या भागात बांबू होत नाहीत. बाजाराची गावे दूर असतात. बांबूपेक्षा जंगली लाकडांवर व्यवहार करण्याची कोलामांना सवय असते. त्यामुळे बांबूंच्या तिरडीपेक्षा घरच्या घरी तयार झालेली लाकडी खाट त्यांना बिनखर्चाची म्हणून सुलभ पडते. खाटही शक्य नसल्यास हातांवरच प्रेत नेण्याची कोलामांमध्ये वहिवाट आहे. गरीब कोलामांकडे कधीकधी जास्तीची खाटही नसते. एखाददुसरी असली व तीही प्रेतासह गेली तर दारिद्र्याला आणखी ठिगळे पडतात. तेव्हा, हातांवर नेऊन काम भागले तर काय वाईट?

प्रेतापुढे 'आगटे' (अग्नीचे मडके) धरण्याची प्रथा कोलामांत नाही. 'आगट्या'ऐवजी एका माणसाजवळ कुऱ्हाड व सब्बल असते. 'आगटे' नेण्यामागे अग्निसंस्कारपद्धती हे कारण असते. कोलामांत प्रेते पुरण्याची प्रथा आहे. अग्नी देण्याची प्रथाच नाही तर अग्नीच्या मडक्याची गरजच काय? या समाजात प्रेते पुरण्याची प्रथा असल्यामुळे जमीन खणून खड्डा करण्यासाठी सब्बल नेण्याची प्रथा आहे. प्रेत पुरून झाल्यावर त्या प्रेतावर काट्याकुट्या ठेवाव्या लागतात. त्या काट्याकुट्यांवर पाचपंधरा दगड वजनासाठी ठेवावे लागतात. दगडांच्या वजनाने काट्या उडत नाहीत आणि काट्या असल्यामुळे स्मशानऊद नामक प्राणी प्रेत उकरीत नाही. काट्या तोडण्यासाठी कुऱ्हाडीची गरज असल्यामुळे कुऱ्हाड प्रेतासह नेण्याची रीत आहे.

स्मशानात प्रेत नेतांना पुरुषांबरोबर वयस्कर महिलाही जातात. प्रेत घरातून बाहेर काढण्यापूर्वी प्रेताला आंघोळ घातलीच पाहिजे असे नाही. प्रेताला आंघोळ घालण्याची प्रथा अगदी अलीकडे काही कोलामांनी इतरांकडून उचललेली दिसते. प्रेताला खांदा काही विशिष्ट व्यक्तींनीच दिला पाहिजे असे बंधन नसून कोणीही खांदा देऊ शकतो.

प्रेत पुरून झाल्यावर प्रेतासोबत गेलेले लोक स्मशानाजवळच्या नदीत, नाल्यात किंवा विहिरीवर जातात, अंगावर पाणी ओतून अंगावरील कपडे ओले करतात आणि आंघोळी उरकरतात. तशाच ओल्या कपड्यांनी ते वस्तीत परत येतात. येतांना ते भोशाच्या झाडाची एक फांदी सोबत आणतात व ती मयताच्या अंगणात ठेवतात. मयतीहून आलेले लोक त्या अंगणात ओळीने उभे राहतात. त्यांच्या अंगावर मोहांचे पाणी शिंपडण्यात येते. तोवर त्यांनी कुणाला हात लावू नये असा नियम आहे.

पुरलेल्या प्रेतावर समाधी वा थडगे बांधण्याची रीत कोलामांत नाही. मात्र पुरलेल्या प्रेतावर माती, काट्या व दगड यांचा जो उंचवटा तयार होतो, त्याला कोलाम लोक 'वद्दा' (=ओटा; थडगे) असे संबोधतात.

सुतक एकच दिवस पाळतात. काही कुटुंबांमध्ये तीन वा पाच दिवस सुतक पाळले जाते. सुतक संपल्यावर मयताच्या घरी सगळीकडे गोमूत्र शिंपडण्यात येते. सुतकात त्या घरातील लोकांना कुणी शिवत नाहीत. सुतक संपेपर्यंत त्या घरी वस्तीतील सर्व कोलाम जातयेत राहून मृतासंबंधीच्या शोकाला आवर घालण्यास सुचवितात आणि दिलासा देतात.

मृत्यू झालेल्या घरी मृत्युदिनी ‘ देव करून ’ चारपाच माणसे जेवू घालतात. ‘ देव करणे ’ म्हणजे ‘ भगताच्या अंगात देव येणे ’ ! ‘ भगता’ला घरी बोलावले जाते. पत्रावळीत ज्वारीच्या शिजविलेल्या कण्या वाढून त्या ‘ भगता’पुढे ठेवल्या जातात. ‘ भगता’च्या ‘ अंगात देव येतो ’ व तो डोलू लागतो. लोक विचारतात, “ देवा, ही व्यक्ती कशाने मेली ? ” भगत सांगतो, “ अमक्या देवाने करणी केली ” किंवा “ अमक्या बाईने जादूटोणा केला, करणीठोका केला. ” ‘ भगता’च्या सांगण्यात रोगराईपेक्षा मृत्यूची कारणे करणीठोका, देव लागणे अशाच स्वरूपाची असतात. याशिवाय मरण येऊच शकत नाही, ही श्रद्धा या लोकांत फार आहे.

मरणाची कारणे सांगून झाली की ‘ भगत ’ म्हणजे त्याच्या ‘ अंगात आलेला देव ’ पत्रावळीला हात लावतो व तीमधील कण्यांपैकी काही भाग उचलतो. हे पाहून आयाबाया आणि माणसे उद्‌गारतात, “ मेलेला अमुक माणूस जेवला ! ” ‘ भगता’ने पत्रावळीला हात लावल्याशिवाय या लोकांचे समाधान होत नाही. कारण त्या कण्या त्यांनी मृतासाठीच वाढलेल्या असतात ! ‘ भगत ’ पुन्हा मध्येच म्हणत असतो, “ पाणी द्या. भाकर द्या.” लोक ‘ भगता’स पाणी आणि भाकरी देतात. ‘ भगत ’ जे जे मागेल ते ते दिले जाते. ते सर्व पदार्थ मृतानेच मागितले असे समजण्यात येते. मृताला त्या वस्तू दिल्या म्हणजे मृताचे समाधान होते, असा विश्वास कोलामांच्या मनात वास करीत असतो. म्हणूनच ‘ भगता’ने मागितलेले पदार्थ ते लोक कण्या वाढलेल्या पत्रावळीत टाकीत जातात.

दसवा, तेरवी अशा प्रकारचे कोणतेच संस्कार कोलामांत नाहीत. सुतकाचा दिवस संपल्यावर वस्तीतील सर्व कोलामांना मयताच्या घरी बोलावण्यात येते. आलेल्यांना गुळाचे पाणी तीर्थ म्हणून देण्याची रीत आहे. आता हा कार्यक्रम चहापाणी देऊन केला जातो. हा कार्यक्रम म्हणजे सुतक संपून घर शुद्ध झाल्याची एक प्रकारे जाहिरातच असते !

### श्राध्द

कोलामांमध्ये मृतासंबंधीचे करावयाचे श्राद्ध फक्त पौष महिन्यातच होते. ‘ पेद्दा दियाम ’ या देवतेची पूजाही कोलाम लोक पूस ( पौष ) महिन्यातच करतात. श्राद्धाचा महिना म्हणून पौष मासात लग्नकार्ये किंवा लग्नासंबंधीची बोलणी करीत नाहीत. त्या

वर्षात केव्हाही मेलेल्या व्यक्तीचे श्राद्ध पौषातच केले जाते. मृताच्या बाबतीत फक्त पहिल्याच वर्षी श्राद्ध करण्यात येते. एका मृत व्यक्तीसाठी वार्षिक श्राद्ध पुनःपुन्हा करण्याची रीत नाही.

वस्तीमध्ये त्या वर्षात मरणाऱ्यांचे श्राद्ध कोलाम लोक सामुदायिकपणे एकाच वेळीं व एकाच समारंभात करतात. परंपरा व रूढी यांमुळे का होईना, अर्थ, श्रम आणि समय यांची बचत या पद्धतीने होत असल्यामुळे कोलामांमधील ही बाब वैशिष्ट्यपूर्ण मानली पाहिजे. या श्राद्धासाठी पौषातील कोणताही सोमवार आधी विचारविनिमय करून ठरविण्यात येतो. सोमवार हा मृतांचा दिवस मानण्याची रूढी कोलामांत आहे, म्हणून त्यांचे श्राद्धही सोमवारीच असते.

श्राद्धाच्या कार्यक्रमासाठी सर्व कोलाम वस्तीबाहेर जातात. ते गावाबाहेर गेले की मग श्राद्ध संपेपर्यंत गावात परत येत नाहीत. श्राद्धाची जागा रानात, गावशिवेपासून दूर व अलग असते. तेथे एखाद्या झाडाखाली एक ' जगरे ' (=गोवऱ्यांचा विस्तव) पेटविले जाते. त्या ' जगऱ्या'वर पळसाच्या पानांमध्ये लपेटलेले ' पानगे ' (=' बाटी'-सारखा पदार्थ; रोडगे) शिजविले जातात. पाणी जवळ असेल अशीच जागा यासाठी निवडली जाते. ' पानग्यां'बरोबर खायला कोंबडा कापून त्याची भाजी करण्यात येते. इतरही भाज्या असू शकतात; परंतु त्यांचे प्रमाण एकंदरीने कमीच !

श्राद्धाचा स्वयंपाक करायला वस्तीतील सर्व कोलाम-स्त्रिया असतात आणि सगळेच कोलाम जेवण करायला न चुकता येतात. जेवणाच्या कार्यक्रमापूर्वी सर्व कोलाम अंग न भिजवता डोके भिजवतात. मृताच्या आत्म्यास शांती मिळावी म्हणून हे विधी केले जातात. एकदोन जण स्मशानात जाऊन तेथील माती आणतात. म्हणूनच कोलामी भाषेत श्राद्धासाठी ' तुक पुस ' ( तुक = माती; पुस = आणणे ) असे नाव रूढ आहे. मृत व्यक्तीच्या पुत्रांना क्षौर करावे लागते. दाढीमिशी काढण्यासाठी न्हावी नसतो. काही म्हातारे कोलाम हे काम वेळप्रसंगी करतात. दाढीचे, मिशांचे व डोक्याचे केस काढून झाल्यावर त्या केसांची एक पुरचुंडी बांधतात आणि नदीच्या पाण्यात बुडी घेऊन ती पुडी जलप्रवाहात सोडतात. त्यानंतर जेवणाचा सामुदायिक कार्यक्रम होतो. जेवणे आटोपल्यानंतर उरलेले अन्न एका मडक्यात ठेवतात. हे मडके या श्राद्धासाठी मुद्दाम नव्याने खरेदी करून ठेवलेले असते. श्राद्धाचा सर्व स्वयंपाक मातीच्या ज्या मडक्यांमध्ये तयार केलेला असतो, ती सर्व मडकी, तसेच पाळी आणि सानक्या ( = मातीच्या पसरट थाळ्या ) यांसकट मातीची सगळी भांडी त्या नव्या मडक्या-सोबत तेथेच रानात एखाद्या झाडाखाली ठेवून देतात. तेथील अन्न आणि भांडी वस्तीत परत आणली जात नाहीत. कारण ते सर्व पदार्थ मृताच्या संबंधातील म्हणून शुभ समजले जात नाहीत.

तेथील आवरसावर करून सर्व कोलाम दुपारनंतर वस्तीत परत येतात.

**‘ देवकारण ’**

जी व्यक्ती मरते तिची लहानशी धातुप्रतिमा करावी व ती देव्हाऱ्यातील देवांमध्ये ठेवावी, ही प्रथा ग्रामजीवनात आहे. कोलामांतही ही प्रथा आहे. श्राद्धानंतर लवकरच एखाद्या सोमवारी मयताच्या घरी त्याच्या नावे ‘ देव घडविण्या’चा कार्यक्रम होतो. या कार्यक्रमाला ‘ देवकारण ’ असे नाव रूढ आहे. हे ‘ देवकारण ’ शिवरात्रीला किंवा त्या दरम्यान व्हावे, असा संकेत आहे. ‘ देवकारणा’चा दिवस मात्र सोमवारच यावा, असाही संकेत आहे. शिवरात्रीला सोनाराकडून खुऱ्याचे ( = हलक्या दर्जाच्या चांदीचे ) देव घडवून आणावे व त्यानंतरच्या सोमवारी विधिपूर्वक पुजून घरात ठेवावे, अशी साधारणतः रीत आहे.

ज्या दिवशी या नव्या देवाची स्थापना घरात करावयाची असते, त्या दिवशी घरापुढे नैवेद्य ठेवण्यात येतो. मेलेली व्यक्ती घराबाहेर गेलेली असते आणि ती बाहेरून येऊन तो नैवेद्य सेवन करते, असा विश्वास या लोकांमध्ये आहे.

मयताच्या नावे देव करून आणून ते घरात ठेवण्याचा एक विशिष्ट कार्यक्रम असतो. मयताच्या घरचे लोक नदीवर किंवा ओढ्यावर जातात. त्यांच्या सोबत मातीचे एक नवीन गाडगे आणि पांढऱ्या रंगाचा एक कोरा दुपट्टा असतो. तो दुपट्टा दोन बाजूंनी ताणून धरून ते लोक नदीच्या पात्राकडे जातात. तो दुपट्टा नदीत सोडण्यात येतो. त्यात मासोळ्या पकडल्या जातात. दुपट्टा हातात धरून कोलाम लोक हाका मारतात, “ मेलेल्या अमुक माणसा ! लवकर ये !! ”

त्यानंतर त्या दुपट्टयात जी मासोळी येईल ती म्हणजे तो मृत माणूस ! अशा तऱ्हेने मेलेल्या सर्व व्यक्तींच्या नावांनी तितक्या मासोळ्या पकडण्यात येतात आणि त्या मासोळ्या त्या मातीच्या गाडग्यात जमा करून ठेवतात. ते गाडगे मातीच्या एका तात्पुरत्या ओटयावर ठेवून हळद, कुंकू, गुलाल इत्यादि वस्तूंनी त्याची पूजा करण्यात येते. डफ आणि पावे वाजवून नृत्ये व गीते यांचा कार्यक्रम याही वेळी हे लोक करतात. नंतर मासोळ्यांनी भरलेले ते गाडगे चाराच्या झाडाखाली तसेच ठेवून देऊन कोलाम लोक वस्तीत परत येतात.

मृत व्यक्तींच्या नावांनी घडविलेल्या पऱ्या ( प्रतिमा ) बहुधा सोयऱ्यांच्या खिशात असतात. इतरांना ते ठाऊक नसते. कोलामांच्या ‘ भगता’ला त्या कुठे आहेत, याचा पत्ता सांगावा लागतो. ‘ देव अंगात येणारा खरा भगत पऱ्या काढतो ’ असे कोलाम मानतात. ‘ भगता’च्या ‘ अंगात देव येण्या’पूर्वी अंगणातील बोहलेवजा अशा एका ओटयावर हळदकुंकू फेकून अंडे ठेवतात. सहासात फुटांवर निशाण म्हणून कमच्यांच्या खेळातील तीरकामठा ठेवलेल्या असतात. ‘ भगता’च्या अंगात देव येतो व तो अंडयाभोवती फिरू लागतो. तीरकामठा

घेऊन ' भगत ' लोकांजवळ जातो. ज्याच्या खिशात देवाच्या प्रतिमा ( पऱ्या ) असतील त्याच्या खिशातून त्या काढून घेण्याचे काम ' भगत ' तीरकामठ्याच्या साह्याने करतो. नेमक्या त्या माणसाला ' भगत ' धरूनच नेतो. मग लोक त्या माणसाला पकडतात व त्याच्याजवळून देवप्रतिमा घेतात. त्या माणसाचे व ' भगता'चे पाय धुऊन त्यांना घरात नेले जाते. घरात असलेल्या लहानशा देवपाटात पूर्वीच्या देवांमध्ये ह्या नव्या देवांची स्थापना या दोन व्यक्तींच्या हस्ते होते. त्या वर्षी या घरात जो कोणी मेला असेल त्याच्या नावाने ह्या नव्या देवप्रतिमा घडविलेल्या असतात हे आपणास माहीत आहेच.

## ' वर्जिकवार '

कोणत्याही शुभ कार्यासाठी वर्ज्य करावयाचा दिवस म्हणजे ' वर्जिकवार ! ' सोमवार हा कोलामांचा वर्जिकवार आहे. कोलाम लोक सोमवारी श्राद्ध करतात; मयताच्या नावे देवाची स्थापनाही त्याच दिवशी करतात आणि श्रावणातील सोमवार शंकर व मृत पिता यांच्या नावाने करण्याची रीतही इतरांपासून त्यांनी उचलली आहे. अर्थ हा की, सोमवारचा संबंध कोलामांनी मृत्यूशी लावलेला आहे. मृत्यू हा अशुभ मानण्याची सर्वांचीच प्रवृत्ती आहे. म्हणूनच कोलामांनी सोमवार हा दिवस शुभ कार्यासाठी किंवा एखादे कार्य आरंभ करण्यासाठी वर्ज्य ठरविला आहे. नवे कार्य, पेरणीचा आरंभ यांसारखी कामे कोलाम सोमवारी करीत नाहीत. सोमवारी कोलामांची लग्ने होत नाहीत. घरबांधणी सोमवारी सुरू करीत नाहीत. कोणत्याही प्रकारचा खड्डा ( घर, मांडव यासाठी ) सोमवारी खणला जात नाही. सोमवारी कोणताही कोलाम हजामत करण्याकरविण्याच्या भानगडीत पडत नाही. आईबापांच्या नावाने त्यांच्या मृत्यूनंतर केस काढावे लागतात, असा संकेत सर्वत्र आहे. सोमवार हा मृतांचा असतो. तेव्हा त्याच दिवशी केस काढणे वा काढविणे म्हणजे आईबाप मरण पावले असे सिद्ध करणे होय, असा दृष्टिकोण सोमवारी हजामत टाळण्यामाग असतो.

भवानीचा वार मंगळवार असून त्या दिवशी खड्डा करू नये, असेही काही कोलाम मानतात. परंतु हा नियम सर्वत्र नाही. तसेच शनिवारी हजामत टाळावी असाही नियम काही कोलामांमध्ये आहे. परंतु हाही नियम सार्वत्रिक नाही.

卐 卐 卐

आतापर्यंत १ ते ९ या प्रकरणांमधून कोलाम जमातीच्या सामाजिक स्वरूपाचे जीवनचित्र उभे करण्यात आले आहे. सदहू प्रकरणात त्यांची सुधारणेच्या दिशेने वाटचाल कशा प्रकारे चालली आहे, ते पाहावयाचे आहे. स्वराज्यानंतर शासनाने आदिवासींकडे खास लक्ष पुरविण्यास सुरुवात केली, त्यामुळे खुद्द आदिवासी व इतर लोक यांनी आदिवासींच्या सुधारणेचे प्रश्न जाणून घेऊन त्यांत रस घेण्याचे प्रयत्न सुरू केले. बदलत्या समाजरचनेनुसार आदिवासीही बदलू लागले. किंबहुना, वेगाने बदलणाऱ्या अवतीभवतीच्या वातावरणामुळे आदिवासींनी बदलावयास काही प्रमाणात सुरुवात करणे अपरिहार्य होते. कोलामांतही या दिशेने काय घडले; त्याचा आढावा घ्यावयास हरकत नाही.

## शिक्षण

एकाकी जगण्याची आवड असलेला आणि दारिद्र्यामुळे कष्टत राहणारा कोलाम समाज शाळांकडे बहुधा ढुंकूनही पाहत नव्हता. आजही ही स्थिती फारशी बदललेली नाही. क्वचित एखाददुसरे अपवाद वगळले तर ५–१५ वर्षांपूर्वी कोलामांत शिक्षणप्रसार मुळीं नव्हताच, असे म्हटल्यास हरकत नाही. पूर्वीच्या काळीं तर यांच्यात शिक्षण नसणारच, हे उघड आहे. असे असतांना मेकेन्झी यांनी “ हे सर्व लोक प्राचीन काळीं लिहू-वाचू शकत असले तरी आता दारिद्र्याने ते शक्य होत नाही ” असे विधान कशाच्या आधारावर केले ते कळत नाही. म्हणूनच हे विधान पुरावा नाही म्हणून हातचे राखूनच मान्य करावे लागेल, असे रसेल–हिरालाल यांचे म्हणणे आहे.[१] कोलाम लोकांना लिपी व वाङ्मय नाही. ते निरक्षर आहेत. अशा स्थितीत प्राचीन काळीं ते साक्षर असतील असे कसे म्हणावे ? कोलामी भाषेत ‘ काराप ’ या शब्दाचा अर्थ ‘ शिकणे ’ असा आहे. ‘ कारापेकांद ’ म्हणजे ‘ शिकणारा ’ आणि ‘ कारापेकार ’ म्हणजे ‘ शिकविणारा ’ असेही शब्द कोलामीत आहेत. या शब्दांवरून कोलामांत अक्षर–शिक्षण होते असे म्हणता येणार नाही. कुस्ती शिकणे, काम शिकणे असे वाक्प्रयोग आपण करतो, तेव्हा अक्षरविद्येचे नाते ‘ शिकणे ’ या शब्दाशी कधी जोडत नाही.

---

१. Russell, Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, ( London, 1916 ), पृ. ५२५

स्वराज्यात लहान मुलांना शाळा शिकविण्याचे सरकारी धोरण प्रचारात येऊनही या जमातीत शिक्षणप्रसार फारसा झालेला नाही हे १९६१ च्या शिरगणतीतील माहिती-वरून दिसून येते. २·६२% एवढेच शिक्षणाचे प्रमाण या जातीत आहे. पुरुषांत हे प्रमाण ४·८९%असून स्त्रियांत फक्त ०·४५%आहे. कोलामांमधील २,००० स्त्रियांमध्ये फक्त ९ स्त्रिया शिकल्या, असे हे प्रमाण दर्शविते. यवतमाळ जिल्ह्यात २३·४८% लोक शिकलेले असून त्यांत पुरुष ३५·३४% आणि स्त्रिया ११·२७% आहेत. काथोडी या जातीत शिक्षणाचे प्रमाण २·३८%आहे. महाराष्ट्रात सर्वांत कमी शिक्षित अशी ही जमात असून कोलामांत हे प्रमाण थोडे जास्त आहे. काथोडी लोकांत स्त्रियांच्या शिक्षणाचे प्रमाण १.१५%असून कोलामांचे प्रमाण त्याहून कमी आहे. आंध जमात वगळली तर कोलामांतच स्त्रीशिक्षण फार कमी आहे. ( आंध ०.३९% ) संपूर्ण महाराष्ट्रात २९·८२% लोक शिकले असून पुरुषांचे आणि स्त्रियांचे प्रमाण अनुक्रमे ४२·०४% व १६·७६% आहे. आदिवासींच्या बाबतीत हेच प्रमाण ७·२% असून पुरुषांत ते १२·५५% आणि स्त्रियांत १·७५% आहे. ह्या तुलनेने कोलामांचे शिक्षण अगदीच मागे आहे.

कोलामांमधील निरक्षरतेची माहिती अशी :—

| जिल्हा | | एकूण लोकसंख्या | | | अशिक्षित | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पु. | स्त्रि. | ए. | पु. | स्त्रि. | ए. |
| | श. | ६८ | ४१ | १०९ | ६१ | ४१ | १०२ |
| नांदेड | खे. | ५०१ | ६४१ | १,१४२ | ४५७ | ६३९ | १,०९६ |
| | ए. | ५६९ | ६८२ | १,२५१ | ५१८ | ६८० | १,१९८ |
| | श. | — | — | — | — | — | — |
| उस्मानाबाद | खे. | ३ | ५ | ८ | ३ | ५ | ८ |
| | ए. | ३ | ५ | ८ | ३ | ५ | ८ |
| | श. | — | — | — | — | — | — |
| चांदा | खे. | ७७८ | ७३८ | १,५१६ | ७७६ | ७३८ | १,५१४ |
| | ए. | ७७८ | ७३८ | १,५१६ | ७७६ | ७३८ | १,५१४ |
| | श. | ६५ | ५९ | १२४ | ४० | ५९ | ९९ |
| यवतमाळ | खे. | २०,०२१ | २०,८६८ | ४०,८८९ | १९,०५० | २०,७७० | ३९,८२० |
| | ए. | २०,०८६ | २०,९२७ | ४१,०१३ | १९,०९० | २०,८२९ | ३९,९१९ |
| | श. | १३३ | १०० | २३३ | १०१ | १०० | २०१ |
| एकंदर | खे. | २१,३०३ | २२,२५२ | ४३,५५५ | २०,२८६ | २२,१५२ | ४२,४३८ |
| | ए. | २१,४३६ | २२,३५२ | ४३,७८८ | २०,३८७ | २२,२५२ | ४२,६३९ |

आता कोलामांचे शिक्षण बघू या :—

| जिल्हा | | निव्वळ साक्षर | | | प्राथमिक शिक्षण | | | मॅट्रीक किंवा त्यापुढे | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पु. | स्त्रि. | ए. | पु. | स्त्रि. | ए. | पु. | स्त्रि. | ए. |
| | श. | ५ | ० | ५ | ५ | ० | १ | १ | ० | १ |
| नांदेड | खे. | ३३ | २ | ३५ | १० | ० | १० | १ | ० | १ |
| | ए. | ३८ | २ | ४० | ११ | ० | ११ | २ | ० | २ |
| | श. | — | — | — | — | — | — | — | — | — |
| चांदा | खे. | २ | ० | २ | — | — | — | — | — | — |
| | ए. | २ | ० | २ | — | — | — | — | — | — |
| | श. | ६ | ० | ६ | १९ | ० | १९ | — | — | — |
| यवतमाळ | खे. | ७९९ | ९६ | ८९५ | ७१ | २ | १७३ | १ | — | १ |
| | ए. | ८०५ | ९६ | ९०१ | १९० | २ | १९२ | १ | — | १ |
| | श. | ११ | ० | ११ | २० | ० | २० | १ | ० | १ |
| एकंदर | खे. | ८३४ | ९८ | ९३२ | १८१ | २ | १८३ | २ | ० | २ |
| | ए. | ८४५ | ९८ | ९४३ | २०१ | २ | २०३ | ३ | ० | ३ |

शिकत असलेल्या कोलाम मुलांची माहिती :—

| जिल्हा | मुले | मुली | एकूण |
|---|---|---|---|
| नांदेड | ३३ | १० | ४३ |
| उस्मानाबाद | ० | ० | ० |
| यवतमाळ | ३९६ | ३३ | ४२९ |
| चांदा | १ | २ | ३ |
| एकंदर | ४३० | ४५ | ४७५ |

शिक्षित कोलामांमध्ये फक्त मराठी दुसरीतिसरीचे लोक आहेत. मुली तर पहिलीच्या पुढे क्वचितच जातात. नाव टाकण्यापुरताच त्यांचा शाळेशी संबंध येतो. क्वचित काही कोलाम पाचवीसहावी शिकलेले दिसतात. हे लोकदेखील चालू पिढीतील तरुण आहेत आणि त्यांनी नुकतेच शिक्षण संपविलेले आहे. जुन्या पिढीतील एखादीच व्यक्ती शिकलेली आढळते. अर्थार्जनासाठी मोठी मुले उपयोगी येतात. स्त्री घरी राहत नाही. ती अर्थार्जनाला बाहेर जाते. बाहेर न जाऊ शकणारी पण घरातील थोडी मोठी मुले लहान भावंडांना सांभाळतात. त्यामुळे शाळेत जाणारी मुले कमीच आढळतात. अलीकडे मात्र आपली मुले शाळेत धाडली पाहिजेत, असे बऱ्याच कोलामांना वाटू लागले आहे. मोठ्या गावांच्या परिसरातील कोलाम मुले काहीशी शिकतांना दिसतात. सपाट व शहरी

बळणाला जवळ पडणाऱ्या स्थळी, सडकांच्या गावी थोड्याफार मुलीही शाळेत जाऊ लागल्या आहेत. कोल्हापूर ( ता. वर्धा ) हे असेच थोडे पुढे गेलेले ( पूर्ण कोलामांचे ) गाव आहे. कोलामांच्या मुलांना शिकण्यासाठी यवतमाळच्या आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळाच्या शाळा पूरक ठरू लागल्या आहेत. अशा शाळांना सरकारी अनुदानही बऱ्या प्रमाणात मिळते. खुद्द कोलाम लोक आपल्या गावात शाळा असावी, अशी मागणी करू लागले आहेत. रासा, सरपधरी ( ता. यवतमाळ ) येथील कोलामांचे सरकार-दरबारी तसे अर्ज आहेत. फार काय, काही प्रौढ कोलाम आता प्रौढ-साक्षरतेच्या वर्गास जाऊन 'ग म भ न' शिकू लागले आहेत. घोटी ( ता. यवतमाळ ) येथे असा एक वर्ग चालतो.

मराठी सातवी उत्तीर्ण होऊन शिक्षक झालेल्या दोन व्यक्ती नांझा ( ता. यवतमाळ ) येथे असून येरंडगाव, डोळंबा ( ता. यवतमाळ ), मोहदा ( ता. केळापूर ) आणि चाणी ( ता. दारव्हा ) येथे एकेक शिक्षक आहे. त्यांपैकी एकजण प्राथमिक शाळेवर मुख्याध्यापक आहे. बोथ आणि घुबडी ( ता. केळापूर ) येथे एकेक कोलाम शिक्षक असून त्यांचे शिक्षण नववीपर्यंत झाले आहे. कोल्हापूर ( ता. वर्धा ) येथील एका सातवी उत्तीर्ण मुलीची शिक्षिकेच्या प्रशिक्षणासाठी निवड झाली होती. सारफळी ( ता. यवतमाळ ) येथील एक मुलगी ७ वी शिकली असून तिचे लग्न शिक्षकाशी झाले. कोल्हापूर ( ता. वर्धा ) येथील एक कोलाम युवक कारकुनीच्या पेशात गेल्याची माहिती नुकतीच मिळाली असून कळंब ( ता. यवतमाळ ) येथील विद्यालयातून शिवनीचा एक कोलाम मुलगा मॅट्रीक झाला आहे. यवतमाळ ता.तील पिंपरी येथे एकजण मॅट्रीक आहे. कोपरा ( ता. यवतमाळ ) येथे मॅट्रीक अनुत्तीर्ण असलेला एक विद्यार्थी आहे. येरंडगाव येथील एक कोलाम मुलगा वर्धा येथील कॉलेजात बी. कॉमला शिकत आहे. १९६१ च्या शिरगणतीनुसार पूर्ण महाराष्ट्रात फक्त ३ कोलाम मुले मॅट्रीक उत्तीर्ण आहेत.

सातवीच्या पलीकडे गेलेले वा जाऊ लागलेले हे अपवाद अलीकडचेच आहेत. अपवाद असले तरी भविष्याची आशा करता येण्यास त्यामुळे वाव आहे. यवतमाळच्या आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळाने आदिवासींसाठी शहरांत चालविलेल्या वसतिगृहांमुळे खेड्यापाड्यातील होतकरू आदिवासी विद्यार्थ्यांची सोय झालेली आहे. यवतमाळ, अमरावती अशा शहरांत असलेल्या सदरहू मंडळाच्या वसतिगृहांमध्ये गेल्या एकदोन वर्षांत एखादा तरी कोलाम विद्यार्थी हायस्कुलात शिकण्याच्या निमित्ताने आढळू लागला आहे. कळंब ( ता. यवतमाळ ) येथील हायस्कूलमध्ये एक कोलाम मुलगा आठवीत शिकत आहे. घाटंजी ( ता. केळापूर ) येथेही एक मुलगा आठवीत आहे. शिक्षणाचा प्रसार वाऱ्याच्या वेगाने होत असूनही ठळक कोलामवस्ती असलेल्या कित्येक गावांतील कोलामांची मुले शाळेत जात नाहीत. तेथे कोणीच कोलाम शिकलेले दिसत नाहीत.

## वेगळे व्यवसाय

कोलाम जमातीत पूर्वी नसलेले आणि आताही त्यांची आवड नसलेले काही व्यवसाय क्वचित करतांना काही तुरळक कोलाम दिसतात. महाराष्ट्र राज्यातील ४३,७८८ कोलामांपैकी बांधकामांत १०, वाहतूक व्यवसायात ५ व तांत्रिक कामांत १० एवढेच कोलाम आहेत. यवतमाळच्या जीनफॅक्टरीत यवतमाळजवळचे चारसहा लोक मधूनमधून कामाला जातात. यवतमाळला एकजण ड्रायव्हर आहे. सातवी झालेला एक कोलाम युवक पोलिसांत गेला. पण तो परत आला. भोयर ( ता. यवतमाळ ) आणि बोरीअरब ( ता. दारव्हा ) येथील एकेक कोलाम युकक सेनादलात गेला असून नांझ्याहून पुण्याला साबणाच्या कारखान्यात काम करण्यासाठी एक तरुण गेला. संगमसावंगी व मोदाटी येथे वनरक्षक म्हणून एकेक कोलाम तरुण असून टिपेश्वर ( ता. केळापूर ) येथे एक ग्रुपसेक्रेटरी आहे. विकासखंडादिकांच्या कार्यालयात क्वचित काही कोलाम मुले चपराशाची कामे करतात. मोझरी ( जि. अमरावती ) येथील आदिवासी–कृषि–प्रशिक्षण–विद्यालयातून एकदोन कोलाम विद्यार्थी शिकून गेले.

## वेगळी पदे

दरिद्री अशा या जमातीचा एखादद्दुसरा पाटीलही आढळतो. टिपेश्वर ( ता. केळापूर ) आणि कोल्हापूर ( ता. वर्धा ) येथील पाटील कोलाम आहेत. आदिवासी अधिक असलेल्या गावी सरकारने ग्रामपंचायतीवर कोलाम सदस्य नियुक्त केले आहेत. मडकोना, कोल्हापूर, मुरझडी इजारा, भिसनी, नारकुंड, मुरझडी तांभारी, मांगली, नांझा, नरसापूर, खैरी, शरद, पिंपरी इजारा, चिखलधरा, वर्ध, पिपरी, सखी बु., यावली इ. गावी एक किंवा एकाच्या वर ग्रामपंचायत-सदस्य कोलामांमधून आहेत. यावली, रासा, पोफळणी व येरंडगाव या गावी तर प्रत्येकी एकेका कोलाम स्त्रीला ग्रामपंचायतीची सदस्या होण्याचा मान मिळालेला आहे. यवतमाळ तालुक्यातील खैरीच्या बाजूला एक स्त्री उपसरपंच असून कोलामांपुढे ती कोलामी आणि मराठी भाषेत व्याख्यानसुद्धा देते! रासा ( तालुका यवतमाळ ) येथे एक कोलाम उपसरपंच असून शरद व खेकडवाई या गावी तर सरपंचसुद्धा कोलामच आहेत. विशेष मौज ही की, हे मान्यवर पदाधिष्ठित कोलाम बहुनेक अशिक्षित आहेत. यांपैकी एखादीच व्यक्ती फार तर दुसरातिसरा वर्ग शिकलेली असेल! नांझा ( ता. यवतमाळ ) या दाट कोलामवस्तीच्या गावातून एक व्यक्ती जिल्हापरिषद-सदस्य असून त्यांनी आधीचे शिक्षकाचे पद सोडून दिले आहे. त्यांचे शिक्षण सातवीपर्यंत झाले आहे. यवतमाळ जिल्हापरिषद-सदस्य आणखी एक कोलाम असल्याची माहिती मिळाली आहे. महाराष्ट्र सरकारच्या १९६३ च्या पंचायत समिती कायद्यान्वये यवमाळ जिल्हा परिषदेत आदिवासींसाठी ७ जागा राखीव



**कोलामांतील उपसरपंच**

आहेत. या जिल्ह्यात विधानसभेचा एक मतदारसंघ आदिवासींसाठी राखीव करण्यात आला आहे.

## रेडिओ व आगगाडी

पिंपरी ( ता. यवतमाळ ) येथे एका मॅट्रीक असलेल्या कोलाम व्यक्तीकडे रेडिओ असल्याचे कौतुक कोलाम जातीच्या लोकांना काही वर्षांपासून आहे. आयुष्यात आगगाडी न पाहिलेले कित्येक कोलाम आहेत. ती पाहण्याचा आणि तीत बसण्याचा योग येऊ लागलेले कोलाम स्वतःस धन्य समजतात !

## पहिलीच परिषद

कोलाम जमातीची एक परिषद यवतमाळ येथे १९५८ च्या दरम्यान झाली. या परिषदेला खूप कोलाम हजर होते. पुढाकार घेणारी मंडळी पिंपरी व भूतबन ( महंमद-पूर ) येथील होती. परंतु ह्या सुशिक्षित पद्धती पचविण्यास व समजण्यास अजून

असमर्थ असलेल्या कोलामांना ती परिषद आवडली नसावी असे वाटते. म्हणूनच की काय, त्यानंतर त्यांची परिषद वा संमेलन झाल्याचे ऐकिवात नाही.

## शहरातील कोलाम

शहरे न मानवणाऱ्या कोलामांपैकी तुरळक लोकांना आता शहरात राहवयाला संकोच वाटेनासा झाला असावा. निदान, त्यांच्यातील काही लोक यवतमाळसारख्या शहरात राहतात यावरून तरी तसे वाटते. आर्थिकतेच्या दृष्टीने व्यवसायानिमित्ताने शहरातील हे वास्तव्य होऊ लागले, हे स्पष्ट आहे.

यवतमाळ जिल्ह्यात १९५१ मध्ये शहरात राहणारे कोलाम किती होते ते पाहा—

| | तालुका | पुरुष | स्त्रिया | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | यवतमाळ | १२ | ३ | १५ |
| २ | केळापूर | १२ | ३ | १५ |
| ३ | वणी | ८ | २ | १० |
| ४ | दारव्हा | ८ | २ | १० |
| ५ | पुसद | ५ | १ | ६ |
| | एकूण | ४५ | ११ | ५६ |

इ. स. १९६१ च्या शिरगणतीत शहरात राहणाऱ्या कोलामांचे आकडे पुढीलप्रमाणे नोंदविले आहेत:—

| जिल्हा | पुरुष | स्त्रिया | एकूण |
|---|---|---|---|
| नांदेड | ६८ | ४१ | १०९ |
| यवतमाळ | ६५ | ५९ | १२४ |
| एकूण | १३३ | १०० | २३३ |

## सरकारी घरे

आदिवासींसाठी सरकार काही घरे बांधून देते. मेटीखेडा (ता. यवतमाळ) येथील घरे तितकीशी बरी वाटली नाहीत. पारवा (ता. केळापूर) येथील घरांमध्ये आदिवासी राहावयास तयार नाहीत. आदिवासींना आपले मूळ स्थान सहसा आपणहून सोडावेसे वाटत नाही आणि नवी व्यवस्था त्यांना आवडत नाही. त्यांची मानसिक पृष्ठभूमी अशा नव्या बाबींसाठी तयार नसते. काय कारणे असतील ती असोत; पण पारव्याची घरे आदिवासींनी अजून न वापरल्यामुळे त्यांची पडझड होत चालली आहे.

आदिवासींसाठी सरकारने बांधलेली भालेवाडी (ता. वणी) येथील घरे आम्ही पाहिली. ती घरे उत्तम आहेत. ती संपूर्ण वस्ती चौकोनी जागेत वसविली आहे.

कोलामांच्या वाट्याला १५ घरे आलेली आहेत. एका कोलामाचे घर सरकारी नाही. जवळच ९ घरांची एक कोलामवस्ती आहे. तेथील कोलामांची घरे मात्र जुनीच असून ती बुराची आहेत. नवी घरे मिळाल्याबद्दल भालेवाडीच्या कोलामांना अतिशय आनंद होतो. शासनाला त्याबाबत ते धन्यवाद देतात; परंतु शिक्षित व्यक्तींच्या स्वागताला ते उत्सुक नसतात. 'वर्गणी मागायला साहेब आले' असे ते आपल्या भाषेतून आपापसात बोलतात.

## शेती व घरे

कोलामांनी 'पोडु' शेती जवळजवळ पूर्णपणे सोडली आहे. शेती व वस्ती हलविणे या जमातीत आता घडत नाही. शेतीमध्ये राबणे, स्वतःची जमीन असणे, नव्या रीती उचलणे, सरकारी योजनांचा फायदा घेणे यांसारख्या बाबींत कोलाम शेतकरी रस घेत आहेत. नांझा (ता. यवतमाळ) येथे कित्येक कोलामांना सरकारने लोखंडी नांगर व इतर मदत दिल्यामुळे त्यांचा शेतीचा उत्साह वाढला आहे. सरकार, भूदान आणि सहकार यायोगे लाभलेली जमीन कोलाम शेतकरी वाहू लागले आहेत. नव्या नियमांमुळे जंगली उत्पन्नावर जगणे काहीसे कठीण झाले आहे. म्हणून काही कोलाम शेतीकडे व शेतमजुरीकडे वळले आहेत. शिरपूरकडील कोलामांनी टोपल्या विकणे व मध गोळा करणे बंद केले आहे. आधी पाचपर्यंत अंक मोजणारे कोलाम आता व्यवहारी व नागरी होऊ लागले असून अंक आणि मापन यांचे शेजारातील प्रकार त्यांना कळू लागले आहेत. मालकाने शिवी दिली म्हणून हे लोक शेती सोडून जायला आज तयार नाहीत.

कोलामांची घरे ठरीव साच्यात व झोपडीवजा असली, त्यांच्यावर गवती बूरच नेहमी दिसत असला आणि त्यांना कुडाच्याच भिंती असल्या तरी यवतमाळजवळच्या भारी, मडकोना अशा गावी क्वचित मातीच्या भिंती व घरावर कौले आढळू लागली आहेत. कळंब येथील कोलामवस्तीत एकाही घरावर कौले नाहीत हे खरे, परंतु कोलामांच्या चावडीवर टाकण्यासाठी कळंब विकासखंडाने कौले देण्याचे शुभ कार्य केले आहे.

घरात नीट उजेड नसणाऱ्या या लोकांच्या काही वस्तींत सरकारी कंदील आले. (कळंबला असा एक कंदील आहे. पण तो लावण्याची काळजी ग्रामपंचायत घेत नाही.) कळंबसारख्या गावात वीज आल्यामुळे ह्यांच्याही वस्तीत उजेडाची सोय व्हावयास हवी. कोलामांच्या घरात वीज वापरू लागल्याचे उदाहरण नाही. क्वचित एखादा कोलाम कंदिलाचा वापर करू लागला आहे. घरात साध्या लोखंडी पेट्या तुरळकपणे क्वचित दिसू लागल्या आहेत.

## इतर काही बाबतींत वेगळेपणा

पुरुषांनी शेजारातील लोकांप्रमाणे वेषभूषा व केशभूषा करण्यास अंशतः सुरुवात केली आहे. काही स्त्रियांनी चोळयांऐवजी झंपर वापरायला सुरुवात केलेली असून

सौंदर्य आणि सुटसुटीतपणामुळे स्त्रियांमध्ये त्याबद्दल अनुकूलताही निर्माण होत चालली आहे. नथ, अंगठी हे दागिने येऊ लागले आहेत. गायीचे दूध न काढणारा हा वर्ग चहाबाज होऊ लागला असून तेवढ्यासाठी गायीचे दूध काढावयास प्रवृत्त होऊ लागला आहे. आडनावांचे व नावांचे मराठीकरण आणि नवीनीकरण करण्याकडे नवीनांचा कल वाढू लागला आहे. बैल, गाय यांसारखी उपयुक्त जनावरे बळी देण्याचे जवळजवळ बंद झाले असून वाघ, सर्प, बैल, गाय या प्राण्यांचे मांस खाणे अगदीच कमी झाले आहे. दारूबंदीने दारू बंद केली असून लग्नांच्या व उत्सवांच्या दिवसांची संख्या थोडीफार घटली आहे. त्यामुळे खर्चही वाचू लागला आहे.

गोंड लोक कोलामांच्या हातचे जेवू लागले आहेत. गावांमध्ये पूर्वीपेक्षा हे लोक थोडे अधिक मिसळू लागले आहेत. स्त्रियांनी रजस्वला स्थितीत दहादहा दिवस अलग बसण्याचा पायंडा मोडत चालला असून ते दिवस काहीसे कमी होत आहेत.ह्या अवधीत स्त्रीने वस्तीबाहेर राहण्याचे बंधनही आता कोणी पाळीत नाहीत. विटाळ संपल्यावर गावाबाहेर आंघोळी आटोपणाऱ्या स्त्रिया कमी होत असून घरीच हे व्यवहार आटोपण्यात येऊ लागले आहेत.या जमातीच्या लोकांना रोज आंघोळी करण्याचा व शारीरिक स्वच्छता पाळण्याचा सराव होऊ लागला आहे. लग्नात ‘ गोत्र ’ ( देवे प्रकरण ) पाहण्याची प्रथा काहीशी शिथिल होऊ पाहत असून फक्त ‘ दुधात फरक पडावा, एरवी कोणत्याही कुळाची मुलगी चालते, म्हणजे स्वकुल वगळावे ’ असे म्हणणारे काही कोलाम तरुण तसे वागू लागल्याची उदाहरणे अपवादादाखल का होईना, घडू लागली आहेत. विवाहातील ‘ हल्ले करण्याची पूर्वरीत ’ आता उरली नसून त्या गोष्टीची किंवा लग्नानंतर वरवधूंनी पहिला बाजार करण्याची फक्त नक्कलच आता केली जाते ! बालविवाह आणि बहुपत्नीत्व आता या जमातीत दिसत नाही. वाहनांची व देववेवीची साधने वाढू लागल्यामुळे दूरच्या सोयरिकी थोड्याफार होऊ लागल्या आहेत. घरजावई ठेवणे व राहणे ह्या बाबी हास्यास्पद ठरल्या जाव्यात, असेच आता या समाजात दिसत आहे.

सणावारांवर असीम प्रेम असणाऱ्या या लोकांचे काही सण कोठेकोठे एकत्र होतात; तर दोनदोन सणांना लागणाऱ्या वस्तू काही प्रमाणात एकाच वेळी खरेदी केल्या जातात. श्रम व पैसा वाचविण्याचे ते उपाय असतात. घोडदरा ( ता. केळापूर ) येथील कोलामांनी ‘ गावबांधणी’सारखा सर्वश्रेष्ठ उत्सव करण्याचे सोडून दिले ! ‘ गावबांधणी’त आणि कोलामवस्तीत चपलाजोडे किंवा चामड्याचे पदार्थ नेण्याचे दंडक बरेच शिथिल झाले असून खुद्द कोलाम अनवाणी राहण्याचे टाळू पाहत आहेत ! हुतूतू , खो-खो हे खेळ कोलामांत शिरले असून चित्रे, बोलपट, छायाचित्रे ह्याही बाबी त्यांना आवडू लागल्या आहेत. लहान मुलांना अफू देणे बंद झाले असून कोलाम स्त्रियांचे नृत्यांत नाचणेही कमी झाले आहे. रांगोळ्या, उपासतापास व व्रते ह्या गोष्टी इतरांकडून अंशतः कोलाम उचलीत आहेत. अक्षय्यतृतीयेसारख्या सणाला भजी करणे,

डाळीची पुरणपोळी खाणे ह्या गोष्टी पूर्वी कोलामांत नव्हत्या. आता काही कोलाम ऐपतीनुसार त्या करू लागले आहेत. श्राद्धाचे अन्न गावाबाहेर फेकून देण्याची पूर्वरीत आता बदलत चालली आहे. ' अन्नावर राग काढू नये ' असे त्यांच्यांतील लोक याही संदर्भात बोलू लागले आहेत. कोलामांच्या ' दंडारी'त डफ व पावा यांव्यतिरिक्त ढोलकी, टाळ, मंजिरा, पितळी बासरी अशी वाद्ये आता दिसू लागली आहेत. प्रेतांना आंघोळी घालण्याचे पूर्वी बंधन नव्हते. आता ही प्रक्रिया काही कोलाम आठवणीने पार पाडतात. प्रेताला पुरण्याऐवजी अग्नी देण्याचीही पद्धती अलीकडे काही कुटुंबांनी उचलली आहे.

मुसलमानांकडे स्वजातीच्या स्त्रिया जाऊ नये यासाठी विचारपूर्वक काहीतरी करण्याकडे कोलाम लोक गंभीरतेने वळत आहेत. स्वतःच्या न्यायपंचायतीबरोबरच सरकारी कायदे पाळण्याकडे व ते जाणण्याकडे यांचे लक्ष जाऊ लागले आहे. पूर्वी पाळीत नव्हते असे नाही. पण त्यासंबंधी बेफिकीर असत व दुर्लक्षित विचार करीत. ' भगत ' हा कोलामांचा ' डॉक्टर ' असला तरी दवाखाने वापरावेत असा या लोकांच्या मनाचा कौल वाढत चालला आहे. केळापूर तालुक्यातील उमरी येथील ख्रिस्ती दवाखाना यांच्यापैकी कित्येकांनी औषधोपचारांसाठी जवळ केल्याची उदाहरणे आहेत. लस टोचून घ्यायला काही कोलाम आता तयार होत असतात.

कोलामी भाषेत दिवसेंदिवस मराठी व अदिलाबादेकडे तेलगू शब्दांची भर पडत जाऊन सरमिसळीचे स्वरूप त्या भाषेला येत आहे. जुने लोक जाताच कोलामांचा जुना शब्दसंग्रह खुंटत जातो. नव्या लोकांना त्यांची भाषाही धड येत नाही. ' आपली भाषा कोणालाच माहीत नाही ' हा या जातीतील जुन्या लोकांचा समज अभ्यासू लोक खोटा ठरवू पाहत आहेत ! कानांना गोड लागतात म्हणून मराठी गीते गाण्याची सवय लावून घेतलेल्या लोकांनी स्वभाषेतील गीतरचनेला मागे टाकण्याला अप्रत्यक्षपणे साह्य केले आहे !

कोलामांच्या जीवनाला अशा काही ' वेगळ्या वाटा ' फुटलेल्या दिसतात खऱ्या; पण त्यांतील बहुतेक आंशिक आणि अपवादभूत आहेत. कोलाम समाज आपल्या पूर्वसंस्कृतीपासून वा रूढ जीवनचाकोरीपासून फारसा ढळलेला नाही. तो अजून कितीतरी मागे आहे ! यवतमाळ जिल्ह्यातील सर्वांत जास्त मागे असलेली ही जमात आहे आणि म्हणूनच तिला सुधारण्यास (आणि सुधरविणारांस) फार वाव आहे ! स्वातंत्र्याचा उपयोग करण्याचा हा काळ आहे, याची जाणीव या समाजाला झाली तर हा समाज वेगाने पुढे सरकेल व इतरांच्या बरोबरीने शीघ्र गतीने येईल ! कारण सहकार, संघटन आणि अल्पसंख्यत्व हे महत्त्वाचे घटक यांच्याजवळ असून ते त्यांना पूरक ठरू शकतात !

卐 卐 卐

१ : :

## कोलामी भाषेचा शोध

ग्रियर्सनची या भाषेसंबंधीची माहिती अगदीच अल्प आहे. हेग आणि बुलस्ली यांनी १८९७ साली गोंडी व कोलामी भाषेतील काही शब्दांची तुलना केली होती.[१] १९५० मध्ये सेतुमाधवराव यांचे कोलामी भाषेचे व्याकरण[२] प्रकाशित झाले. हे व्याकरण लहान असले तरी चांगले आहे. मात्र या पुस्तकातील माहितीचा भर आदिलाबाद जिल्ह्यातील कोलामांची भाषा आणि उच्चार यांवर आहे, असे दिसून येते. तसेच या पुस्तकातील कोलामी शब्दांची तपासणी पुनः झाली नसावी. त्यामुळे काही दोष राहून गेले आहेत. असे असले तरी कोलामांच्या या उपेक्षित भाषेला प्रथम व्याकरण देणारे सेतुमाधवराव हेच पहिले विद्वान म्हटले पाहिजेत !

इ. स. १९५०–५१ मध्ये ऑक्स्फर्ड विद्यापीठाचे संस्कृतचे प्राध्यापक टी. ब्यूरो आणि सुधीभूषण भट्टाचार्य या दोघांनी किनवट भागातील कोलामीचे काही शब्द जमविले. त्या भागाला लागून असलेल्या पांढरकवडा तालुक्यातील 'कोलामी'चेही शब्द त्यांनी मिळविले. हे काम त्यांनी फक्त दोन दिवस केले.

---

१. Haig, Wolseley : " A Comparative Vocabulary of the Gondi and Kolami Languages "– Journal of the Asiatic Society of Bengal ( 1897 ); १.१८५–१९१

२. P. Setu Madhao Rao : A Ggrammar of the Kolami Language ( Hyderabad, 1950 )

त्यानंतर १९५५ साली कोलामी भाषेवरील डॉ. एमेन्यू यांचा प्रबंध प्रकाशित झाला.[1] त्यांनी १९३७ मध्ये वर्धा भागातील कोलामी भाषेची माहिती सहा आठवड्यांत गोळा केली. तीवर १९३८ ते १९४९ या कालात त्यांनी लिखाण केले आणि प्रबंध तयार केला. त्यांनी आपल्या प्रबंधात, पूर्वी या क्षेत्रात काम करणाऱ्या टी. ब्यूरो, भट्टाचार्य, हेग, हिस्लॉप व सेतुमाधवराव यांच्या माहितीचा पूर्णपणे उपयोग करून घेतला.

कोलामी भाषेवरील पुस्तके सेतुमाधवराव आणि डॉ. एमेन्यू या दोघांचीच असून ती इंग्रजी भाषेत आहेत. मराठी वा एतद्देशीय भाषेत या भाषेचे शब्द व माहिती संकलित स्वरूपात मांडण्याचा प्रयत्न आजवर कुणी केला नाही.

### भाषेचे नाव : कोलामी

कोलामांच्या भाषेला 'कोलामी' असे म्हणतात. कोलाम माणूस आपसात स्वतःला 'कोलावान' (ए. व.) असे म्हणवितो; तसेच त्यांच्या भाषेला 'कोलाव पाना' (पाना=भाषा) असे नाव असल्याचे डॉ. एमेन्यू यांच्या शब्दसंग्रहातील सदरहू शब्दावरून वाटते. मात्र, त्यांनी स्वतःच्या प्रबंधाला 'कोलामी : ए द्राविडियन लँग्वेज' असे जे शीर्षक दिले आहे, त्यावरून कोलामांच्या भाषेचे 'कोलामी' हेच नाव मान्य दिसते. सेतुमाधवरावांच्या पुस्तकातही भाषेचे नाव 'कोलामी' असेच आहे. डॉ. केतकर यांनी हिरालाल-रसेलच्या आधाराने लिहिलेल्या 'ज्ञानकोशा'न्तर्गत माहितीतही "यांची भाषा कोलामीच आहे[2]" असे लिहिले आहे. डॉ. इरावती कर्वे यांच्या 'मराठी लोकांची संस्कृती' या ग्रंथात कोलामांच्या भाषेबद्दल लिहिण्यात आले आहे—"हे (कोलाम) एक द्राविडी भाषा बोलतात. तिला कोलामी असेच म्हणतात.[3]"

कोलामी भाषा द्राविडी असून ती अगदी स्वतंत्र आहे, हे डॉ. एमेन्यू यांच्या प्रबंधातील तपशिलावरून व व्युत्पत्त्यादिकांवरून स्पष्ट झाले आहे. तेलगूला जवळचे असलेले बरेच शब्द कोलामीत असले तरी ही भाषा उसनी नसल्याचे डॉ. एमेन्यू यांनी स्पष्ट केले आहे. अतिप्राचीन काळापासून कोलाम लोक हीच भाषा बोलत असून ती आज सामग्र्याने अभ्यासता येते.

### द्राविडी भाषांची जननी?

कोलामी भाषेत आजच्या तामिळ, तेलगू, मलयालम आणि कानडी ह्या द्राविडी भाषांची मूळ रूपे आहेत, असे म्हणण्याचे धाडस करायला जागा आहे. एकाकी व

---

१. M. B. Emeneau : Kolami – A Dravidian Language (London, 1955)

२. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

३. डॉ. इरावती कर्वे : मराठी लोकांची संस्कृती, पृ. ११०

एका भागात स्थिर राहणाऱ्या कोलाम लोकांच्या भाषेत वरील चारही भाषांच्या शब्दांना समान असलेले शब्द आढळतात. एखादा शब्द मल्यालम भाषेत आढळतो व तो इकडे दूर राहणाऱ्या कोलामांच्या भाषेत दिसतो. मात्र तो शब्द तामिळ, तेलगू व कानडी भाषेत दिसत नाही. यावरून द्राविडी व कोलामी भाषा यांमधील नाते शोधता येऊ शकेल. कोलामांनी इतक्या दुरून हे शब्द आणले असतील, असे म्हणणे वस्तुनिष्ठ ठरणार नाही. इतरांनी कोलामीतील शब्द नेले नसतील वा अतिपूर्वीची दंडकारण्याची किंवा त्या भागातील काही भूभागाची कोलामी ही विस्तृत भाषा नसेलच असेही म्हणता यावयाचे नाही. एवढे मात्र खरे की, कोलामीत आधुनिक द्राविडी भाषांची पूर्वरूपे आढळतात.

## कोलामीचे नातेसंबंध

ग्रियर्सनच्या मते गोंडी व कोलामीत साम्य आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे की या दोन भाषांमध्ये साम्ये तुरळक व तफावत फार आहे. जवळजवळ राहण्यामुळे साम्ये सापडणे शक्य आहे. आदिलाबाद भागातील बरेच कोलाम लोक गोंडी जाणतात व बोलतातही. पण गोंडांना कोलामी समजत नाही. इतर भागातील गोंडसुद्धा कोलामी समजू-बोलू शकत नाहीत. क्वचित काही गोंड कोलामी समजू-बोलू शकतात; पण तो अपवादच! आदिलाबादेकडील कोलाम लोक तेलगूमिश्रित कोलामी बोलतात. सिरपूर भागातील बव्हंश कोलाम आणि गोंड लोक तेलगू बोलतात.

कोलामी भाषेचा संबंध ग्रियर्सनने तोडा बोलीशी जोडला आहे. डॉ. केतकर यांच्या मतानुसार "तिचे स्थान तामिळ व तेलगू यांच्या मध्ये आहे. या भाषेचा व निलगिरीतल्या उपभाषेचा संबंध आहे."[१] हे विधान रसेल–हिरालाल यांच्या आधारावर केलेले असून मूळात 'कोलामीचे स्थान तामिळ, तेलगू व कानडी यांच्या-मध्ये आहे,' असे म्हटले आहे.[२]

कोलाम लोक आणि आदलाबाद-किनवट भागातील नाईकपोड लोक एकच असावेत, या मताचा मी आहे. बहुतेक नाईकपोड कोलामी बोलतात. थोडाफार फरक पडतो. पण धाटणी एकच. 'नाईक' 'पोड' हे शब्द कोलामांच्याच जातनियमांमधले आहेत. म्हणून कोलामांची व नाईकपोडांची भाषा एकच असल्यास नवल नाही! काही नाईकपोड तेलगू बोलतात.

भिली, पारजी व चांद्याकडची नायकी ह्या भाषा जवळजवळच्या आहेत. ज्या कोलामांची जात गणकांना नीट समजली नाही, त्यांची नोंद 'भील' म्हणून झाली

---

१. डॉ. श्री. व्यं. केतकर : ज्ञानकोश, विभाग ११, पृ. ७९४

२. Russell–Hira Lal : The Tribes and Castes of the Central Provinces of India, Vol. III, ( London, 1916 ), पृ. ५२१

आणि त्या लोकांची भाषा ‘ भिली ’ नोंदली गेली. वस्तुतः ती ‘ भिली ’ कोलामीच असते ! पारजी व कोलामी या दोहोंमध्ये फरक आहे. मात्र नायकी भाषा ही कोलामीच आहे, असे वाटते. नायकी व कोलामी या भाषांमध्ये आंगासी, बोगूर, एल्ला, ताम, साट्टा, तुर्रे, वान्ना, सार, वाल, सुक्का, सुम असे असंख्य शब्द समान आहेत. ‘ नाईक ’ म्हणजे ‘ कोलाम ’ हे मान्य झाल्यावर दोघांची भाषाही एकच ठरणार ! कोलामांना इतर समाजांत बरेचदा ‘ नाईक ’ म्हणून ओळखले जाते, हे आपणास माहीत आहेच !

१९६१ च्या शिरगणतीनुसार महाराष्ट्रात कोलामी मातृभाषा असलेले ८१ कोलाम दुय्यम भाषा हिंदी बोलतात. मराठी दुय्यम भाषा २०,८६२ कोलामांची असून तेलगू व उर्दू ह्या दुय्यम भाषा अनुक्रमे ७४ व २ कोलाम बोलतात. गोंडी ही दुय्यम भाषा ५४४ कोलामांची आहे. प्रधान जातीच्या २५ लोकांना कोलामी ही दुय्यम भाषा येते.

## अंक आणि लिंग

कोलामांचे जीवन मर्यादित; त्यामुळे त्यांची अंकगणनपद्धतीही परिमित अशी आढळते. फक्त १ ते ५ एवढेच आकडे कोलामी भाषेत आहेत. त्यानंतर ते मराठीचा वापर करतात. आदिलाबाद भागातील कोलाम पाचनंतरचे काही तेलगू आकडे स्वतःचे म्हणून वापरतात. परंतु संपूर्ण कोलाम जमातीला ते माहीत नाहीत. मात्र २० हा आकडा कोलामीत सगळ्या भागात आढळतो. वऱ्हाडच्या बऱ्याच खेड्यांतील कोलामेतर अज्ञ लोक वीसपर्यंतच आकडे जाणतात व तेवढे मोजून झाले की दोरीला एक गाठ पाडतात. दोन विसा, तीन विसा, चार विसा असे पुढे ते मोजत जातात. कोलामांच्या भाषेत पाचनंतर वीस हाच आकडा आढळतो, यातही हेच सूत्र संभवते !

कोलामी भाषेत नपुंसकलिंग नाही. इतरांच्या संपर्काने अन्य भाषा बोलतांना लिंगांच्या बाबतीत घोटाळे होतात, त्याचे कारण हेच आहे.

## कोलामीचे गट चार की दोन ?

डॉ. एमेन्यू यांनी कोलामी भाषेचे प्रादेशिक दृष्ट्या चार गट कल्पिले आहेत. ते मला स्वतःला मान्य नाहीत. आपल्या प्रबंधाच्या प्रस्ताव–भागात डॉ. एमेन्यू यांनी कोलामीचे पुढील चार गट पाडले—( १ ) यवतमाळ तालुका व वर्धा जिल्हा ( २ ) केळापूर आणि वणी हे दोन तालुके ( ३ ) हैद्राबाद राज्यातील आदिलाबाद, किनवट, सिरपूर इ. भाग ( ४ ) बैतूल जिल्हा.

वस्तुतः बैतूल भागात कोलाम नाहीतच. नजरचुकीने एमेन्यूंनी अमरावतीऐवजी बैतूलचा उल्लेख केला असावा. अमरावती जिल्ह्यातील कोलामांची संख्या अगदीच उपेक्षणीय आहे. यवतमाळ तालुक्याच्या उत्तर सरहद्दीस लागून असलेल्या वर्धा

भागातील कोलामांप्रमाणेच अमरावती जिल्ह्याच्या व यवतमाळ तालुक्याच्या सीमा-रेषेच्या आगेमागे काही कोलाम आहेत, एवढेच !

वर्धा जिल्हा, अमरावती जिल्हा, दारव्हा तालुका व यवतमाळ तालुका या भागातील कोलामी भाषा अगदी एका साच्याची आढळते. केळापूर–वणी–चांद्याच्या भाषेत व यवतमाळ तालुक्याच्या भाषेतसुद्धा फारसा फरक आढळत नाही. केळापूर–वणीकडचे कोलाम सुधारणेच्या संस्कृतीपासून अगदी दूर, म्हणून यांच्या भाषेत मूळ कोलामीचे अधिक शब्द आढळतात. यवतमाळ, दारव्हा, वर्धा या भागात मराठी शब्दांचा वापर कोलामी बोलतांना थोडा अधिक प्रमाणात होतो. केळापूर–वणी भागात आढळणारे क्वचित काही शब्द यवतमाळ–वर्धा भागात दिसत नाहीत, हे खरे असले तरी, यवतमाळ–वर्धा भागातील डोंगरी कोलाम–वस्तींमध्ये ते शब्द आढळतातच. उदा. 'लेता,' लेती,' 'पोके' हे शब्द केळापूर–वणीकडे आढळतात; तरीही यवतमाळ–वर्धा भागातील डोंगरी 'पोडां'वर या शब्दांचा वापर होतो, असे दिसून आले. एवढे मात्र खरे की, तेलगूभाषी भागास जवळ पडणाऱ्या कोलामांची भाषा तेलगू शब्द घेऊन सजवलेली दिसते. उच्चारणही निराळे पडते व त्यामुळे आदिलाबाद भागातील गट काहीसा स्वतंत्र मानता येईल.

चिन्नूर व सिरपूर तालुक्यात बरेचसे कोलाम 'कोलामी' विसरून तेलगू बोलू लागले आहेत. हीच स्थिती वर्धा, अमरावती व उत्तर यवतमाळ भागातील कोलामांची झाली असून कित्येक कोलामांना कोलामीऐवजी मराठीच अधिक समजते व बोलता येते. मात्र, चिन्नूरसिरपूरइतके स्वभाषा विसरण्याचे प्रमाण वर्धा–यवतमाळ भागातील कोलामांमध्ये आढळत नाही.

## कोलामीत गाणी नाहीत ?

कोलामी भाषेत गाणी नाहीत, हा डॉ. एमेन्यू, सेतुमाधवराव, रसेल, हिरालाल आणि डॉ. केतकर यांचा एक ढोबळ समज आहे. पण तो अगदीच चुकीचा आहे. कोलामांच्या भाषेला लिपी नाही व लिखित वाङ्मयही नाही. डोंगरांच्या अगदी आतल्या कोलामवस्तींमध्ये धड मराठीही कळत नाही. ते लोक कमी बोलतात व तोंडा-कडे नुसते पाहत राहतात. हे लोक दिलखुलासपणे माहितीच देत नाहीत, तर गीते काय सांगतील ? सांगायला लाजतात. त्यामुळे कोलामीत गाणीच नाहीत, असा समज झालेला आहे.

कोलामांनी मराठी–विशेषतः वऱ्हाडी–गीतरचना संपर्काने व अनुकरणाने अलीकडे उचलली असली तरी त्यांची मूळ गीते कोलामीच आहेत. संपर्कामुळे काही गीतांमध्ये मराठी शब्द आले आहेत. परंतु अशी गीते मूलतः कोलामीतून मराठीकडे वळत

आलेली असावी. अशी गीते सुमारे शेकडा २५ मराठी शब्दांनी युक्त आहेत. ही गीते अतिप्राचीन नसावीत, असे वाटते. मात्र त्यांची जुनी गीते शुद्ध कोलामीतच आहेत.

काही गीतांमध्ये वऱ्हाडी–मराठी व गोंडी या भाषांचे मिश्रण झाले आहे. काही वेळा कोलाम लोक मराठी गीते गातात. त्यांची संख्याही कमी नाही. काही गाणी समयानुसार अन्यान्य भाषांचे संमिश्र स्वरूप मुद्दाम तयार करून म्हणण्याची रीत कोलामांमध्ये पडली आहे. उदा. दिवाळीत कुणब्यांकडे 'दंडार' नाचवावयाचे गीत मराठी व कोलामीत राहील; तर गोंड स्त्रीपुरुषांचे संवाद असले तर गोंडीचे मिश्रण राहील.

कोलामांची जुनी, मध्यकाळातील, अलीकडची, मराठी व संमिश्र अशी अनेक गीते आहेत. ती जमविण्याचा माझा प्रयत्न आहे. त्यात मला बरेच यश आले आहे. सदर्हू माहिती संपताच ह्या प्रकरणाच्या विभाग २ मध्ये जी गाणी देण्यात आली आहेत, ती केवळ नमुन्यादाखल आहेत. सणोत्सवांमध्ये नृत्यादिकांचा धडाका लावणारे रसिक कोलाम गीतांशिवाय कसे राहू शकतील ?

## कोलामीची शब्दसंपदा

डॉ. एमेन्यू यांनी सुमारे पाऊणेअकराशे शब्द त्यांच्या प्रबंधात दिले आहेत. सेतुमाधवराव यांना कोलामीची शब्दसंख्या आठशेच्या जवळपास सापडली. कोलामांमधील एक दंतकथा देऊन सेतुमाधवरावांनी कोलामीतील या कमी शब्दसंख्येचे समर्थन केले आहे. देव भाषांचे वाटप करीत असतांना कोलाम उशिरा गेले त्यामुळे थोडी भाषा देऊन तिला सजविण्यावाढविण्यासाठी इतर भाषिकांपासून शब्द घ्यावयाला देवाने कोलामांना सांगितले, असे त्या कथेत सूचित करण्यात आले आहे. परंतु ही कथा 'कथा'च आहे ! सेतुमाधवरावांनी काय, एमेन्यूंनी काय किंवा मी काय कोलामांची भाषा इतक्या लवकर, कमी वेळात आणि त्यांच्या अल्प सान्निध्यात येऊन पूर्णांशाने आत्मसात करणे अगदी अशक्यच आहे. कोलामांकडून त्यांच्या भाषेचा एकेक शब्द मिळविण्याचे काम मोठ्या प्रयासाचे व जिकरीचे आहे. त्यामुळे, कोलामीचे मिळाले तेवढेच शब्द फक्त कोलामीत आहेत असे समजणे योग्य होणार नाही. हजारो वर्षांपासून हे लोक कोलामी भाषा बोलत आले असले तरी जवळपासच्या लोकांच्या भाषेच्या प्रभावामुळे त्यांचे मूळ शब्द ते विसरत गेले असावेत. असे विधान करण्याचे कारण असे की, डोंगरात राहणारा कोलाम जो शब्द उच्चारतो तोच शब्द कित्येकदा सडकांजवळ, पठारी भागात व मोठ्या गावांशेजारी राहणारा कोलाम उच्चारीत नाही. उदा. 'बुड्डुयाक' (म्हातारा) हा शब्द घ्या. हा शब्द कोलामीचा म्हणून डॉ. एमेन्यू यांनी दिला आहे. परंतु तो वऱ्हाडात प्रचारात असलेल्या 'बुढा' (म्हातारा) या शब्दावरून कोलामांनी तयार केलेला आहे. वस्तुतः 'पाबुग' हा शब्द 'म्हाताऱ्या'साठी कोलामीत

आहे. जेव्हा ' पाबुग ' हा शब्द ' म्हाताऱ्या 'साठी असल्याची माहिती ' बुडुयाक ' म्हणणाऱ्या कोलामांना द्यावी, तेव्हा तेही हसून म्हणतात, " खराय्, ' पाबुग 'च पाहिजे ! " अशा तऱ्हेने एकेक शब्द कोलामीत मूळात असणे शक्य आहे.

असे शब्द वाढतावाढता कोलामीचा मूळ शब्दसंग्रह वाढायला काय अडचण आहे ? कोलामी ' दरिद्री ' भाषा असावी, हा समजही त्यामुळे आपोआप कमी होईल. माहिती काढणाराच्या जीवनकक्षेत न येणारे कित्येक विषय कोलामांच्या जीवनकक्षेत येतात. त्यामुळे त्या क्षेत्रातील शब्द कोलामांना ठाऊक असूनही माहिती काढणारांना ते शब्द कोलामांकडून काढून घेणे अशक्य होते. जंगली झाडे, वनस्पती, प्राणी, पक्षी इ. कांचे नानाविध प्रकार सुशिक्षितांपेक्षाही खेडूतांना व आदिवासींना अधिक ठाऊक असतात. त्या क्षेत्रातील त्यांचे शब्द संख्येने तर अधिक असतातच; परंतु अर्थवाही पण असतात. कोलामी भाषेत मधपोळ्याच्या बहुविध प्रकारांना स्वतंत्र शब्द आहेत. यवतमाळ जिल्ह्यातील वऱ्हाडी खेडूतांमध्ये आसपासच्या जंगलात आढळणाऱ्या जेवढ्या मधपोळ्यांची नावे प्रचलित आहेत, ती सर्व कोलामी भाषेत आहेत. झाडेमोहोळ, आगेमोहोळ, कोतेमोहोळ व सातपुडे मोहोळ हे मधपोळ्यांचे चार मुख्य प्रकार वऱ्हाडी खेडूतांना माहीत आहेत. त्यांच्याच जवळपास राहणाऱ्या कोलामांमध्येही या चार प्रकारच्या मधपोळ्यांना त्यांच्या भाषेत अनुक्रमे सुरुंद, फेरा, मेंदारे व टीनपोत्ते अशी नावे आहेत. इतकेच नव्हे तर, मधपोळ्यांचे पुरी, माशा वगैरे जे अवयव आहेत त्यांच्यासाठीही ग्रामीणांमध्ये शब्द आहेत. ते शब्दसुद्धा कोलामांच्या भाषेत आहेत. याचाच अर्थ असा की, कोलामी भाषा समृद्ध असणे अशक्य नाही. संकलनकर्त्यांच्या मर्यादांमुळे कोलामीकडे तोकडेपण येत असल्यास तो दोष त्या भाषेचा नव्हे !

कोलामीतील अशा मूळ शब्दांचा शोध घेण्याचा माझा प्रयत्न आहे. या ग्रंथाच्या शेवटी जो शब्दसंग्रह देण्यात आलेला आहे, त्यात सुमारे पाचशे नवे शब्द आलेले आहेत. उंट, अंगठा, करंगळी, घोरपड, गोमाशी, पोपट, लांडोर, माकोडा ( मुंगळा ), खैराचे झाड, काळा, कुल्ला, कथील, कचरा, चिच, झोप, घाट, जू, माणसाचे इंद्रिय, डास, पक्षी, शेतीतील मळणीची पात, भोरी इ. अनेक मराठी शब्द कोलामी म्हणून एमेन्यू, सेतुमाधवरावादिकांनी दिले. त्या शब्दांसाठी कोलामीत शब्द असल्याचे मला आढळून आले. काही शब्द तर या पूर्वसूरींनाही माहीत होते. अर्थ हा की, कोलामी भाषेची शब्दसंपदा विस्ताराची व शोधाची वाट पाहत आहे !

शेतीच्या क्षेत्रातील बरेच शब्द कोलामीत आहेत. ते शब्द नागर मराठीत नाहीत. नागर भाषेला ज्ञात नसलेल्या झाडांची नावे कोलामीत आहेत. ' मित ' ( उडी ) या शब्दाशी संबंध असलेले ' मित्ते ' ( टोळ ), ' मीते ' ( ससा ) हे शब्द उड्या घेणाऱ्या प्राण्यांशी संबंधित, म्हणून चिंत्य आहेत. किडे, सरपटणारे प्राणी, जंगली जीव यांच्याही बाबतीत हीच स्थिती आढळून येईल.

द्राविडी भाषांनी मराठीला ऋणी केले आहे, ही गोष्ट नव्याने सांगण्याची गरज नाही. 'कोलामी'त आढळणारा 'हेड' (बैल) हा शब्द वऱ्हाडी भाषेत 'हेडे' (बैलांचा व्यापार करणारे) किंवा 'हेडाऊ' या शब्दांच्या रूपाने आढळतो. यवतमाळ भागातील सर्व शेतकऱ्यांना 'हेडे' हा शब्द माहीत आहे. विशेष हे की, बुलडाण्याकडील गुराखी (हे मूळचे आदिवासी आणि द्राविडीच!) दिवाळीत जी मराठी गीते गातात, त्यांची सुरुवात "अना जो हेडा रे ओऽऽ" या पालुपदाने होते. या पालुपदातील 'हेडा' हा शब्द, कोलामीतील 'हेड' हा शब्द, बैल राखणारे बुलडाण्याकडचे गुराखी, संस्कृतातील 'हेड' हा शब्द व वऱ्हाडातील बैलांचा व्यापार करणारे 'हेडे' किंवा 'हेडाऊ' यांचा अन्योन्य संबंध शोधण्यासाठी कोलामीच्या अशा शब्दसंग्रहाचा नक्कीच उपयोग होईल!

'बे', 'अबे' ह्या शिव्या मराठीत आहेत. ह्या दोन्हींतील 'बे' हा शब्द कोलामीत असून त्याचा अर्थ 'आई' असा आहे. मराठीतील 'बे', 'अबे' ही शिवी आईवरून दिली जात असावी व तिचे मूळ वरील द्राविडी कोलामी भाषेतील शब्दात असावे.

## पूर्वसूरींच्या अडचणी

डॉ. एमेन्यू यांनी कोलामी भाषा व शब्द यांची मांडणी अधिक जागरूकतेने केली आहे. परंतु एमेन्यूंसह सर्वच पूर्वसूरींची अडचण भारतीय भाषांतील व एतद्देशीय लिपीतील लिखाणासंबंधीची असल्यामुळे सर्वांनाच 'कोलामी'ची इंग्रजीत करावयाची मांडणी काहीशी कठीण गेली. एमेन्यूंनी कोलामी क्रियापदांची दोनदोन रूपे दिली आहेत. त्यांतील दुसरे रूप म्हणजे कोलामीचे इंग्रजीकरणच आहे. उदा. आडाग (चालणे), आडाप (खेळवणे), आड (खेळणे) या रूपांसाठी एमेन्यूंनी आडग्-आडग्त्, आडाप-आडाप्त्, आड-आड्त् अशी दोनदोन रूपे दिली आहेत. एमेन्यूंनी **T** (टी) लावून केलेले घसरते उच्चार वस्तुतः कोलामीत नाहीत.

## माझ्या शब्दसंग्रहाचे स्वरूप

ह्या प्रकरणाच्या विभाग ४ मध्ये दिलेल्या शब्दसंग्रहात, उपलब्ध असलेल्या सर्व कोलामी शब्दांचा मी समावेश केलेला आहे. पूर्वोक्त लेखकांचे उपलब्ध शब्द डॉ. एमेन्यू यांनी आपल्या ग्रंथात घेतले. ते एकूणएक शब्द मी माझ्या संग्रहात घेतले आहेत. शिवाय माझे जास्तीचे शब्द आहेतच. मला मान्य असलेली शब्दरूपे–जरी त्यांची अनेक रूपे असली तरी–मी दिलेली आहेत. त्या शब्दांची इतरांनी सांगितलेली रूपेही आहेत. पूर्वीलांचे सर्वच शब्द कोलामीत आढळतात काय, याचा मी कसोशीने शोध घेतला. बहुतेकांची रूपे या ना त्या रूपात असलेली दिसली. मला मान्य असलेले शब्द कंसाबाहेर ठेवून त्यांना समांतर वाटणारे इतरांचे शब्द किंवा माझ्याप्रमाणेच

असणारे शब्द मी कंसात दिले आहेत. असे सर्व शब्द सदहू प्रकरणातील विभाग ४ मधील शब्दसंग्रहाच्या ‘ क ’ भागात दिलेले आहेत. मात्र इतरांच्या ज्या शब्दांचा शोध मला लागला नाही किंवा ज्या शब्दांचा वापर मला आढळला नाही अशा शब्दांची यादी चालू प्रकरणाच्या ४ थ्या विभागान्तर्गत शब्दसंग्रहाच्या ‘ ख ’ भागात दिली आहे. अशा शब्दांची संख्या दोनशेच्या घरात असून ‘ क ’ भागातील शब्द-संख्येच्या तुलनेने ही संख्या अगदीच कमी आहे.

‘ ख ’ भागातील शब्दांचा शोध न लागण्याचे एक जुजबी कारण आहे. येथून-तेथून सगळीकडचे कोलाम एकच कोलामी भाषा बोलतात. उच्चारात अंशतः फरक आढळू शकेल. पण फारसा फरक नाही. असे असले तरी वर्धा, यवतमाळ, चांदा, वणी, केळापूर व किनवटचा काही भाग एवढ्या विभागातील कोलाम मराठी–वऱ्हाडीला जवळचे असल्यामुळे तीमधील काही शब्दांना घेऊन बोलतांना आढळतात; तर आदिलाबादेकडील कोलाम तेलगूभाषी लोकांच्या संपर्कामुळे तिकडचे काही शब्द घेऊन बोलतात. आदिलाबाद विभाग मुख्य धरून सेतुमाधवरावांचा शब्दसंग्रह तयार करण्यात आला आहे. माझ्या माहितीचा भर वऱ्हाड-किनवट या भागावर अधिक आहे. त्यामुळे सेतुमाधवरावांचे काही शब्द मला नीट न लागणे शक्य आहे, हे जितके खरे; तितकेच हेही खरे की, तेलगू भागातील कोलामांचे शब्द इतर भागातील कोलामीत नसणे शक्य आहे. उदा. ‘ गोर्रे ’ ( मेंढी ) हा शब्द कोलामीचा म्हणून सेतुमाधवरावांनी दिला. तो यवतमाळ जिल्ह्यात वा वऱ्हाडात आढळत नाही. तेलगू भाषेत मात्र तो शब्द आहे. ‘ ख ’ भागातील हे शब्द कोलामी नसतीलच असे मात्र मला म्हणावयाचे नाही.

स्वभाषेतील शब्द कमी पडल्यास कोलाम लोक शेजारच्या भाषेतून तो उसना घेतात. स्वभाषेतील शब्द विसरल्यामुळेही उसने शब्द घेण्याची पाळी येते. असे शब्द बाहेरून घेतले तरी त्यांना आपल्या भाषारूपांचा साजशृंगार चढवायला कोलाम तयार असतात. उदा. ‘ बगळा ’ कोलामीत ‘ बेगल्याक ’ होतो तर ‘ बदलणे ’ हे क्रियापद ‘ बदलीपंग ’ अशा रूपात कोलामीत जाऊन बसते. अशा शब्दांची उसनवारी आदिलाबाद भागापुरती काहीशी तेलगूकडून होत असली तरी बव्हंश या उसनवारीसाठी कोलामी वऱ्हाडीकडेच धावते. कारण आजूबाजूला वऱ्हाडी भाषेचेच वातावरण आहे. अशा शब्दांचे शेकडा किती प्रमाण कोलामीत आहे,[1] याचा नक्की हिशेब करण्यात अर्थ नाही. कारण मूळ शब्द न सापडल्यास मराठी-वऱ्हाडी शब्द येतोच! अशा शब्दांची यादी वाढविली तितकी वाढते. मराठीचा संपर्क जेथे जास्त तेथे मराठी शब्द जास्त येतात. म्हणून मी स्वतः अशा मराठी–वऱ्हाडी शब्दांची नोंद क्वचितच केली आहे.

---

१. डॉ. एमेन्यू यांच्या मते इतर शब्दांचे कोलामीतील हे प्रमाण वर्धा भागात ३५%, किनवट भागात ११% व आदिलाबाद भागात २२% आहे.

मात्र एमेन्यू, सेतुमाधवराव इ.कांनी कोलामीत आढळणारे मूळ मराठी शब्द त्यांच्या शब्दसंग्रहात दिले आहेत, ते मी अलग काढून (चालू प्रकरणाच्या ४ थ्या विभागान्तर्गत— ) 'ग' भागातील शब्दसंग्रहात टाकले आहेत. कोलामीत येऊन पूर्णतः मिसळलेल्या अन्यभाषी शब्दांना माझा विरोध नाही. तरीपण अभ्यासाच्या सोयीसाठी हा 'ग' विभाग मी मुद्दाम अलग केला आहे. त्या भागात इतरांचेच शब्द बहुधा असून माझे नाममात्र आहेत. या 'ग' भागातील शब्दांमध्ये एमेन्यूंचे सुमारे १७५, सेतुमाधवरावांचे सुमारे १२५ आणि इतरांचे सुमारे ३५ शब्द आहेत. हे मराठी शब्द वगळल्यास कोलामीतील मूळचे सुमारे ७९० शब्द एमेन्यूंनी व सेतुमाधवरावांनी सुमारे ६७५ शब्द शोधले, असा अर्थ होतो. कोलामांच्या जीवनात कधीच न आढळणाऱ्या वस्तू वा विषयांसंबंधीचे शब्द मूळ कोलामीत नसणारच ! बहुधा असे शब्द इतरांकडूनच ते घेतात. बदली होणे, शाळा, नाटक असे शब्द कोलामी भाषेत शक्य नाहीत; कारण त्यांच्या जीवनातच या विषयांचे अस्तित्व नाही ! डॉ. एमेन्यू यांनी तर 'बोंबई', 'नागपूर' असेही कोलामीचे शब्द दिले आहेत. अशी ही यादी वाढविण्यात स्वारस्य नाही !

मराठीतून कोलामीत आलेले शब्द शुद्ध मराठीऐवजी वऱ्हाडीतून आले आहेत, हे 'ग' शब्दसंग्रहावरून दिसून येईल. मसुटी, माथन, टापर, हेतू (आठवण) असे अनेक शब्द या दृष्टीने पारखून पाहता येतील. कोलामीचा वऱ्हाडीशी हा जो जवळचा व जिव्हाळ्याचा संबंध आहे, तो लक्ष्यात घेऊनच सदहू शब्दसंग्रहामधील कोलामी शब्दांचे नाते शक्य तेथे वऱ्हाडीशी कसे आहे, तेही सुचवीत जावे, असे धोरण ठेवलेले आहे. ही वऱ्हाडी विशेषेकरून यवतमाळ जिल्ह्यातील आहे.

हिंदीतून कोलामीत काही शब्द आले असावेत, हा तर्क मला पटत नाही. हिंदीपेक्षा उर्दूचा प्रभाव मुस्लीम राजवटीत वऱ्हाड व मोगलाई या भागातील एतद्देशीय भाषांवर पडला. ते शब्द या भागातील भाषांमध्ये प्रथम आले व त्यांतून मग कोलामीत गेले. याद, अस्सल, तकलीप, अव्वल, तपास, पत्ता इ. तुरळक हिंदीउर्दू शब्द कोलामीत दिसतात; पण ते हिंदीउर्दूतून न येता वऱ्हाडीतून आले. आदिलाबाद-किनवट या भागातील स्थिती थोड्या प्रमाणात वेगळी असेल व उर्दूमधील चारदोन शब्द तिकडील कोलामीत अधिक आढळत असतील, एवढेच !

'ग' भागातील सर्वच शब्द मराठीतील आहेत, असा आग्रह मात्र नाही. कोलामीतही मूलतः काही शब्द असू शकतील; परंतु त्यांचा स्वतंत्र अभ्यास व्हावा, या दृष्टीनेही वेगळा गट पाडलेला आहे. चालू प्रकरणाच्या ४ थ्या विभागान्तर्गत 'घ' भागात याच धोरणाने काही शब्दांची चर्चा मुद्दाम केलेली आहे. ते शब्द द्राविडीला जवळचे असल्यामुळे मराठीतूनच कोलामीत गेले असतील, असे म्हणण्याचे धाडस

एकदम होत नाही. काही शब्द मूळ मराठीही असू शकतील किंवा कोलामीतही त्यांपैकी काही शब्द आरंभापासून असू शकतील !

माझ्या शब्दसंग्रहात मूळ धातू मुख्य धरून मी शब्दार्थ दिले आहेत. उदा. 'आड–खेळ–'. पण काही जागी नमुन्यादाखल 'आडेंग–खेळणे' असेही अर्थ दिले आहेत. एरवी 'मोराप–वाजव–णे' अशा तऱ्हेचे लेखन करून प्रथम मूळ धातूचा अर्थ घ्यावा व नंतर 'णे'युक्त अर्थ घ्यावा, असे सूचित केले आहे.

शब्दांची प्रत्यय, विभक्ती, काळ इ. नी होणारी विविध रूपे शब्संग्रहात घेण्याचे टाळले आहे. फक्त, फार फरक पडणारी काही रूपे घेतली आहेत. तसेच, कोलामी भाषेचे काही गद्यनमुनेही दिले आहेत. हे नमुने सुमारे अडीचशे वाक्यांचे आहेत. ते वाढविता आले असते. परंतु असे गद्यनमुने, गाणी व काळ-विभक्त्यादि प्रकार वाढविणे विस्तारभयास्तव टाळले आहे. कोलामीचे व्याकरण देण्याचे व सलग सविस्तर गद्यनमुने देण्याचेही याच कारणाने टाळले आहे. शिवाय, कोलाम-जीवनाचे एक अंग म्हणून भाषेचे प्रकरण सदर्हू ग्रंथात घेतले आहे. स्वतंत्र भाषा-ग्रंथ प्रस्तुत करण्याचा उद्देश येथे अभिप्रेत नाही. या सर्वांचा सविस्तर विवेचनात्मक आढावा मांडण्यासाठी या भाषेवर मराठीत स्वतंत्र ग्रंथ निर्माण होण्याची आवश्यकता आहे. सेतुमाधवराव व एमेन्यू यांनी इंग्रजीत लिहिलेले ग्रंथ उपलब्ध असूनही कोलामी भाषेवरील नव्या व विस्तृत संशोधनास, त्यातल्या त्यात मराठीतून भरपूर वाव आहे, हे अनुभवाने सांगायला हरकत नाही !

डॉ. एमेन्यू यांनी वर्धा विभाग कोलामीच्या संशोधनासाठी निवडला व सेतु-माधवरावांनी आदिलाबाद विभाग घेतला. हे दोन्ही विभाग कोलामांच्या वास्तव्य-स्थानांच्या सरहद्दीवरचे ठरतात ! त्या दृष्टीने माझे या संदर्भातील कार्य यवतमाळ जिल्ह्यातील, म्हणजे कोलामाच्या वास्तव्यस्थानांच्या गर्भभागीचे आहे आणि तेही मराठी भाषेत आहे, या वस्तुस्थितीचा मला आनंद होत आहे !

२ : :

# गाणी

## [ १ ]

### 'मोहडोंबरी' सणाच्या आगमनाचा आनंद

| **कोलामी** | **मराठी** |
| --- | --- |
| सावडी बोद्देत तांद केरीकेरी | चावडीपुढच्या अंगणात कशाचा गलबला? |
| – तोलीने भुर्री आंडा ! | —'मोहडोंबरी' आहे उद्याला ! |

# [ २ ]

## ‘ गावबांधणी ’चा आनंद व देवीला आवाहन

| कोलामी | मराठी |
| --- | --- |
| माहुरता देवी तांदुंग वात्तिना | माहूरची देवी कशाला आली– |
| तांदुंग तोदा ? | नि कशाला नाही ? |
| –बारा मेनेला पुंजा | –बारा महिन्यांची पूजा |
| तिने वात्तिन ! १ | ( एकदम ) घ्यायला ! १ |
| माहुरता पोलेगामा[1] तांदुंग वात्तिना | माहूरच्या पोलेगामा ! कशाला आलास– |
| तांदुंग तोदा ? | नि कशाला नाही ? |
| –बारा मेनेला पुंजा | –बारा महिन्यांची पूजा |
| तिने वात्तिन ! २ | ( एकदम ) घ्यायला ! २ |
| माहुरता पोलेगामा उद्दंग सूलेंग तांग | माहूरच्या पोलेगामा ! कशाला |
| आनांग का( क )दा तांग तोदा ? | ऊठबस करतोस नि कशाला नाही ? |
| –बारा मेनेला खुशी | –बारा महिन्यांचा आनंद |
| काकेंग वात्तिन ! ३ | ( एकदम ) लुटायला ! ३ |
| आउरा पिल्लाकुल इउरा पिल्लाकुल | त्या गावच्या बायापोरी, या गावची |
| तांदुंग कुळतेरा तांदुंग तोदा ? | पोरेबाळे, कशाला जमली नि कशाला |
| – सात्ती ओलेंग वात्तेव ! ४ | नाही ? |
| | –‘ गावबांधणी ’ उत्सव पाहायला ! ४ |

# [ ३ ]

## ‘ गावबांधणी ’च्या उत्सवातील विनोद

| कोलामी | मराठी |
| --- | --- |
| नेवली भेटे कावे मीयादा | नदीच्या थडीवर कासव चरते, |
| तानेद मीयादा तानेद तोदा ? | काय चरते नि काय नाही, माहीत नाही |
| | इकडे — |
| सुपारी सावे सेद्दीना | भगताचे पोट खोल गेले, म्हणून– |
| मीया तिरगाद एनार ! | चरत फिरतो, म्हणतात बुवा ! |
| | (–गावडुकर ‘ चरत ’ फिरत असतो ! ! ) |

१. पोलेगाम या आडनावाचा माहूरच्या देवीजवळचा ‘ भगत ’ असावा.

[ ४ ]

## पंचांची दवंडी जाहीर करण्याचे गीत

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ? | |
| ए देवा लाला ! | | हे माझ्या देवा ! | |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ! | |
| – ए नेकुन बान | | – हे नाईक बाबा | |
| रेन सांइल् पान एनार ! | १ | एक आणा वर्गणी द्या म्हणतात ! | १ |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ? | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ? | |
| – ए नेकुन बान | | – हे नाईक बाबा | |
| सिरे बियाम एनार ! | २ | चारोळीची वर्गणी द्या म्हणतात ! | २ |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीपुढच्या अंगणात कशाचा गलबला? | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ! | |
| – ए नेकुन बान | | – हे नाईक बाबा | |
| मुत्तेळ पोक्केल एनार ! | ३ | पायलीभर मोह द्या म्हणतात ! | ३ |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ? | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| सावडी बोद्देत तांद केरीए | | चावडीच्या अंगणात कशाचा गलबला ? | |
| – ए नेकुन बान | | – हे नाईक बाबा | |
| चिट्टेल भाशी सेसा एनार ! | ४ | मापभर पीठ द्या म्हणतात ! | ४ |

[ ५ ]

## ‘ रामा राघोबा रे ! ’

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| शिळी मोदाल, मोदुक मोदाल | | बिबीचे बूड, पळसाचे बूड | |
| आरे रामा राघोबा रे ! | १ | आरे रामा राघोबा रे ! | १ |
| तेके मोदाल, मादगी मोदाल । आरे० | २ | सागाचे बूड, आजनाचे बूड । आरे० | २ |
| सित्ता मोदाल, मेळी मोदाल । आरे० | ३ | चिंचेचे बूड, उंबरीचे बूड । आरे० | ३ |
| रेंगा मोदाल, बुर्रा मोदाल[१] । आरे० | ४ | बोरीचे बूड, भोपळ्याचे बूड । आरे० | ४ |

१. झाडांचा अनेकानेक नावे घेऊन हे गीत वाढवितात.

## [ ६ ]

## लग्नातील गाणे

| कोलामी | मराठी |
| --- | --- |
| उसुरका पोरोका | आवळीचा पाला- |
| आम बाबू पाराकान | आमचा बाबू पोटावर ( घासत ) चाले। |
| आम बाबू ओलाने | आमचा बाबू पाहतो- |
| काकण्याल सास्युरे | ' हाताची काकणं सोडा हो ! ' |



नृत्ये व गीते यांत भाग घ्यायला केव्हाही तयार !

[ ७ ]

## लग्नात हाताची ' कंकणे ' सोडण्यासंबंधी

**कोलामी**

दादा, आम दादा ओलातुन
काकण्या सासो
दोई, आम दोई ओलातुन
काकण्य सासो

**मराठी**

आम्ही दादास पाहतो
त्याने आमचे ' काकण ' सोडावे !
आम्ही आमच्या आजीकडे आशेने
पाहतो ! तिने आमचे ' कंकण ' सोडावे
व आम्हाला बंधनमुक्त करावे !



गीते व नृत्ये यांत भाग घेण्यास असमर्थ म्हणून विषाद !

## [ ८ ]

## शिकारीचे समूहगीत

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| गुड्डीने लोवाग लामनी सेद्दीने[1] | | अस्वलाच्या दरीत मोर गेला | |
| ए देवा लाला ! | | हे माझ्या देवा ! | |
| गुड्डीने लोवाग लामनी सेद्दीने | १ | अस्वलाच्या दरीत मोर गेला | १ |
| धोबाकेका लामनी वेंकाए | | आजोबाच्या मागे मोर आला | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| धोबाकेका लामनी वेंकाए | २ | आजोबाच्या मागे मोर आला | २ |
| धोबाकुने गुड्डी तिनादे | | अस्वल खाते आजोबाला | |
| ए देवा लाला ! | | हे माझ्या देवा ! | |
| धोबाकुने गुड्डी तिनादे | ३ | अस्वल खाते आजोबाला | ३ |
| ढोग्गी ढोग्गी लामनी तुलादे | | लांब टांगा टाकीत मोर धावला | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| ढोग्गी ढोग्गी लामनी तुलादे | ४ | लांब टांगा टाकीत मोर धावला | ४ |
| धोबाकेका लामनी वेंकाए | | आजोबाच्या मागे मोर आला | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| धोबाकेका लामनी वेंकाए | ५ | आजोबाच्या मागे मोर आला | ५ |
| सुमेंग सेद्देन ते तोका पुत्तिन | | धरायला गेले तर शेपटी तुटली | |
| गोलेग एना सेद्देन ते | | मारायला म्हणून गेले तर– | |
| मोडा किनीतिन ! | | काठीच मोडून गेली ! | |
| ए देवा लाला ! | | हे देवा माझ्या ! | |
| गोलेग एना सेद्देन ते | | मारायला गेले तर– | |
| मोडा किनीतिन ! | ६ | काठीच मोडून गेली ! | ६ |

## [ ९ ]

## ' डासाला घेऊन जा '–

| कोलामी | | मराठी | |
|---|---|---|---|
| कोवेला कोरुन तारगा तेन नीव | | पिल्यांची कोंबडी कापणार होतीस, | |
| तांग तारगेतीत, | | का नाही कापली ? | |
| गुच्छु डोमे ! | १ | डासाला घेऊन जा गे मारबत ! | १ |

१. पहिल्या पाच कडव्यांतील पहिली ओळ दोनदोनदा म्हणतात.

| कोलाभी | | मराठी | |
|---|---|---|---|
| सीमाले केळी काक तेन नीव | | मुंग्यांची कढी करणार होतीस | |
| तांग काकेतीव, गुच्छु डोमे ! | २ | का नाही केली ? डासाला० | २ |
| शिळी पुरण काक तेन नीव | | बिब्यांचे पुरण करणार होतीस | |
| ताग काकेतीव, गुच्छु डोमे ! | ३ | का नाही केले ? डासाला० | ३ |
| भांबोडे नेंजेंग काक तेन नीव | | मुंगळ्यांची भाजी करणार होतीस | |
| तांग काकेतीव, गुच्छु डोमे ! | ४ | का नाही केली ? डासाला० | ४ |
| पुरेंले नेंजेंग काक तेन नीव | | किड्यांची भाजी करणार होतीस | |
| तांग काकेतीव, गुच्छु डोमे ! | ५ | का नाही केली ? डासाला० | ५ |

## [ १० ]

## मुलांच्या खेळातील गीत

| कोलामी | | मराठीकरण | |
|---|---|---|---|
| आम्माय आम्बान, आंगाडी सेद्देन | १ | आमचे आईबाबा बाजारात गेले ! | १ |
| आमे एल्लाता, सिक्रुंडी पूयतिन | २ | आमच्या घरावरचा वाल फुलोरला ! | २ |
| आटाने-फुटाने, तुमकी-खुटाने | ३ | फुटाणेबिटाणे ! टेंभुरणीचा खुंटा ! ! | ३ |
| सित्ता ताढून, धुर्राल वात्तेव | ४ | चिंचेच्या झाडाखाली घोडे आले ! | ४ |
| तुले तुले पापी | | जाते, जाते ! वरण उतू जाते ! | |
| पेसार पाप्प पोंग तुला | | मुगाचे वरण उतू जाते ! | |
| तुले तुले पापी | ५ | जाते, जाते ! वरण उतू जाते ! | ५ |

## [ ११ ]

## बाजाराचे संवाद-गीत

| कोलामी | मराठी |
|---|---|
| **स्त्रिया**–बांडी एना सावरिप, दादा । बांडी० | बंडी तयार करा म्हणा दादा ! बंडी० |
| **पुरुष**–बांडी एना सावरिपातुम, बाईकुल । | बंडी तयार करतो बरं बायांनो ! बंडी० |
| **स्त्रि.**–धूर[1] एना सुमेवे, दादा । धूर० | धूर घ्या हो दादा ! धूर० |
| **पु.**–धूर एना सुमताने, बाईकुल । धूर० | धूर घेतली वो बायांनो ! धूर० |
| **स्त्रि.**–सिवऱ्याल रुसीए, दादा । सिव० | सिवळा धुरीत अडकवा हो दादा ! |

---

१. गाडीला दोराने जू नीट बांधणे; याला ‘ धूर घेणे ’ असे म्हणतात.

| कोलामी | मराठी |
|---|---|
| पु.–सिवऱ्याल रुसीताम, बाईकुल। | सिवळा धुरीला लावल्या बायांनो! |
| स्त्रि.–एड्ल् कोतार ए दादा। एड्ल्० | बैलांना आणा हो दादा! बैलांना० |
| पु.–एड्ल् कोताने बाईकुल। एड्ल्० | बैल आणले वो बायांनो! बैल० |
| स्त्रि.–बांडी एना झुतिप दादा। बांडी० | गाडी जुंपा हो दादा! गाडी० |
| पु.–बांडी एना झुतिपतान बाईकुल। | गाडी जुंपली वो बायांनो! गाडी० |
| स्त्रि.–आंगाडी चंड्रूरे दादा। आंगाडी० | बाजारात जाऊ हो दादा! बाजारा० |
| पु.–आंगाडी चंड्रू वो बाईकुल। आंगाडी० | बाजारा जाऊ वो बायांनो! बाजारा० |
| स्त्रि.–आंगाडींग वात्तूंग दादा। आंगा० | बाजारा येतो हो दादा! बाजारा० |
| पु.–वाडीवाडी चंड्रू वो बाईकुल। वाडी० | लवकर लवकर चला वो बायांनो! लवकर० |
| स्त्रि.–वाडीवाडी वात्तामे दादा। वाडी० | लवकर लवकर निघालो दादा! लवकर० |
| पु.–आंगाडींग वात्तामे बाईकुल। आंगा० | बाजारात आलो वो बायांनो! बाजारा० |
| स्त्रि.–एगुल कोतारे दादा। एगुल० | विड्याची पाने आणा दादा! विड्याची० |
| पु.–एगुल कोतामे बाईकुल। एगुल० | विड्याची पाने घ्या बायांनो! विड्याची० |
| स्त्रि.–एगुल काकेव दादा। एगुल० | विडा तयार करा हो दादा! विडा० |
| पु.–एगुल काकतामे बाईकुल। एगुल० | गिडा तयार झाला बायांनो! विडा० |

( नृत्य चालू; नाचतानाचता ‘ रामराम ’ करतात [१] )

| | |
|---|---|
| स्त्रि.–एगुल तिनूरे दादा। एगुल० | विडा खाऊ हो दादा! विडा० |
| पु.–एगुल तिनदामे बाईकुल। एगुल० | विडा खाल्ला वो बायांनो! विडा० |

( नृत्यात बाजार करण्याची प्रक्रिया )

| | |
|---|---|
| पु.– आंगाडी काकूर बाईकुल। आंगाडी० | बाजार करू वो बायांनो! बाजार० |
| स्त्रि.– आंगाडी कातूमे दादा। आंगाडी० | बाजार करतो हो दादा! बाजार० |
| पु.– वाडीवाडी काकूरे बाईकुल। वाडी० | लवकर लवकर करा बायांनो! लवकर० |
| स्त्रि.– वाडीवाडी काकतामे दादा। वाडी० | लवकर लवकर करतो हो दादा! लवकर० |
| पु.– उरुंग चांड्रू रे बाईकुल। उरुंग० | आपल्या गावी परत जाऊ बायांनो! आप० |
| स्त्रि.– उरुंग वात्तूंग दादा। उरुंग० | गावाला येतो हो दादा! गावाला० |
| पु.– वाडीवाडी चांड्रूरे बाईकुल। वाडी० | लवकर लवकर चला वो बायांनो! लवकर० |
| स्त्रि.– इने वेंकात वात्ते दादा। इने० | तुझ्यामागे येतो गा दादा! तुझ्या० |
| पु.– उरुंग वात्तामे बाईकुल। उरुंग० | गावी परत आलो, बायांनो! गावी० |

१. पान घेतांना एकमेकांना नमस्कार करण्याची रीत आहे.

## [ १२ ]

# दंडारीचे संवाद-गीत[1]

| कोलामी | मराठी |
|---|---|
| डेबू- डेबुरुन डेबातुन | वाडोळा–वाडोळा वात्तेन, वाटाल तापतेन |
| डोबऱ्या- डोबऱ्याकुन टोकातुन | वीरगामा- वीरगामा वात्तेन, वीरेग कोसतेन |

## [ १३ ]

# गवत कापणे : संवाद-गीत

| कोलामी | मराठी |
|---|---|
| पु.–घाड्डी आकेंग बाईकुल वात्तीर ?[2] | बायांनो, गवत कापायला येता काय ? |
| स्त्रि.–ताने रोज सीयातिव दादा ? | काय रोजमजुरी देशील, दादा ? |
| पु.–आटाने रोज सीयातुन, बाईकुल। | आठ आणे रोज देईन, बायांनो ! |
| स्त्रि.–रोजाळ वात्तुमे, दादा। | रोजाने येतो हो दादा ! |
| पु.–घाड्डी आकेंग चांड्डर, बाईकुल। | बायांनो, गवत कापायला जाऊ ! |
| स्त्रि.–एद पाव सेन्नारे दादा। | कोणत्या रस्ताने जायचे, दादा ? |
| पु.–इने मेना चाम, बाईकुल। | बायांनो, तुमच्या मनाने चला ! |
| स्त्रि.–बोंदा पाव सेनार, दादा। | खोलगट रस्त्याने जाऊ गा दादा ! |
| पु.–इने मेना चाम, बाईकुल। | बायांनो, तुमच्या मनाने चला ! |
| स्त्रि.–बेज्जा गेट्टाल बियाव, दादा। | पण, या रस्त्याने खूप पाय भाजतात ! |
| पु.–इने मेना चाम, बाईकुल। | बायांनो, तुमच्या मनाने चला ! |
| स्त्रि.–माले पात्र सेनार, दादा। | डोंगरी रस्त्याने जाऊ रे दादा ! |
| पु.–इने मेना चाम, बाईकुल। | बायांनो, तुमच्या मनाने चला ! |
| स्त्रि.–बेज्जा खेडेल मुंगाव, दादा। | पण, या रस्त्याने खूप खडे रुततात ! |
| पु.–इने मेना चाम, बाईकुल। | बायांनो, तुमच्या मनाने चला ! |

( त्यानंतर नाचतच जंगलात जातात. गवत कापले, की ते बांधण्याची तयारी-)

| | |
|---|---|
| स्त्रि.–ताने नारा पुस्सेंग दादा। | कशाचा वाख काढतोस, दादा ? |

( पुरुष नृत्यकार पळस, भोसा इ. झाडांचे वाख काढून देतात. )

१. या गीताचा अर्थ नीट लागत नाही. पण त्याचे स्वरूप लयीतल्या बडबडगीतासारखे आहे.

२. या गीताची प्रत्येक ओळ दोनदा म्हणतात.

